# 'छ. संभाजी महाराज यांचा राज्यकारभार : एक अभ्यास'




स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड
सामाजिकशास्त्रे विद्याशाखेंतर्गत इतिहास विषयातील पीएच. डी.
पदवीकरीता सादर करावयाचा

## शोध-प्रबंध

* संशोधक *

**प्रा. अनिरूध्द सर्जेराव उढाण**
अंकुशराव टोपे कला वाणिज्य व विज्ञान,
महाविद्यालय जालना

* मार्गदर्शक *

**प्राचार्य डॉ. राम साहेबराव फुन्ने**
स्व. नितीन कला व विज्ञान महाविद्यालय,
पाथरी, ता. जि. परभणी

संशोधन केंद्र
ज्ञानोपासक शिक्षण मंडळ, परभणी संचलित
कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, परभणी

जानेवारी - २०२०

# अनुक्रमणिका

# प्रकरण पहिले

# संभाजीराजे यांचा जन्म, बालपण, शिक्षण आणि राज्यकारभार प्रवेश

---

**१.१ साधन चिकित्सा**

**१.२ संशोधन विषयाचे महत्त्व**

**१.३ संशोधनाच्या उद्दिष्टांची पूर्तता**

**१.४ संशोधन विषयाच्या गृहितकांची पूर्तता**

**१.५ समस्या विधानाची पूर्तता**

**१.६ संशोधन पद्धती**

**१.७ संभाजीराजे यांचा जन्म**

**१.८ संभाजीराजे यांचा जन्म पुरंदर किल्यावर**

१.८.१ संभाजीराजे यांना तीन बहिणी

१.८.२ सईबाईंचा मृत्यू

१.८.३ संभाजीराजे यांचा जिजाऊ यांना अधिक लळा

१.८.४ संभाजीराजे यांचे बालपण

१.८.५ संभाजीराजे यांचे शिक्षण

**१.९ तत्कालीन कागदपत्रे, बखरी आणि संभाजीराजे यांचे शिक्षण**

**१.१० बखरीतील मत स्वागताहार्य, पण चिकित्सा महत्त्वाची**

**१.११ सैनिक शिक्षण मिळाले, पण अक्षर ज्ञानाचा उल्लेख नाही**

**१.१२ नैतिक शिक्षणाच्या अंगाने बखरकारांची अधिक मांडणी**

**१.१३ रामदास स्वामींना आणण्याची गरज नव्हती**

**१.१४ लेखनादी अभ्यासाची नोंद महत्वाची**

**१.१५ 'बुधभूषणम्' प्रस्तावनेतील नोंद महत्त्वपूर्ण**

**१.१६ युद्ध कौशल्ये आणि संभाजीराजे**

# प्रकरण पहिले

## संभाजीराजे यांचा जन्म, बालपण, शिक्षण आणि राज्यकारभार प्रवेश

मध्ययुगीन कालखंडामध्ये 'स्वराज्य' निर्मिती ही अवघ्या महाराष्ट्राच्या जीवनातील एक महत्वपूर्ण घटना आहे. तत्कालीन काळात संपूर्ण समाजजीवनावर या घटनेचा परिणाम झाला होता. आजही या घटनेचा अनुकूल असाच परिणाम घडून आला. समाज जीवनाचे एकूण संदर्भ बदलले. तत्कालीन काळातील सामाजिक समस्या नवा पर्याय देण्याचा प्रयत्न करत असतात. समाजाची स्थिती सातत्याने बदलत असते. समाज हा गतिमान असतो. समाजजीवनाचा परिणाम व्यक्तिजीवनावर होत असतो. हा परिणाम स्वीकारून निमूटपणे जीवनक्रम व्यतित करणाऱ्या लोकांची संख्या समाजामध्ये जास्त असते. किंबहुना समाज प्रवाहाच्या विरोधी जाण्याचे धाडस फारसे कोणी करत नाही. पण अपवादात्मक व्यक्ती अशा असतात ज्या समाजातील समस्यांना ओळखतात. त्यांच्या विरोधात जाण्याचे धाडस करतात. अथवा समाज व्यवस्थेला नवा पर्याय देतात. समाज समस्याने होणारे मानवी जीवनाचे अपरिमीत नुकसान त्यांना नको असते, यासाठी आपले अवघे आयुष्य ते संघर्षामध्ये घालवितात आणि समाजाला नव्या विचारमूल्यांची ओळख प्राप्त करून देतात.

'स्वराज्य निर्मिती ही शहाजीराजे-जिजाऊ आणि शिवाजी महाराज यांच्या द्रष्टेपणाचे उत्तम उदाहरण आहे. कारण स्वराज्याची स्थापना ही सत्तेच्या लालसेने केलेली नसून सर्वसामान्य लोकांना सुखी-समाधानी जीवनप्रणाली उपभोगता यावी, स्वातंत्र्य समाधानाने अनुभवता यावे यासाठी करण्यात आली होती. याचा प्रत्यय शिवाजी महाराजांच्या राज्यकारभारावरून येतो. शिवाजी महाराजांची न्यायी वृत्ती, सर्वसामान्यांच्या प्रती असणारे प्रेम, जिव्हाळा आणि आपुलकी इत्यादी त्यांची उदाहरणे आहेत.

शिवाजी महाराजांप्रमाणे संभाजीराजे सुध्दा प्रजेच्या कल्याणासाठी उपयुक्त असा राज्यकारभार करत. त्यांच्या कारभाराचे पैलू व्यामिश्र स्वरूपाचे असून, त्यांच्या

व्यक्तिमत्वामध्ये परिपूर्ण नेतृत्वाचे असंख्य पैलू होते. या बाबींची साक्ष त्यांच्या कार्य कर्तृत्वातून येते. तत्कालीन काळ अस्थिरतेचा असून देखील त्यांनी तो ज्या धैर्याने, कौशल्याने हाताळला यावरून त्यांच्या प्रशासन व्यवस्थेतील अनुभवांची साक्ष पटते. याबाबीचा विस्तारित आढावा प्रस्तुत प्रबंधामध्ये घ्यावयाचा आहे. सूचित स्वरूपात मांडणीच्या ओघाने या ठिकाणी आढावा घेतला आहे.

'स्वराज्य' निर्मितीच्या संकल्पनेचा विचार आपणास शिवाजी महाराज यांच्यापासून करता येणार नाही. त्यांच्याही पूर्वी अगदी मालोजीराजे यांच्यापासून विचार करावा लागेल. मालोजीराजे हे पराक्रमी, शूर आणि निजामशाहीतील मोठे सरदार होते. त्यांच्यामागे मराठा घराण्यातील असंख्य पराक्रमी सरदार उभे असत. तत्कालीन काळातील महाराष्ट्राच्या राजकीय जीवनावर मालोजीराजे अथवा भोसले घराण्याचा फार मोठा दबदबा होता. ते ज्या पक्षात वा सत्तेत असतील त्यांची महाराष्ट्रावर सत्ता असे. त्यामुळे मुघलराजे त्यांना मान, वतने आणि जहागीरीही देत असत. हे सर्व असले तरी भोसले घराणे समाजजीवनाशी, सामान्य माणसाशी जोडलेले होते. त्यांच्या परिस्थितीची कल्पना तत्कालीन राजांना येत होती. सामान्य माणसाचे हलाखीचे जीवनमान त्यांना व्यथित करत होते. यातूनच त्यांच्या मनात स्वतःच्या राज्याची कल्पना घोळत असल्याचे भरपूर पुरावे उपलब्ध आहेत. या दृष्टीने इतिहासकारांनी तो मांडण्याचा अल्पसा प्रयत्न केला आहे. वा.सी. बेंद्रेंनी मात्र अधिक विस्ताराने असा प्रयत्न केलेला आहे, तो प्रयत्न गौरवास्पद आहे.

मालोजीराजांनी स्वराज्य स्थापनेचा विचार केला; पण तत्कालीन काळाचा विचार करता काळ अनुकूल नसल्याचेच जाणवते. पुढे शहाजीराजांनी स्वराज्य निर्मितीच्या दृष्टीने काही प्रयत्न केला होता का ? हेही पाहणे महत्वाचे आहे. शहाजीराजांचे व्यक्तिमत्व, कार्यकर्तृत्व श्रेष्ठ दर्जाचे होते. वडिलांप्रमाणे त्यांचाही खूप मोठा वचक महाराष्ट्राच्या राजकारणावर होता. या घराण्यात शहाजीराजे, चुलते विठोजीराजे यांची मुले आणि व्यंकोजीराजे, संभाजीराजे अशी कर्तबगार मंडळी होती. यावरून आपल्या लक्षात येते की, या घराण्याचे राजकीय सामर्थ्य फार मोठे होते.

शहाजीराजांनी स्वराज्य स्थापनेचा दोन वेळा प्रयत्न केलेला होता. पण या प्रयत्नास यश आले नाही. पुढे ते आपले स्वप्न जिजाऊ आणि शिवाजी महाराज यांच्या माध्यमातून पूर्णत्वाला घेऊन जाताना दिसतात. शिवाजी महाराजांना बेंगलूरला घेऊन जाणे, त्यांच्या शिक्षणाची स्वतः जातीने काळजी घेणे, त्यांना राज्यकारभाराचे धडे देणे, योग्य वेळी महत्वाचे सरदार बरोबर देणे, स्वतंत्र राज्यकारभाराचा अधिकार, शिक्के, ध्वज आणि जिजाऊंना सोबत पाठवून पुण्याची जहागिरी सांभाळण्यास देणे, या मागे शहाजीराजे स्वतंत्र स्वराज्याचा विचार करत असल्याचे स्पष्ट होते. या बाबत 'शिवभारत' ग्रंथामध्ये परमानंद स्वामींनी नोंदविलेली पत्रे महत्वपूर्ण आहेत. त्या ग्रंथातील मते शहाजीराजे स्वराज्याचे संकल्पक असल्याचे सूचित करणारी आहे. शिवाजी महाराजांना खूप मोठा राजकीय वारसा आजोबांच्या पूर्वीपासून असलेला दिसतो. महाराष्ट्राच्या विविध भागातील लोकांशी त्यांचा जवळून संबंध होता. यामुळे स्वराज्य स्थापनेचे स्वप्न या कुटुंबाने पाहिले असेल याबाबत मतभेद असण्याचे कारण नाही. पुढे शिवाजी महाराजांनी 'स्वराज्य' सत्यात आणले यावरून ही गोष्ट स्पष्ट होण्यास मदत होते.

स्वराज्य उभारत असताना भोसले घराण्याने आपला स्वतःचा जीव आधी संकटात घातला. त्यासाठी दुसऱ्याला पणाला लावले नाही. मालोजीराजेपासून संभाजी महाराज, राजाराम महाराज इत्यादी सर्व मंडळीं स्वतः युध्दावर गेली, युध्दाचे नेतृत्व केले. यावरून त्याचे आपल्या सैन्याप्रती, आपल्या माणसांबद्दल असणारे प्रेम दिसून येते. यामुळे भोसले कुळातील माणसे स्वतःचा जीव सुध्दा देण्यास तयार झाली, हेही आवर्जून ध्यानात घ्यावे लागेल.

तत्कालीन काळातील समाजाची सामाजिक स्थिती फारच विदारक होती. समाज उच्चनिचतेच्या गर्तेत अडकला होता. सरदाराचे परस्परातील संघर्ष सामान्य माणसाचे जीवन अस्थिर करत होते. मुघली सत्ता सर्व सामान्यांवर अन्यायकारक महसूल बसवत असे. यामुळे सर्वसामान्य जनतेला मुघलाची सत्ता नकोशी वाटत होती. अशा स्थितीमध्ये

स्वराज्याचा उदय ही राजकीय आणि सामाजिक दृष्टीने महत्त्वाची घटना ठरली. यामुळे महाराष्ट्राचे जीवन आतून बाहेरून बदलण्यास सर्वतोपरी मदतच झाली. सर्व सामान्यांना स्वराज्य आपलेसे वाटू लागले. स्वातंत्र्यातील मोकळा श्वास सर्वसामान्यांनी अनुभवला. महाराष्ट्रामध्ये सर्वसमावेशक मराठी माणसांची सत्ता आली, याचा सर्वदूर आनंद झाला. सामान्यांनी या राजसत्तेचे स्वागत केले. त्याबरोबर उच्चवर्णीय सरदार, वतनदार, श्रीमंत मराठा यांना दु:ख झाले. याच भावनेने अखेर पर्यंत या मंडळींनी स्वराज्यास मदत केली नाही. उलट शिवाजी महाराज-संभाजीराजे यांना विरोधच करत राहिले, असे राजकीय प्रसंग समाजामध्ये घडत असतात.

'स्वराज्य' स्थापना तत्कालीन सामाजिक-राजकीय परिस्थितीची प्रतिक्रिया होती. त्याचबरोबर राजकारणात मुत्सद्दीपणाने मुरलेल्या भोसले घराण्याचे स्वप्न होते. सर्व सामान्यांनी स्वराज्याचे स्वागत, संगोपन आणि रक्षण केले. त्याचबरोबर प्रस्थापित लोकांनी परकीय सत्तेची गुलामी स्वीकारली आणि स्वकियांच्या स्वतंत्र विचारसरणीच्या स्वराज्याला प्राणपणाने विरोध केला. स्वराज्य जसजसे उभे राहू लागले तसतसे विरोधकही नाहीसे झ ाले. स्वराज्याने सामान्य माणसाला आपले समजले. त्यांच्या न्याय्य हक्कांसाठी लढा दिला, संघर्ष केला आणि समाजातील धनदांडग्यांना शासन केले. त्यांना योग्य मार्गावर आणले.

'स्वराज्य' ही न्याय, स्वातंत्र्य, मानवी हक्काची सामाजिक-राजकीय प्रक्रिया होती, ती घटना नव्हती. समाजाच्या अंतिम घटकांना विकसित करण्याचा प्रयत्न शिवाजी महाराज व त्यांच्या वारसदारांनी केला. आजच्या समाजाचे विकसित स्वरूप हे स्वराज्याचे फलित आहे. आधुनिक समाजाच्या निर्मितीची समग्र मुल्य स्वराज्याच्या मुल्य व्यवस्थेत आहेत हेही आवर्जून लक्षात घ्यावे लागेल.

संभाजीराजे हे स्वराज्यातील उमदे व्यक्तिमत्व, मनास भारावणारे, प्रेरणा देणारे आणि न्याय-नैतिकतेचा आदर्श देणारे. त्यांचा पराक्रम, शौर्य आणि प्रशासन व्यवस्था

मानवी मनाला प्रेरणा देणारी आहे. तशीच अभ्यासकांच्या चिंतनाचा, अभ्यासाचा आणि संशोधनाचा विषय आहे. 'संभाजीराजे' या शब्दातच अफाट शक्ती असून मरगळलेल्या मनाला नवी उभारी देण्याचे सामर्थ्य त्यांच्या नावात आहे. अर्थात या नावाला प्रेरणेचे वलय निर्माण झाले, त्यांच्या विचार मूल्यांनी, नैतिक मूल्यांनी निर्माण झालेली होती. याबाबत अभ्यासकांचे एकमत आहे.

संभाजीराजांच्या व्यक्तिमत्वाचा, राजकीय कार्यपद्धतीचा प्रभाव समाज मनावर सर्वदूर पसरला होता. त्याचप्रमाणे त्यांच्या कार्यप्रणालीला विरोध करणारी संकूचित मनाची स्वार्थी मंडळीसुध्दा होती. राजसत्तेच्या प्रभावी व्यक्तिमत्वाला नैतिक मूल्यांनी जिंकता येत नाही. तेव्हा अनैतिक मार्गाचा आधार घेऊन विरोधक मंडळी महान व्यक्तिमत्त्वाला, त्यांच्या विचार मूल्यांना बदनाम करण्याचा सर्वतोपरी प्रयत्न करतात. पण काळाला आणि समाज मनाला सर्वकाळ फसविता येत नाही. याचा प्रत्यय आज संभाजीराजे यांच्या व्यक्तिमत्त्वाचा शोध अभ्यासक ज्या मूल्यांच्या आधारे घेत आहेत त्यावरून स्पष्ट होते.

संभाजीराजांच्या व्यक्तिमत्त्वाचा राज्यव्यवस्थेचा, न्यायव्यवस्थेचा, विस्तृत शोध प्रस्तूत प्रबंधात घ्यावयाचा असून त्याची मांडणी विस्तृतपणे करावयाची आहे. या मांडणीमध्ये नव्या पुराव्यांच्या आधारे नवे विचार मांडले जाणार असून पूर्व मांडणी खंडण-मंडण, विश्लेषण, चिकित्सा इत्यादी घटकांच्या माध्यमातून संभाजीराजांच्या एकूण कार्याचा अभ्यास अपेक्षित आहे.

## १.१ साधन चिकित्सा

'छत्रपती संभाजीराजे यांचा राज्यकारभार : एक अभ्यास' या प्रस्तुत संशोधन विषयाचा चिकित्सक अभ्यास करण्यासाठी विविध स्वरूपाच्या प्राथमिक व दुय्यम साधनांचा वापर करण्यात आला आहे. तसेच भौगोलिक दृष्टीकोणातून राज्यव्यवस्थेवरील परिणामांचा, किल्ल्यांच्या कारभाराचा, ग्राम कारभाराचा, प्रदेशांच्या कारभाराचा, मंत्रीमंडळाच्या कारभाराचा सूक्ष्म अभ्यास केलेला आहे.

तसेच प्रस्तुत विषयावरील संशोधन करत असताना विविध ऐतिहासिक साधन संग्रहाचा चिकित्सापूर्वक अभ्यास केला आहे. यासाठी विविध संशोधन संस्थांना भेटी देऊन महत्वाची साधने मिळवून त्याचा अभ्यास करण्यात आला. भारत इतिहास संशोधन मंडळातील दप्तरांचा अभ्यास करण्यात आला आहे. ज्या अभ्यास केंद्रातून संदर्भ साधने प्राप्त झाली त्या केंद्रांची नावे पुढील प्रमाणे:

१. भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे

२. प्राच्यविद्या मंदिर आणि संशोधन संस्था, पुणे.

३. वि.का.राजवाडे इतिहास संशोधन मंडळ, धुळे मराठवाडा शासकीय ग्रंथालय, औरंगाबाद.

४. राजर्षी शाहू महाराज अभ्यास व संशोधन केंद्र, कोल्हापूर.

वरील विविध संशोधन मंडळांना व ग्रंथालयांना प्रत्यक्ष भेट देवुन संभाजीराजांची असलेली लिखित साधने संग्रहीत करून त्यांचा अभ्यास केला. ह्या साधनामध्ये मोगलकालीन साधनांचाही अभ्यास करण्यात आला आहे. यामध्ये बसातिन-उस-सलतिन, अकबरनामा, मुहंमदनामा इत्यादी साधनांचा अभ्यास केला. यामुळे शिवाजी महाराज व संभाजी यांची राज्यव्यवस्था तौलनिकदृष्ट्या अभ्यासण्यास मदत झाली. यामुळे संभाजीकालीन राज्यव्यवस्थेचे निष्कर्ष काढणे अधिक सोपे व वस्तुनिष्ठ झाले.

संस्कृत संदर्भ साधनांमध्ये परमानंद स्वामीकृत 'शिवभारत' ऐतिहासिक पत्र व्यवहार, मराठी रियासत उग्रप्रकृती संभाजी, ऐतिहासिक घराण्याच्या वंशावळी, चित्रगुप्त विरचित शिवाजी महाराजांची बखर, कृष्णाजी सभासद विरचित शिव छत्रपतींचे चरित्र बखर, शिव छत्रपती महाराजांचे सप्तप्रकरणात्मक चरित्र. अमात्य पंत बावडा दप्तर, शिवापूर दप्तरातील शकावली-सहा कलमी शकावली,इंग्रज, डच, पोर्तुगीज, अधिकाऱ्यांचा पत्रव्यवहार, दैनंदिन डायऱ्या, बातमीपत्रे आणि इंग्लंडच्या सरकारला पाठविलेला वृत्तांत,

जेधे शकावली, आज्ञापत्र, इत्यादी प्राथमिक साधनांचा अभ्यास, प्रस्तुत प्रबंध लेखनासाठी करण्यात आलेला आहे.

दुय्यम संशोधन साधनांमध्ये वि. का. राजवाडे, वा.सी. बेंद्रे, जयसिंगराव पवार, ग्रँड डफ यांचे लेखन, वर्तमानपत्रातील लेख, मोजक्या कादंबऱ्या आणि विविध विद्यापीठांना सादर करण्यात आलेले शोधप्रबंध इत्यादींचा उपयोग करण्यात आलेला आहे. या साधनांच्याद्वारे मिळविण्यात आलेली माहिती जशीच्या तशी न स्वीकारता तर्काच्या आधारे आणि इतिहास संशोधनांच्या कसोट्या लावून स्वीकारण्यात आलेली आहे. ज्या अभ्यासकांचे संदर्भ स्वीकारण्यात आलेले आहेत, त्यांच्या नावाच्या ग्रंथांचा उल्लेख नोंदविण्यात आलेला आहे.

## १.२ संशोधन विषयाचे महत्व

मराठ्यांच्या इतिहासावर विपूल प्रमाणात लेखन झालेले आहे. या लेखनामध्ये शिवाजी महाराज यांच्या अनुषंगाने अधिक लेखन झाले आहे पण शिवाजीपुत्र संभाजीराजे यांच्यावर स्वतंत्रपणे अपवाद वगळता (वा.सी.बेंद्रे) न्याय देणारे लेखन झालेले नाही. ज्यांनी लिहिण्याचा प्रयत्न केला, त्यांनीही बखरकारांच्या भाकडकथांनाच प्रमाण मानून आपली मते मांडण्याचा प्रयत्न केला आहे. या मतांचा आढावा घेऊन, मतांची चिकित्सा करुन वस्तुनिष्ठ घटनांचा शोध घ्यावयाचा असून त्याद्वारे संभाजीराजे यांचे न्यायपूर्ण चरित्र, राज्यव्यवस्था, लोकसंबंध, मंत्रीमंडळातील संबंध, पिता-पुत्र संबंध यावर नव्याने प्रकाश टाकण्यात येणार आहे.

संभाजीराजे हे व्यक्तित्व बहुआयामी स्वरुपाचे होते. लहानपणापासूनच राजकीय धडे अनुभवातून मिळाले होते. जिजाऊ-शिवाजी महाराज या दोघांचा सहवास आणि संस्कार त्यांच्यावर झाले होते. शहाजीराजे यांच्या कर्तृत्वाचा आदर्श समोर होता. अशा वातावरणात वाढलेल्या संभाजीराजांच्या व्यक्तिमत्वाचा, विचारांचा शोध घेणे ही

ऐतिहासिकदृष्ट्या महत्वाची घटना असेल. नव्या समाजनिर्मितीसाठी, तरुणांच्या पुढील आदर्शासाठी हा अभ्यास महत्त्वपूर्ण आहे.

संभाजीराजे संस्कृत पंडित होते. धर्मशास्त्र जाणत होते. त्यांचा 'बुध्दभुषण' हा ग्रंथ वाङ्मयीनदृष्ट्या उच्च दर्जाचा आहे. साहित्य क्षेत्रातील श्रेष्ठ कलाकृती म्हणूनही या ग्रंथाला अनन्यसाधारण महत्त्व आहे. या दृष्टीने मध्ययुगीन साहित्यमूल्य, स्वरुप, सामाजिक रीती-रिवाज, परंपरा व वर्गसंघर्ष समजून घेण्यास हा अभ्यास महत्त्वपूर्ण आहे. संभाजीराजे उत्तम प्रशिक्षक होते, लोकहितदक्ष होते. प्रजेप्रती त्यांच्या मनात सुह्दयता होती. लोकांना त्यांच्याबद्दल अपार प्रेम होते. उत्तम जलव्यवस्थापक, प्रशासक आणि न्यायावर अपार श्रद्धा असणारे राजे होते. या मूल्यांचा आजच्या भारतीय राज्य व्यवस्थेला खूप उपयोग होईल, असे असल्यामुळे आजच्या काळात संभाजीराजांच्या राज्यव्यवस्थेच्या अभ्यासाची खूप गरज असल्याचे जाणवते. याच भावनेतून अभ्यासासाठी प्रस्तुत विषय निवडण्यात आलेला आहे.

## १.३ संशोधनाच्या उद्दिष्टांची पूर्तता

१. मध्ययुगीन व्यापारांचे मार्ग व व्यापारांच्या साधनांची उपलब्धता याचा मानवी जीवनावर झालेला परिणाम, यांचा अभ्यासात्मक आढावा घेण्यात आलेला असून,आधुनिक व्यापार व्यवस्थेवरील त्यांचा अनुकूल-प्रतिकूल परिणामाचा अभ्यासात्मक शोध घेऊन निष्कर्ष नोंदविण्यात आलेले आहेत.

२. सतराव्या शतकातील मुघल साम्राज्याची शासनव्यवस्था, सत्ता, संपत्ती, साम्राज्य आणि सरदारांचे हितसंबंध जोपासणारी होती. तर संभाजीराजे यांची राज्यव्यवस्था रयत केंद्रीत आणि तिचे हितसंबंध जोपासणारी होती. मध्ययुगीन आदर्श राज्यव्यवस्था म्हणून या राज्यव्यवस्थेचा नावलौकिक होता.

३. सर्व काळातील मानवी मनाची सत्ता लालसा आणि संघर्ष संभाजीराजे यांच्या काळातही पहावयास मिळतो. या प्रवृत्तींना रोखण्याचे कार्य राजांनी ज्या पद्धतीने केले, त्या व्यवस्थेमुळे स्वराज्याचे उद्दिष्ट सफल होण्यास मदत झाली आहे याचा प्रत्यय येतो.

४. संभाजीराजांचे बहुश्रृत व्यक्तिमत्व महाराष्ट्राच्या जीवनावर यशस्वी प्रभाव पाडताना दिसते. त्यांच्या प्रभावांच्या प्रेरणा समजून घेऊन तत्कालीन तरूण, सर्वसामान्य माणूस आपले जीवन समृद्ध करून घेताना दिसतो.

५. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर स्वराज्याच्या राज्यकारभारात गोंधळ आणि अस्थिरतेची पोकळी निर्माण झालेली होती, या समस्येला संभाजीराजे ज्या पद्धतीने सामोरे जातात ते धैर्य अनुभवी राजाकडेच असू शकते. असे धैर्य संभाजीराजांकडे दिसते.

६. सतराव्या शतकातील सांस्कृतिक, सामाजिक जीवन ज्या मूल्यांवर उभे राहात होते. त्या मूल्यांच्या केंद्रस्थानी समता, न्याय, स्वातंत्र्य आणि स्त्री सन्मान इत्यादी मूल्ये होती.

७. सतराव्या शतकातील सरदार घराण्यांमध्ये मुघलांची चाकरी सोडून स्वतःचे राज्य असावे, अशी राजकीय आकांक्षा निर्माण झाली. या आकांक्षाचे राजकीय फलित म्हणजे 'स्वराज्य' होय. स्वराज्याच्या माध्यमातून समाजजीवनात सांस्कृतिक, राजकीय, सामाजिक, वाङ्मयीन आणि मानवीमूल्ये इत्यादी क्षेत्रात आमुलाग्र परिवर्तन झाले.

## १.४ संशोधन विषयाच्या गृहितकांची पूर्तता

संभाजीराजांचे व्यक्तिमत्व आणि कार्य समाजहिताच्या दृष्टीने मोलाचे आणि व्यापक स्वरूपाचे होते. वयाच्या ९ व्या वर्षापासून ते राजकारणांचा अनुभव घेत होते.

त्यांच्या वडिलांच्या कार्यकाळात त्यांचे कार्यकर्तृत्व आकार घेत होते. त्यांच्या पराक्रमाची उंची मोठी होती. शिवाजी महाराज सर्वेसर्वा असल्यामुळे चरित्राचे नायक म्हणून त्यांच्या इतिहासाची चर्चा अधिक झाली. त्या तुलनेत संभाजीराजांच्या कार्याची चर्चा शिवाजी महाराजांच्या काळात फारशी झाली नाही. पण संभाजीराजांचे कार्यही मोलाचे होते. स्वराज्याला अधिक बळकटी देणारे होते.

शिवाजी महाराजांच्या पिढीत वाढलेले लोक, वयाच्या अहंकारामुळे संभाजीराजांची योग्यता आणि गुणवत्ता असतानाही त्यांना मान-सन्मान देण्यास तयार नव्हते. किंबहुना त्यांच्याबद्दल शिवाजी महाराजांना अधिकचे सांगत असत. त्यांच्या मनात किंतु निर्माण करण्याचे काम करत, इत्यादी सर्व राजकीय बाबींमुळे संभाजीराजांचे व्यक्तिमत्व असंख्य आरोपाने मलीन करण्यात आले असल्यामुळे पूर्वसुरींच्या इतिहास लेखनाचा आधार घेऊन आधुनिक इतिहासकारांनीही संभाजीराजांची अशीच प्रतिमा रंगवली आहे. या बाबींचा भारतीय इतिहासावर खूप विपरित परिणाम झाल्याचे दिसून येते.

संभाजीराजांची स्वच्छ प्रतिमा संशोधनातून रेखाटण्याचा प्रयत्न प्रस्तुत प्रबंधात केलेला आहे.

१. शिवाजी महाराजांना पहिल्या तीन मुली झाल्यानंतर संभाजीराजांचा जन्म झाला. स्वाभाविक पहिला मुलगा असल्यामुळे कुटुंबात त्यांचे कौतुक झाले, बालपण लाडात गेले.

२. संभाजीराजांच्या आईचे निधन झाले. यामुळे संभाजीराजे मातृछत्राला मातृप्रेमाला मुकले. आईची जागा कोणासही भरून काढणे शक्य नव्हते, जिजाऊ-शिवाजी महाराज यांनी संभाजीराजांना खूप प्रेम दिले.

३. संभाजीराजांना वयाच्या ९-१० वर्षापासून प्रत्यक्ष राजकारणाचे धडे शिवाजी महाराजांनी आपल्या देखरेखीखाली दिले होते. त्यांच्या नावाने मनसबदारीसुद्धा मिळविली होती.

४. संभाजीराजे स्वराज्याच्या कारभारात लक्ष घालत असत. मंत्र्यांच्या कारवाया, भ्रष्टपणा व स्वार्थी स्वभाव ओळखून त्यांना सूचना दिल्या, वेळप्रसंगी शिवाजी महाराजांना सांगितले.

५. शिवाजी महाराजांच्या मृत्युनंतर राज्य कारभाराची सूत्रे संभाजीराजे यांनी स्वतःच्या हातात घेतली. स्वकुटूंबाची सुव्यवस्था लावली, राज्याची व्यवस्था लावली. आपल्या आयुष्यात राजेपद भुषवितांना स्वराज्यात वाढ केली आणि स्वतःचा नावलौकिक निर्माण केला. त्याचबरोबर त्यांनी उत्तम प्रशासन केले, सर्वसामान्यांना न्याय दिला.

६. संभाजीराजांना अखेर फितुरीमुळे पकडण्यात आले. औरंगजेबाने त्यांना ठार मारले. पण मराठा सत्तेला संपविण्याचे त्याचे स्वप्न अपुरेच राहिले.

## १.५ समस्या विधानाची पूर्तता

संभाजीराजे यांना वयाच्या ९ व्या वर्षापासून राज्य कारभाराचे धडे देण्यात आले होते. त्यांना सर्वप्रथम आग्ऱ्याला औरंगजेबाच्या दरबारात भेटीसाठी शिवाजी महाराज घेऊन गेले. पलायनाच्या वेळी सहा-सहा महिने राजधानीपासून दूर राहिले. पुढे असंख्य अडचणींना तोंड देत रायगडावर पोहोचले. हा त्यांच्या जीवनातील पहिला राजकीय प्रसंग होता. पुढे अनेक मोहिमांमध्ये त्यांनी भाग घेतला. परकीय वकिलाशी व्यवहार केले, सरदार व नोकर यांना महत्वाच्या सूचना व सल्ले दिले.

शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर अचानक उद्भवलेल्या स्वराज्यातील संकटाला धैर्याने तोंड दिले. भ्रष्ट मंत्र्याच्या कारवाई मोडून काढल्या, स्वराज्याला एकसंघ ठेवण्याचे कार्य केले. स्वराज्याला मिळालेला उत्तराधिकारी उत्तम प्रशासनाची जाण असणारा, कुशल नेतृत्व गुण असणारा होता. इतके मात्र संभाजीराजे यांच्या कार्यकर्तृत्वावरून समजते.

## १.६ संशोधन पद्धती

"छत्रपती संभाजीराजे यांचा राज्यकारभार: एक अभ्यास" या संशोधनात्मक प्रबंध लेखनासाठी ऐतिहासिक, विश्लेषणात्मक, समीक्षणात्मक आणि संश्लेषणात्मक संशोधन पद्धतीचा उपयोग केला आहे आणि हाती आलेले निष्कर्ष नोंदविण्याचा प्रांजळपणे प्रयत्न केलेला आहे.

**प्रकरण योजना**

'छत्रपती संभाजीराजे यांचा राज्यकारभार: एक अभ्यास' या संशोधनपर विषयाची मांडणी एकूण पाच प्रकरणात केलेली आहे. शेवटचे पाचवे प्रकरण अभ्यासांती हाती आलेल्या निष्कर्षावर आधारित आहे. शेवटी महत्वाची परिशिष्टे जोडलेली आहेत. पुढील प्रमाणे प्रकरणाचे स्वरूप आहे:

**प्रकरण पहिले**

**संभाजीराजे यांचा जन्म, बालपण, शिक्षण आणि राज्यकारभारात प्रवेश**

शिवाजी महाराजांनी स्वराज्य निर्माण केले. त्याचा मोठा मुलगा म्हणजे संभाजीराजे या नात्याने ते स्वराज्याचे उत्तराधिकारी होते. त्यांचा जन्म पुरंदर किल्ल्यावर झाला. हा किल्ला शिवाजी महाराजांच्या अधिपत्याखाली येत होता. संभाजीराजांचे बालपण सामान्य मुलाप्रमाणे गेले नाही. कारण त्यांच्या आईचे अकाली निधन झाले. त्यांचे शिक्षण जिजाऊ-शिवाजी महाराज यांनी पगारी शिक्षक नियुक्त करून दिलेले असणार, या बाबतचे लिखित पुरावे उपलब्ध होत नाहीत. यासाठी तर्काचा आधार घ्यावा लागतो.

स्वराज्याचा उत्तराधिकारी असल्यामुळे शिवाजी महाराजांनी त्यांच्या राज्यकारभाराच्या प्रत्यक्ष शिक्षणाची व्यवस्था वयाच्या ९ व्या वर्षापासून केलेली दिसते. आग्र्याच्या भेटीच्या राजकीय प्रसंगामधून त्यांच्या राज्यकारभाराचा प्रत्यक्ष प्रवेश झाला असे म्हणता येईल. पुढे व्यापक राज्यकारभार त्यांनी यशस्वीपणे पाहिला असल्याचे दिसते.

**प्रकरण दुसरे**

**संभाजीराजे यांचे अनुभव आणि स्वराज्य निर्मितीतील योगदान**

संभाजीराजे यांचे शिक्षण उत्तम प्रकारे जिजाऊ-शिवाजी यांच्या नेतृत्वाखाली झालेले होते. स्वराज्याची वाटचाल यशस्वीपणे चालू होती. संभाजीराजांना स्वराज्याचे उत्तराधिकारी म्हणून जिजाऊ-शिवाजी महाराजांसह सर्व पाहत होते. या बाबींचा विचार करता त्यांना लिहिणे-वाचणे या अक्षरज्ञान शिक्षणाबरोबर राज्यव्यवस्थेचे शिक्षण दिले गेले होते. संभाजीराजे जिजाऊ-शिवाजी महाराजांप्रमाणे कुशाग्र बुध्दीमत्तेचे धनी होते. त्यांनी युध्दात्मक व राज्यव्यवहाराचे शिक्षण फार तत्पर आत्मसात केले.

संभाजीराजांना आयुष्यांच्या ९ व्या वर्षापासून राजव्यवहाराचे, राजनैतिकतेचे चांगले व वाईट अनुभव येत होते. शिवाजी महाराज राजदरबारात आपल्या सिंहासनाच्या खाली संभाजीराजे, जिजाऊ आणि मंत्र्यांची सिंहासने असत. आगऱ्यासारख्या अवघड धोक्याच्या मोहिमांवर त्यांना घेऊन गेले. दरबारात येणाऱ्या परकीय वकिलांचे प्रश्न घेऊन सोडविण्यासाठी काम पाहत होते. अनेक युद्धावर प्रत्यक्षपणे लढाईत सहभाग घेतला होता. त्यांनी अनुभव घेतला. स्वराज्य निर्मितीस त्यांचे योगदान खुप मोलाचे व महत्वपूर्ण आहे.

**प्रकरण तिसरे**

**संभाजीराजे यांचा राज्यकारभार आणि मुत्सद्यांची कटकारस्थाने**

संभाजीराजे प्रत्यक्षपणे शिवाजी महाराजांच्या दरबारात कारभार पहात होते. शिवाजी महाराजांच्या अनुपस्थितीत मंत्र्यांना सूचना देणे, व्यवहार पाहणे, परकीय वकिलाचे म्हणणे ऐकणे याबाबतची सविस्तर माहिती शिवाजी महाराजांनी स्वतः संभाजीराजे सांगत असत. पुढे इ.स. १६६१-६२ च्या दरम्यान संभाजीराजे प्रत्यक्षपणे काही राजव्यवहारातील निर्णय घेताना दिसतात. त्यांनी घेतलेले निर्णय जनतेच्या हिताचे असत. पण मंत्र्यांना त्यांचा हस्तक्षेप मान्य नसे. कारण मंत्री भ्रष्ट असल्यामुळे जनतेची फसवणूक करत. या मंत्र्यांनी

संभाजी महाराजांच्या विरोधात खोटी तक्रार करण्यास सुरूवात केली. यामुळे शिवाजी महाराज अस्वस्थ होऊ लागले. शिवाजी महाराजांना मंत्र्यांच्या स्वभावाचा अंदाज होता पण त्यांना दुखविणे त्यावेळी योग्य ठरणारे नसल्यामुळे महाराजांनी संभाजीराजे यांची नियुक्ती अन्य कामगिरीवर केली.

शिवाजी महाराजांच्या मृत्यू दरम्यान म्हणजे इ.स. १६८० ला कट कारस्थानात मंत्री काही अंशी यशस्वी होताना दिसतात. पण संभाजीराजांच्या जागृतीमुळे त्यांना फारसे यश मिळाले नाही. मात्र संभाजीराजेंचे व्यक्तिमत्व नैतिकदृष्ट्या छिन्नविछिन्न करण्यात मंत्री पूर्णपणे यशस्वी झाले. असे इतिहासावरून म्हणता येईल.

## प्रकरण चौथे

## संभाजीराजे यांचे स्वराज्यरक्षण आणि एकाकी झुंज

शिवाजी महाराजांच्या मृत्युनंतर संभाजीराजे सत्तेवर आले. त्यांना स्वराज्यामधील अस्थिरता नाहीशी करून स्थिरता आणावी लागणार होती. एका बाजूला मराठा मंत्र्यांचे आपापसातील वैर, स्वार्थी वृत्तीने नेतृत्वाची निवड करण्याचे धोरण तर दुसऱ्या बाजुला औरंगजेबासारखा मातब्बर शत्रू स्वराज्यावर चालून येण्याचे मनसुबे रचत होता. या दोन्ही बाजुंनी अडचणीत सापडलेल्या स्वराज्याला सावरणे हे संभाजीराजांपुढील महत्त्वाचे आव्हान होते. त्यांनी अत्यंत संयमाने व सावधपणाने हे संकट परतावून लावले. आप्त शत्रूंना तोंड देतांना स्वराज्याचे नुकसान होणार नाही, याची काळजी घेतली. मंत्र्यांच्या वागण्याकडे थोडा काळ दुर्लक्ष केले आणि संधी येताच त्यांचा योग्य तो बंदोबस्त केला. औरंगजेबालाही पुढे आठ वर्षे झुलवत ठेवले. त्यांनी औरंगजेबाच्या सत्तेला वारंवार हादरे दिले.

संभाजीराजे शिवाजी महाराजानंतर एकाकी पडले. मंत्र्यांच्या स्वार्थी कारवायांमुळे स्वराज्याची मानसिकदृष्ट्या दुफळी झाली होती. जो तो आपले हित साधण्याच्या संधीची

वाट पाहत होता. सर्वत्र अविश्वासाचे वातावरण निर्माण झाले होते. या परिस्थितीत संभाजीराजे अहोरात्र स्वराज्य रक्षणाचे प्रयत्न करत होते. या प्रयत्नाला यश प्राप्त झाले. त्यांनी या काळात ज्या मोहिमा आखल्या आणि अमंलात आणण्यासाठी प्रयत्न केले त्या सर्व यशस्वी झाल्या. औरंगजेबाचा मुलगा अकबर याला संभाजीराजांनी दिलेला आश्रय आणि केलेले सहकार्य औरंगजेबाचे साम्राज्य नष्ट करण्यास कारणीभूत ठरले. यातच मराठेशाहीच्या विस्ताराची भरभराटीची बीजे रोवली आहेत.

**प्रकरण पाचवे**

**उपसंहार**

प्रस्तुत प्रकरणामध्ये अभ्यासांती हाती आलेले निष्कर्ष नोंदविले आहेत. या निष्कर्षानुसार काही शिफारशी करण्यात आलेल्या आहेत. स्वराज्याच्या राज्यकारभाराचे संभाजीराजांच्या दृष्टीने मूल्यमापनही करण्याचा प्रयत्न केलेला आहे.

संभाजीराजे हे शिवाजी महाराजांच्या तीन मुलींच्या नंतर झालेले चौथे अपत्य होते. स्वराज्याचा वारस असल्यामुळे शिवाजी महाराज राणी सईबाई यांना संभाजीराजेंबाबत प्रेम, आपुलकी होती. त्याच्या संसार वेलीवरचा पहिला पुत्र असल्यामुळे आई-वडिलांना आनंद होणे स्वाभाविक होते. जिजाऊ यांना आपल्या नातवाबद्दल विशेष प्रेम असल्याचे दिसते. यामागील महत्वाचे कारण म्हणजे शिवाजी महाराजांचा मोठा भाऊ संभाजी महाराज अर्थात शहाजीराजे आणि जिजाऊ यांना शिवाजी महाराजांपूर्वी एक मोठा मुलगा होता. त्याचे नाव संभाजीमहाराज होते. त्यांचा विवाह इ.स. १६२९ मध्ये शिवनेरी किल्याचे किल्लेदार विजय विश्वासराव यांच्या जयंतीबाई उर्फ जैताबाई यांच्याशी झाला होता. शहाजी पुत्र संभाजीचा मृत्यु युद्धामध्ये झाला. याचे दुःख शहाजीराजे-जिजाऊ यांना फार झाले. त्यांच्या स्मृती ताज्या राहाव्या म्हणून शिवाजीपुत्राचे नाव 'संभाजी' ठेवले.

भोसले घराण्याचा इतिहास प्रामाणिकपणाचा, माणुसकीचा आणि पराक्रमांचा आहे. या संपूर्ण कुळाला पूर्वीपासून अगदी बाबाजीराजे-मालोजीराजे यांच्याही पूर्वीपासून समाजाच्या दु:खाची जाणीव असताना दिसते. या कुळातील वीरपुरूष सरदारकी उपभोगत असताना सामान्यातल्या सामान्य माणसाचे कर्तृत्व पाहून त्यांनाही योग्यतेनुसार मानाच्या जागा दिल्या. मोहित्यांच्या घराण्याला वसंतगडाची जहागिरी शहाजीराजांनीच मिळवून दिली होती. अशी ही परोपकारी भोसले मंडळी होती. मराठा-मुघल सरदार, बादशहा या घराण्यातील वीरपुरूषांना मान-सन्मान देत असत. भोसले घराण्याने कधीही स्वार्थीपणाचे राजकारण केले नाही. स्वत:च्या स्वार्थापेक्षा प्रदेशाचे, बादशहाचे रक्षण करण्यात धन्यता मानली. हे सत्य असले तरी त्यांच्या मनामध्ये स्वतंत्र राज्यनिर्मितीचे विचार येत होते. त्यांना परकीय सत्तेची चाकरी नकोशी वाटत होती. याचाही प्रत्यय येतो. राज्यनिर्मितीच्या दृष्टीने शहाजीराजांनी बराचसा प्रयत्न केलेला होता.

शहाजीराजांप्रमाणे शिवाजी महाराजसुद्धा पराक्रमी, शूर आणि कर्तबगार होते. स्वराज्याची निर्मिती, वाढ , रक्षण आणि सर्वसामान्यांना बरोबर घेऊन जाण्याची अभूतपूर्व कामगिरी महाराजांनी आयुष्यभर पार पाडली. महाराजांप्रमाणे स्वराज्याला उत्तराधिकारी म्हणून संभाजीराजांच्या रूपाने पराक्रमी, शूर, सामान्यांबद्दल करूणा असणारे नेतृत्व लाभले. त्यांच्या जन्मापासून अंतापर्यंत विस्तृत आढावा प्रस्तुत प्रबंधात घ्यावयाचा आहे.

### १.७ संभाजीराजे यांचा जन्म

शहाजीराजे-जिजाऊ यांनी इ.स. १६४१ च्या सुमारास वणगोजी नाईक-निंबाळकर पवार यांच्या नातीशी शिवाजी महाराजांचा पहिला विवाह लावून दिला. महाराजांच्या पहिल्या पत्नीचे नाव 'सईबाई' होते. या सुस्वरूपी, शांत, स्वभावी व राजघराण्याचे रितीरिवाज जाणणाऱ्या होत्या, शहाजीराजे-जिजाऊ यांच्या मर्जीतील होत्या. शिवाजी महाराज-सईबाई यांना पहिल्या तीन मुली झाल्या. त्यांची अनुक्रमे नावे अशी सखुबाई, राणुबाई आणि अनामिका किंवा अंबिकाबाई होती. सईबाईचे चौथे व शेवटचे अपत्य

म्हणजे 'संभाजीराजे' होय. त्यांचा जन्म शके १५७९ हेमलंबी संवत्सरे जेष्ठ शुद्ध द्वादशीस गुरूवारी घटिका दहाला झाला. संभाजीराजे यांच्या जन्माची नोंद वा.सी. बेंद्रे यांनी नोंदविलेली आहे ती पुढीलप्रमाणे, "सईबाईचे शेवटचे अपत्य म्हणजे युवराज संभाजी शके १५६९ हेमलंबी संवत्सरे जेष्ठ शुद्ध द्वादशीस गुरूवारी घटिका दहा (१४ मे १६५७) संभाजी राजे पुत्र झाले. पुरंधरी उपजले. "[१] वा.सी. बेंद्रे यांची नोंद असल कागदपत्रांतील आहे. यामुळे विश्वसनीय आहे. अर्थात संभाजीराजांच्या जन्मतिथीबाबत वाद नाही. संभाजी राजांचा जन्म भोसले कुळात झाला. याचा सर्वत्र आनंदोत्सव साजरा झाला असेल, याबाबत शंका नाही.

### १.८ संभाजीराजे यांचा जन्म पुरंदर किल्यावर

शिवाजी महाराज-सईबाई यांच्या पोटी संभाजीराजे यांचा जन्म झाला. त्यांचा जन्म पुरंदर किल्ल्यावर झाला. या किल्ल्याला 'पुरंधरी' लिहिण्यांचा प्रघात होता.

### १.८.१ संभाजीराजे यांना तीन बहिणी

संभाजीराजे यांना त्यांच्यापेक्षा मोठ्या तीन बहिणी होत्या. यथावकाश त्यांचे विवाह मराठा सरदार घराण्यात झाले. अनुक्रमे त्यांचे विवाह पुढील घराण्यात झाले. 'सखुबाई' यांचा विवाह निंबाळकर यांच्या घरात झाला. त्यांना सासरी 'सावित्रीबाई' या नावाने संबोधले जात असे. 'राणूबाई' हिचा विवाह जाधव घराण्यात झाला आणि 'अंबिकाबाई' यांचा विवाह 'हरजीराजे महाडिक' यांच्याशी झाला.

शिवाजी महाराजांनी आपल्या तिन्ही मुलींना सरदार घराण्यात देऊन आपल्या स्वराज्यास बळकटी आणली. स्वराज्याच्या विस्ताराच्या आणि उपद्रवाच्या दृष्टीने असे विवाह करणे महत्वाचे होते. पुढे संभाजीराजांच्या कारकिर्दीत त्यांना यांनी सहकार्य केल्याचे दिसून येते.

### १.८.२ सईबाईंचा मृत्यू

संभाजीराजांच्या जन्मानंतर सईबाई आजारीच असल्याचे दिसते. त्यांच्या वयाला दोन वर्ष पूर्ण होतात न होतात तोवर 'सईबाई' यांचा मृत्यू 'प्रतापगड' या माहेराच्या ठिकाणी झाला. संभाजीराजे मातृछायेला पारखे झाले. अशा अवस्थेत त्यांना आईच्या दुधाची गरज होती. यासाठी जिजाऊंनी त्यांच्या पालन-पोषण आणि दुधाची सोय केली. याबाबत गाडे करिन्यात आलेली नोंद पुढीलप्रमाणे आहे ती अशी, "धाराई (गाडे) आवा... तिला...जिजावा आउसाहेब यांचा हुकूम जाला आणि दाई नव्हते म्हणौन दाई केली आणि संभाजीराजे (यास) दुद लाविले. पाजीत असता राजे थोर जाले... आसामी दिधली. धाराई आवा तैनात वरसाची होन रद्द पावत होती."[२] 'सईबाई' आजारी असल्यामुळे त्यांना दूध नसल्यामुळे त्यांच्या दुधासाठी दाई नेमण्यात आली असून तिला वर्षाकाठी २६ होन दिल्याचाही उल्लेख गाडे करिन्यात आलेला आहे.

सईबाईचे निधन अफजलखानाच्या स्वारी दरम्यान झालेले असावे, असे वा.सी. बेंद्रे यांचे मत आहे. 'श्री छत्रपती संभाजी महाराज' या ग्रंथात आपले मत नोंदवितांना म्हणतात, "सईबाई आजारपणामुळे पुरंधरावरून आपल्या माहेरी प्रतापगडावर आली व ती तेथेच अफजलखान वध प्रसंगापूर्वी दोन-सव्वा दोन महिने निवर्तल्याने संभाजीराजे काही दिवस आपल्या आजोळीच होते. शिवाजी महाराजही ११ जुलै १६५९ नंतर आपल्या मातेसह येऊन राहिले असले पाहिजेत. "[३] सईबाई यांचे निधन अफजलखान स्वारी दरम्यान झालेले असावे हे वा.सी. बेंद्रे यांचे मत ऐतिहासिकदृष्ट्या बरोबर आहे. यांनी नोंदविलेली महत्वाची नोंद म्हणजे सईबाई यांच्या अखेरच्या काळात जिजाऊ-शिवाजी महाराज प्रतापगडावर त्यांच्या जवळ असावेत ही ती नोंद होय. यातून महाराजांची कुटूंब वत्सलता, कुटुंबाप्रती कर्तव्याची भावना दिसून येते. त्यांचे श्रेष्ठ पतित्वही स्पष्ट होते.

### १.८.३ संभाजीराजे यांचा जिजाऊ यांना अधिक लळा

संभाजीराजे यांच्यावर जिजाऊ यांच्या संपूर्ण कुटुंबाचा जिव्हाळा, आपुलकी आणि प्रेम होते. याबाबत शंका नाही; पण जिजाऊ यांचे विशेष प्रेम, संस्कार संभाजीराजे यांच्यावर झाले होते. त्यांना जिजाऊ यांचा सहवास अगदी त्यांच्या अखेरपर्यंत (संभाजीराजांना) मिळाला. इ.स. १६७४ ला मृत्यू झाला, तेव्हा संभाजीराजे खूप मोठे झाले होते. संभाजीराजे यांचे नाव ठेवतांनाही जिजाऊ यांनी आपल्या मोठ्या मुलांची स्मृती जतन रहावी म्हणून त्यांचे नाव 'संभाजी' असे ठेवले होते.

संभाजीराजांना सईबाई या जन्मदात्या आईचा फारसा सहवास अन् संस्कार लाभले नाहीत. पण जिजाऊंचा सहवास, संस्कार आणि प्रेम त्यांना दीर्घकाळ लाभले. संभाजीराजेंच्या एकूण आयुष्याची जडण-घडण जिजाऊंच्या मार्गदर्शनाखाली, देखरेखीखाली झालेली होती. जिजाऊ यांच्या संभाजीराजांच्या सहवासाबाबत 'श्री. छत्रपती संभाजी महाराज' या ग्रंथात वा.सी. बेंद्रे यांनी खूप महत्त्वपूर्ण नोंद केली आहे. ती नोंद पुढीलप्रमाणे, "संभाजीराजांस आपल्या मातेचा लाभ फारसा झाला नाही. परंतु त्यांची आजी जिजाबाईसाहेब यांनी त्यांचा अधिक जिव्हाळ्याने सांभाळ केला. शिवाय त्यांच्या बालपणी इतर सापत्न मातांचाही लळा त्यांचेकडे असणे स्वाभाविक होते. इ.स. १६७१ पर्यंत म्हणजे त्यांस पंधरावे वर्ष लागेपर्यंत, शिवाजी महाराजांस दुसरा मुलगा नव्हता व कदाचित संभाजीराजे इतर बहिणींपेक्षा लहानही होते. जिजाबाईचे त्यांचेवर विशेषच प्रेम होते. परंतु शके १५९६ आनंद संवत्सरे जेष्ठ नवमी बुधवारी दोन प्रहरांत रात्री (१७ जून १६७४) मातुश्री जिजाऊ आऊ पाचाडात निवर्तली. त्यानंतर मात्र संभाजीराजांचा आधार नाहीसा झाला. परंतु ते त्या वेळी बरेच मोठे ही झाले होते."[४] संभाजीराजे यांच्या जीवनातील बालपणाच्या अत्यंत भावपूर्ण प्रसंगाचे चित्रमय वर्णन वा.सी. बेंद्रे यांनी केलेले आहे. सईबाईच्या निधनानंतर जिजाऊ, शिवाजी महाराज व अन्य राण्या यांनी संभाजीराजांना भरूभरून प्रेम दिले. अगदी शेवटच्या श्वासापर्यंत प्रेम दिले असे दिसते. बेंद्रे शेवटी आपले मत नोंदविताना म्हणतात, जिजाऊ यांच्या निधनाने संभाजीराजांचा आधार नाहिसा झाला असे म्हणणे संयुक्तिक नसून जिजाऊंच्या निधनाने

मातृतुल्य आजीचा सहवास संपला हे संयुक्तिक होईल. कारण शिवाजी महाराज अन् सावत्र माता संभाजीराजे यांची आपुलकीने वा आस्थेने काळजी घेत होतेच.

**१.८.४ संभाजीराजे यांचे बालपण**

संभाजीराजांचे बालपण सामान्यतः मातृप्रेमापासून वंचित राहिलेले आहे. मातृप्रेम, मातृसंस्कार, मातृस्पंदने हा बालकाच्या जीवनातील महत्वाचा संस्कार सोहळा असतो. मातेच्या नेतृत्वाखाली मानवी मनाची उन्नतावस्था खूप दर्जेदार होण्यास मदत होते. या सर्वाला, संभाजीराजे मुकले होते. सामान्यतः आईच्या प्रेमाची कमी जिजाऊ यांनी भरून काढण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्यांना आपल्या आईची कमतरता भासणार नाही याची काळजी जिजाऊंनी नक्कीच घेतली असणार याबाबत शंका घेण्याचे कारण नाही.

सर्वसामान्य मुलाप्रमाणे बालपणातील खेळ संभाजीराजे आपल्या सवंगड्याबरोबर, बहिणींच्या बरोबर खेळले असणार हे तर्क व अनुमानांनी सूचित होण्यासारखे आहे. त्यांच्या बालपणाचा प्रारंभीचा काळ जन्मानंतर साधारणतः एक दीडवर्षाचा पुरंदरावर गेलेला आहे. 'सईबाई' प्रतापगडावर आल्यानंतर संभाजीराजांचा काही काळ प्रतापगडावर मामाकडे गेलेला असणार, हेही निश्चितपणे सांगता येते. पुढे समज आल्यानंतर जिजाऊ यांनी त्यांना रायगडाच्या पायथ्याशी पाचाडमध्ये आपल्याबरोबर ठेवलेले असणार. संभाजीराजांचे लहानपण त्यांच्या सहवासात गेलेले असणार.

संभाजीराजांच्या बालपणाबाबत अधिकृतपणे फारशा नोंदी झालेल्या नाहीत. पण शिक्षणाचा संपूर्ण कालखंड जिजाऊंच्या सहवासात गेलेला असणार हे नाकारता येणार नाही. त्यांच्या शिक्षणाची उत्तम सोय केलेली होती. याबाबतचे पुरावे सापडतात. त्यांचा विचार पुढे होणार असल्यामुळे अधिक विस्तार या ठिकाणी करत नाही. संभाजीराजांच्या बालपणात त्यांना वयाच्या बारा वर्षापर्यंत कटू परिस्थितीला सामोरे जावे लागले असे मत वा.सी. बेंद्रे आपल्या 'श्री छत्रपती संभाजी महाराज' या ग्रंथात नोंदवितात. ते म्हणतात,

"संभाजीराजाचे बालपण सामान्य गृहसुखालाही मुकलेले दिसते. पहिल्या बारा वर्षाच्या काळात संभाजीराजांवर जशा आपत्ती कोसळल्या तसेच त्यांना अतिशय महत्वाचे असे राजकारणातील व व्यवहारातील कटू पण उत्कृष्ट अनुभव घेण्याचे प्रसंगही प्राप्त झाले. पहिल्या सव्वा दोन वर्षाचा काळ मातृसुखविरहित गेला. त्यानंतरच्या बालपणाचा दोन-तीन वर्षांचा काळ मातेच्या विरहात गेला."[५] तत्कालीन परिस्थितीचा विचार करता धामधुमीचा काळ असल्यामुळे शिवाजी महाराजांचा फारसा सहवास संभाजीराजांना मिळाला नाही हे सत्य आहे. ते मातृप्रेमाला तर नैसर्गिकरित्या मुकलेले होते. यामुळे वा.सी. बेंद्रे यांचे मत ऐतिहासिकदृष्ट्या बरोबर आहे. यातून त्यांना संभाजींराजांना स्वगृहातून प्रेमच मिळाले नाही, असे सूचित करावयाचे नाही हेही आवर्जून लक्षात घ्यावे लागेल.

संभाजीराजांचे बालपण ज्या आनंदात, खेळण्यात-बागडण्यात जावयास हवे होते तेवढे गेलेले नाही. इतकाच वरील विधानाचा अर्थ घ्यावयाचा आहे. त्यांना वयाच्या नवव्या वर्षी आग्र्याला शिवाजी महाराजांबरोबर औरंगजेबाच्या भेटीसाठी जावे लागले, तेव्हापासून त्यांच्या जीवनाला राजकीय धावपळ अपरिहार्य जोडली गेली आहे.

### १.८.५ संभाजीराजे यांचे शिक्षण

मानवी जीवनातील सर्वश्रेष्ठ प्रक्रिया म्हणजे 'शिक्षण' होय. जीवनाची यशस्विता स्वीकारलेल्या कार्याच्या यशस्वितेवर अवलंबून असते. या यशस्वितेसाठी स्वीकृत कार्यक्षेत्राचे अचूक ज्ञान असणे महत्वाचे असते. यासाठी आवश्यक असणाऱ्या क्षमता व्यक्तीजवळ असणे महत्वाचे असते; त्याचबरोबर वारसा हक्काने प्राप्त होणारे संस्कार, सामर्थ्य आणि वडीलधारी माणसे त्यांचे जीवन पुढच्या पिढीला दिले जाणारे संस्कार, इत्यादींवर नव्या पिढीची यशस्वीता अवलंबून असते.

शिवाजी महाराजांच्या जीवनाचा विचार करता त्यांच्यावर उत्तम संस्कार शहाजीराजे-जिजाबाई यांनी केलेले होते. याबरोबर त्यांच्या उत्तम शिक्षणाची सोय सुद्धा

केलेली होती. याचे संदर्भ शिवचरित्रात उपलब्ध आहेत. या दृष्टीने परमानंद स्वामीकृत 'शिवभारत' या ग्रंथातील नोंदी पुढीलप्रमाणे आहेत त्या अशा:[६]

"ततस्तं तनयं वीक्ष्य सगुण सप्तहायनय् |

लिपिग्रहणयोग्योङ यमिति भूषो व्यचिन्तयत्|"

भाषांतर : मग तो गुणवान मुलगा सात वर्षाचा झालेला पाहून मुळाक्षरे शिकण्यास योग्य  झाला आहे असे राजास वाटले.

शिवाजी महाराज सात वर्षाचे झाल्यानंतर शहाजीराजे-जिजाऊ यांनी त्यांच्या शिक्षणास प्रारंभ केलेला आहे. याबाबींचा विचार करता शिवाजी महाराजांनी संभाजीराजांच्या शिक्षणाचा विचारसुद्धा गंभीरपणे केलेला असणार हे निश्चित आहे. कारण स्वराज्य निर्मितीच्या दृष्टीने शिवाजी महाराजांचे व्यक्तिमत्व शहाजी-जिजाऊ घडविताना दिसतात. तर स्वराज्यरक्षण आणि स्वराज्याचा उत्तराधिकारी या दृष्टीने संभाजीराजेंचे व्यक्तिमत्व घडविण्याच्या दृष्टीने शिवाजी महाराज-जिजाऊ यांनी विचार वा प्रयत्न केलेला असणार हे निश्र्चित आहे. वारसा हक्काने प्राप्त झालेल्या बाबींच्या विचारापेक्षा स्वकष्टाने प्राप्त केलेल्या गोष्टींना अधिक महत्त्व भोसले कुळ देत असताना दिसते. यामुळे स्वराज्याचा वारस आणि मराठ्यांचा नेता म्हणून संभाजीराजांकडे पाहिले जात असल्यामुळे त्यांच्या शिक्षणाची उत्तम व्यवस्था शिवाजी महाराज-जिजाऊ यांनी घेतली असणार हे निश्चित आहे.

## १.९  तत्कालीन कागदपत्रे, बखरी आणि संभाजीराजे यांचे शिक्षण

संभाजीराजांच्या शिक्षणासंबंधी माहिती तत्कालीन बखरीमध्ये उपलब्ध होते का ? हे पाहणे महत्वाचे आहे. तत्कालीन माहितीच्या आधारेच त्यांच्या शिक्षणाबाबतची अधिकृत माहिती उपलब्ध होऊ शकते. तर्काच्या आधारे काही मते बनविता येतील पण पुराव्या अभावी तर्कावरील मते केवळ कल्पना ठरतील. यासाठी तत्कालीन काळातील माहितीच्या

आधारे केले जाणारे तर्क अधिक वस्तुनिष्ठ असतील यादृष्टीने विचार केला आहे. सनद ऐतिहासिक पत्रात उपलब्ध असणाऱ्या माहितीच्या आधारे संभाजीराजे यांच्या शिक्षणाबाबतची कल्पना येते. ते मत पुढील प्रमाणे, "केशवभट पुरोहिताने संभाजीला प्रयोगरूप रामायण सांगितले. या श्रवणाची सांगता करून केशवभटाला राजापुर प्रांतातील संगमेश्वर तालुक्यात १६०० लारी भूमी दान देण्यात आली. त्यावेळी १५८९ लारीची ठिकाणे त्यांच्या स्वाधीन करण्यात आली. कोणत्यातरी तांत्रिक अडचणीमुळे त्यावेळी देता न आलेली उरलेली १० १/४ लारीची भूमी त्यांना २७ मार्च १६९२ ला देण्यात आली."[७] सनदीपत्रांच्या वरील नोंदीवरून हे स्पष्ट होते की, संभाजीराजे यांच्या शिक्षणासाठी केशवभट पुरोहित नावाच्या पगारी शिक्षकाची नियुक्ती केली होती. त्यांच्या कामावर प्रसन्न होऊन शिवाजी महाराजांनी त्यांना संगमेश्वर तालुक्यांतील भूमी दान दिली असावी असे सदरच्या दानपत्रावरून बोध होतो.

संभाजीराजे यांच्या शिक्षणाची सोय शिवाजी महाराज व जिजाऊ यांनी संगमेश्वर प्रांतातील केशवभट पुरोहित यांच्याद्वारे केली असल्याची माहिती मिळत असली तरी सदरच्या नोंदीवरून त्यांना कोणत्या विषयाचे शिक्षण दिले जात होते अथवा शिक्षणाचे स्वरूप काय होते हे स्पष्ट होत नाही. या माहितीवरून इतकाच तर्क करता येतो, संभाजी-राजे यांच्या औपचारिक शिक्षणाची खास सोय करण्यात आलेली होती.

मल्हार रामराव चिटणीसकृत बखरीमध्ये संभाजीराजे यांच्या शिक्षणविषयक विपूल माहिती नोंदविण्यात आलेली आहे. त्या माहितीचा आशय पुढीलप्रमाणे नोंदविण्यात आलेली आहे. तो असा, "संभाजीराजेने विद्याभ्यास करावा, त्याला सुशिक्षित करावा म्हणून त्याला घोड्यावर बसणे, शस्त्रविद्या, तालिम, तिरंदाजी यांचे शिक्षण देवविले... आपण राजे व हे राजपुत्र पुढे राज्यास अधिकारी हेच. आपण महाराष्ट्र राज्य आक्रमून धर्मस्थापना केली. ते पुढे वृध्दीस यांचे हाती पावावी. अष्ट प्रधान यातच राजपुत्राची गणना आहे. सर्व अमात्य राजाचा वाम (९) भुज, युवराज, राजपुत्र हा सत्य भूज असे आहे. त्या अर्थी ते सुशिक्षीत असावे म्हणून लेखनादी अभ्यास करविला आणि उत्तम वृद्ध सेवक

समीप ठेविले. दंडनीती, राजधर्म हे सांगविले. राजपुत्रधर्म पितृसेवा मने करावी. जी करणे ती पित्यास संतोष उत्पन्न होय अशी करावी. कोणतेही कर्म पित्यास तिळप्राय विषाद उत्पन्न होय ऐसे करू नये. पित्याची कृपा ज्याजवर असेल त्याजवरी आपण कृपाच करावी. ज्याचे ठायी पित्याचा द्वेष त्याशी आपणही करावा, त्यासी प्रीती करू नये. पित्यांची संतुष्ट होऊन युवराजपद कारभार सांगितला असता गर्वारूढ होऊ नये, संपत्तीचे मदे आणि तारूण्याचे मदे करून उन्मत्ते होऊ नये, पिता माता व भगिनी व बंधु, मित्र वल्लभ थोर थोर प्रतिष्ठित असतील त्या प्रजादिकांचा अपमान करता कामा नये. मोठीही वृद्धी पावला असता पित्याची आज्ञा उल्लंघन करू नये. हाच पुत्राचा धर्म श्रेयस्कर आणि भूषणापेक्षा भूषण होय. बंधुवर्ग असतील त्यात आपण युवराज झालो, कारभार करतो, म्हणून गर्व धरून आपण सर्वांहून अधिक ऐवे कदापि मानू नये. राजाची आज्ञा पालन केली व बंधुची अवगणना केली असा दोहे करून (तो युवराज) पदच्युत होतो... बहुत नम्रत्वे करून सकलगुण संपन्न असोन सर्व मंत्री व सेवक जन उत्तम यांचा सहवास व मुक्ती श्रवण करून राज्यातील माहितगारी व राज्य करण्याच्या युक्ती अवगत करून द्याव्या, त्यांची मान्यता रक्षावी. उत्तम जनांची संगती करावी. नीच व दुर्व्यसनी यांची कदापी मैत्री करू नये. (त्यांचा) सहवास न करावा असे बोध करविले. राजांनी पुत्रास बहुत प्रकारे रक्षावे, मात्र हत्तीस अंकुश नसल्यास तो अनर्गल होतो. सर्वांचे घात करतो. तसेच पुत्र राहिले नाहित आणि लघु मनुष्याची संगती जाली व मदत जाला असता, आपणच राज्य करावे म्हणून इच्छा अनर्गल होतील. तेणे करून राजक्षय होईल. जे मांस-आमिष अमुक स्थळी आहे ऐसे व्याघ्रास कळविल्यावरी त्याचे निवारण होत नाही. तसेच पुत्रांचे निवारण मग करू गेले तरी घडत नाही. यास्तव उत्तम सुशिक्षित, प्रौढसेवक सावध असावे. राजाचे कुळी अनीतीमान पुत्र निर्माण जाला म्हणजे ते राज्य व कुह शीघ्र क्षयास जाते. म्हणोत बहुत नीतीने रक्षिणे तससे रक्षिले आणि मातबर सरकारकून प्रौढ यांजपाशी बसावे, दरबारात बसावे. कारभारात माहिती हात जाणे असे सांगून करवित जावे. श्री. रामदासस्वामी यांचे दर्शन, सहवास करावयास (युवराज संभाजीस) पाठविले होते."[८] 'संभाजीराजे यांच्या शिक्षणाबाबत अत्यंत विस्तृत विवेचन बखरकाराने केलेले आहे. या विवेचनामध्ये पांडित्याचा भाग अधिक असून नितीतत्वांच्या

मूल्यांचा अधिक परामर्श घेतलेला आहे. या मताची थोडी चिकित्सा पुढीलप्रमाणे करता येईल.

### १.१० बखरीतील मत स्वागतार्ह, पण चिकित्सा महत्वाची

बखरीत संभाजीराजांच्या शिक्षणविषयक नोंदविलेले मत स्वागतार्ह आहे. याबाबत शंका असण्याचे कारण नाही. ही नोंद झाली नसती तर संभाजीराजेंच्या शिक्षणाविषयी अधिकृत माहिती उपलब्ध झाली नसती. म्हणून बखरकारांचे ऐतिहासिक ॠण मानावे तेवढे थोडेच आहेत. ॠण मानत असताना त्यांच्या मतांचा स्वीकार चिकित्सा न करता करणे हे ऐतिहासिकदृष्ट्या बरोबर नाही. म्हणुन बखरीतील प्रस्तुत मतांची चिकित्सा करून स्वीकार केल्यास सत्याच्या अधिक जवळ जाता येईल.

### १.११ युद्ध कौशल्ये विषयक शिक्षण मिळाले, पण अक्षर ज्ञानाचा उल्लेख नाही

संभाजीराजे यांना सैनिकी स्वरूपाचे शिक्षण मिळाल्याची नोंद बखरकाराने अधिक विस्ताराने नोंदविली आहे. घोड्यावर बसणे, शस्त्र विद्या, तालिम, तिरंदाजी, इत्यादी शिक्षण दिल्याचे बखरीमध्ये सांगण्यात आलेले आहे, हे वस्तुनिष्ठ स्वरूपाचे असून सत्यही आहे. संभाजीराजे यांच्या जीवनातील पराक्रम, त्यांचे युद्ध कौशल्य आणि शरीरयष्टी पाहता हे मत अधिक विश्वसनीय आणि सत्य असल्याचे स्पष्ट होते. प्रस्तुत नोंदीवरून संभाजीराजे यांना किती लिपी अवगत होत्या त्यांची ज्ञानग्रहण क्षमता कोणत्या स्वरूपाची होती इत्यादी बाबत माहिती मिळत नाही.

संभाजीराजांच्या राजनैतिक शिक्षण आणि युद्ध कौशल्य इत्यादी बाबींची माहिती बखरकाराने दिलेली असली तरी लिपी ज्ञानाची, गणित विषयाची, इतिहास, धर्मशास्त्र, इत्यादी - ज्ञानाविषयीची माहिती बखरकाराने नोंदविलेली नाही. संभाजीराजे यांच्या जीवन कार्यावर प्रकाश टाकल्यास असे दिसते. त्यांनी ग्रंथलेखन केले आहे. गौतम बुद्धांच्या तत्त्वज्ञानाचा गंभीरपणे विचार केलेला होता. संस्कृत ग्रंथ रचना, हिंदी ग्रंथ रचना, इत्यादी पाहता त्यांना उच्च कोटीचे शिक्षण मिळाले असणार याबाबीचा बोध होतो.

## १.१२ नैतिक शिक्षणाच्या अंगाने बखरकारांची अधिक मांडणी

संभाजीराजे यांच्या शिक्षणाविषयी बखरकारांनी केलेली मांडणी सर्वसमावेशक स्वरूपाची असून ती तत्त्वज्ञानाच्या अंगाने व नितीशिक्षणाच्या अंगाने अधिक आहे. नितीशिक्षणाचे धडे राजपुत्रास गरजेचे असतात. असे शिक्षण संभाजीराजे यांना मिळाले असणार यात शंका नाही. बखरकाराने नोंदविलेले मत योग्य आहे. पण बखरकारांची भाषा शैली असे शिक्षण संभाजीराजांना आपण देत असल्याची आहे. स्वराज्याचा राजा या नात्याने संभाजीराजांना असे शिक्षण दिले गेले असणार हे सत्य आहे. या नितीशिक्षणाच्या मूल्यातच संभाजीराजांचे व्यक्तिमत्व निर्माण झाले होते हेही, नाकारता येत नाही.

## १.१३ रामदास स्वामींना आणण्याची गरज नव्हती

बखरकार संभाजीराजे यांच्या शिक्षणाबाबत माहिती नोंदवित असताना त्यांना कोण-कोणत्या स्वरूपाचे शिक्षण देण्यात आले होते आणि त्या शिक्षणातील त्यांची गती कोणत्या स्वरूपाची होती, या ज्ञानाचा त्यांनी भावी आयुष्यात  स्वराज्यासाठी कसकसा उपयोग करून घेतला, या दृष्टीने माहिती देणे गरजेचे आहे. त्यांच्या गुरूंचे नावे देणे योग्य ठरले असते. पण तीही नावे बखरकारांनी दिलेली नाहीत असे असताना 'श्रीरामदास स्वामी यांचे दर्शन, सहवास करण्यास (युवराज संभाजीराजे) पाठविलेले होते' असे नोंदविले हे ऐतिहासिक नसून वर्णश्रेष्ठत्वाचा अहंकार सूचित करणारे आहे. शिक्षणासंदर्भात चर्चा करत असतांना संस्कारासाठी स्वामींकडे गुरू म्हणून सुचविण्याचा खोडसाळपणा बखरकाराने केला आहे, हेच यातून सूचित होत आहे.

## १.१४ लेखनादी अभ्यासाची नोंद महत्वाची

संभाजीराजांनी शस्त्राच्या अभ्यासाबरोबर लेखनाचा अभ्यास केल्याचा बखरीतील निर्देश महत्वाचा आहे. त्यांनी अक्षर ज्ञानाची ओळख करून घेतली व त्याद्वारे भविष्यातील लेखन केले असावे या बाबींना पुष्टी मिळते. लेखनाचे अंग संभाजीराजांना असल्याची महत्वाची नोंद बखरकारांनी नोंदविली हे ऐतिहासिक व वाङ्मयीनदृष्ट्या महत्वाचे आहे.

## १.१५ 'बुधभूषण' प्रस्तावनेतील नोंद महत्वपूर्ण

संभाजीराजांनी लिहिलेला 'बुधभूषण' हा ग्रंथ वैचारिक, वाङ्मयीन आणि राजनिती दृष्ट्या महत्वाचा ग्रंथ आहे. या ग्रंथाद्वारे संभाजीराजांचे व्यक्तिमत्व, विचार, सामाजिक, धार्मिक, व्यापक जाणिवांचे आकलन होण्यास मदत होते. याबाबीचा प्रबंधात पुढे अधिक विस्ताराने विचार नोंदविण्यात येणार असल्यामुळे या ठिकाणी या ग्रंथात येणारी संभाजीराजे यांच्या शिक्षणविषयीची नोंद महत्वपूर्ण असल्यामुळे ती पाहणे महत्वाचे आहे. ती नोंद पुढील प्रमाणे "......संभाजी आणि राजाराम यांना त्या काळी अनुरूप असे आणि शिवाजी राजांचे पुत्र म्हणून कसे शिक्षण दिले असेल, हे ध्यानात येते. 'बुधभुषण' या संस्कृत ग्रंथात संभाजीराजांचे काव्यालंकार, शास्त्रे, पुराणे, संगीत आणि धनुर्विद्या यांचा उल्लेख आहे. संस्कृत भाषेशी संभाजी चांगला परिचित होता."[९] बुधभूषणच्या प्रस्तावनेत नोंदविलेला अभिप्राय संभाजीराजांचे शिक्षण समजून घेण्याच्या दृष्टीने महत्वाचा आहे. त्यांना आत्मसात असणाऱ्या ज्ञानशाखेचे आकलन होते. संस्कृत भाषेचे त्यांचे ज्ञान आणि भाषेवरील प्रभुत्व समजते.त्यांना ज्ञानात्मक विद्याशाखेचे योग्य ज्ञान मिळाले होतेच त्याचबरोबर युद्ध शास्त्राचेही योग्य ज्ञान प्राप्त झाले होते. यामुळे त्याच्यामध्ये उत्तम गुणांची निर्मिती झाली.

संभाजीराजांना युद्धकलेबरोबर अन्य कला अवगत होत्या असे म्हणण्यास वाव आहे. तो त्यांच्या बुधभूषण या ग्रंथांच्या आधारे त्यांचे भाषेवरील प्रभुत्व भाषापंडित्याचे उत्तम उदाहरण आहे. त्यांची काव्य निर्मिती उत्तम काव्याचे लक्षण आहे. इत्यादी बाबींचा विचार करता संभाजीराजेंना उच्च दर्जाचे शिक्षण मिळाले असणार हेही ओघाने स्पष्ट होते.

## १.१६ युध्द कौशल्ये आणि संभाजीराजे

संभाजीराजांचे युद्धकौशल्य आणि राज्यकारभारातील बारकावे पाहता, त्यांना सैनिकी शिक्षण उत्तम प्रकारे प्राप्त झाले असावे असे वाटते. सक्षम राजपुत्राकडे

राज्यकारभाराच्या शिक्षणाबरोबर युद्धनिती, तंत्र, इत्यादींचे ज्ञान असणे गरजेचे होते. मल्लविद्या, भालाफेक, दांडपट्टा चालविणे, युध्द प्रसंगी सैन्याचे नेतृत्त्व करणे. युद्धाच्या नंतरच्या वाटाघाटी करणे या गोष्टींचे ज्ञान राजाला असणे महत्वाचे होते. या दृष्टीने शिवाजी महाराजांनी संभाजीराजे यांच्या शिक्षणाची खास सोय व काळजी घेतली असणार. लहानपणापासून संभाजीराजे मुघलांकडे मनसबदार होते याचा अर्थ संभाजीराजे सैनिकी शिक्षणात पारंगत होते. याबाबत सुरेंद्रनाथ सेन यांचे मत महत्त्वपूर्ण आहे ते पुढील प्रमाणे, "सैनिकी तुकडीचे नेतृत्त्व करावयाचे शिक्षण मिळावे म्हणून शिवाजी महाराज संभाजीला अनेक वेळा पाच ते दहा हजार सैन्याच्या तुकडीचे नेतृत्त्व देत असावेत किंवा त्याला स्वतःबरोबर एखाद्या आघाडीवर नेत असावे. युद्ध कलेत आणि डावपेचात कुशल असलेल्या शिवाजीसारख्या पित्याचे मार्गदर्शन लाभल्यामुळे संभाजीराजे युद्धकलेत तरबेज झाले. संभाजीराजेंच्या युद्धकलेतील नैपुण्याबद्दल कौतुक वाटते."[१०] सुरेंद्रनाथ सेन यांचे मत योग्य असून संभाजीराजे यांच्या जीवनचरित्राचा, युद्ध कार्याचा आढावा घेतल्यास हे मत अधिक स्पष्ट होईल. शिवाजी महाराजांसारखी दूरदृष्टी असलेला राजा आपल्या मुलाला शिक्षण देतांना सर्वतोपरी काळजी घेणार हे सत्य आहे. याचा परिपाक म्हणजे संभाजीराजे यांची राजकीय कारकीर्द व पराक्रम असेच म्हणावे लागेल.

संभाजीराजेंच्या सैनिकी शिक्षणाचा गुरू कोण असावा, याबाबत माहिती उपलबध होत नाही. त्या काळात उपलब्ध असणारे सर्व परिपूर्ण शिक्षण संभाजीराजे यांना शिवाजी महाराज यांनी देण्याची व्यवस्था केली असावी. अर्थात या शिक्षणासाठी नेमण्यात आलेले शिक्षक हे त्यांच्या-त्यांच्या क्षेत्रातील पारंगत असणार हे स्पष्ट आहे. या शिक्षकांच्या नियुक्ती पगारावर केलेल्या असणार हे ही स्पष्ट आहे.

### १.१७ संभाजीराजे यांच्या शिक्षणाबाबत वा.सी. बेंद्रे यांचे मत

संभाजीराजे यांच्या एकूण व्यक्तिमत्वातील पराक्रमाचा विचार करून वा.सी. बेंद्रे यांनी तत्कालीन ग्रंथांचा आधार देऊन संभाजी यांच्या शिक्षणाविषयी मत मांडलेले आहे. त्यांचे मत ऐतिहासिकदृष्ट्या खूपच सत्याच्या जवळ जाणारे आहे. वा.सी. बेंद्रे आपल्या 'श्री

छत्रपती संभाजी महाराज' या ग्रंथात तत्कालीन ग्रंथांचा आधार घेऊन म्हणतात, "शिवाजीराजांनी व जिजाबाईंनी संभाजीराजांच्या शिक्षणाची व्यवस्था, तत्कालीन पध्दतीने उत्तम प्रकारे राखली असेल यात शंका नाही. संभाजीराजास शिक्षण कसे मिळाले व त्यांचे कोण गुरू होते ? याचे निश्र्चित उल्लेख मिळालेले नाहीत. परंतु त्यांच्या लिहिण्यावरून त्यांच्या सुविधेचा चांगला खुलासा बांधता येण्यासारखा आहे. संभाजीराजे यांनी शिवराज्याभिषेकानंतर व आपल्या पित्याच्या मृत्यूपूर्वी 'बुधभूषण' नावाचा ग्रंथ रचण्यास सुरूवात केली...

प्रस्ताविकात ते लिहितात,

तस्यात्मजः शंभुरिति प्रसिध्दः |

समस्तसामन्त-शि रोवतंस||

यःकाव्य साहित्य पुराण गीत |

कोदण्ड विधार्ण वपारगामी ||१५

विविच्य शास्त्राठी पुरातनाना |

मादाय तेभ्यः खुलू सोयमर्थम् ||

करोति सद्ग्रंथममुं नृपालः |

सशभुवर्मा बुधभुषणाख्यम् ||१६

विविच्य सन्तः कुतिमत्मदीयां |

गृहणन्तु सच्चासदसत्यजन्तु ||

क्षीराव्रियुवंत परिहत्य नीरं |

क्षीरं भजन्ते खलु राजहंसाः ||१७

यात संभाजीराजे आपण काव्यालंकार, शास्त्रे, पुराणे, संगीत आणि धनुर्विद्या यांचा सखोल अभ्यास केला असल्याचे व आपल्या पुस्तकातील साधनसामग्री पुरातन लेखकांच्या ग्रंथांचा बारीक अभ्यास करून घेतला असल्याचे स्पष्ट सांगत आहेत."[११] श्री. बेंद्रे संभाजीराजे यांच्या लेखनाचा आधार देऊन त्यांच्या शिक्षणाचे विश्लेषण नोंदवित आहेत. संभाजींना पुराण, भाषा, संस्कृत, ग्रंथ इत्यादीची उत्तम जाण होती हे त्यांनीच नोंदविले असल्यामुळे त्यांना संस्कृत भाषा अवगत असावी, त्याचबरोबर त्यांनी पुराण शास्त्राचा सूक्ष्म अभ्यासही केलेला होता, हे स्पष्ट होते.

संभाजीराजे यांच्या गुरूबाबत वा.सी. बेंद्रे यांनी परमानंद स्वामींचा नातूगोविंद याचा आधार देऊन 'श्री. छत्रपती संभाजी महाराज' या ग्रंथात मत मांडले आहे. ते मत पुढीलप्रमाणे, "(बुधभूषण) हा ग्रंथ लिहिण्यात, केशवभट्टांचे पुष्कळ सहाय्य झाले असले पाहिजे. केशवभट्ट मूळ शृंगारपुरचे राहणारे, ते शिवाजीकडे इ.स. १६७० पूर्वी रघुनाथ पंडितराव यांच्या आश्रयाने 'उपाध्याय' म्हणून येऊन राहिले होते. पुढे संभाजीराजांनी उपाध्यायांना हे 'पंडितराव दानाध्यक्ष' केले. परमानंदाचा नातू गोविंद या केशवभटाबद्दल लिहिताना सांगतो की,

अधर्मखण्डनं धर्मस्थापनं नियतव्रतः |
केशवो रचनामासहस्तेने नृपतेर्मृहु || १९
नीतिः शास्त्राण्य शोषणि दर्शयित्वा नरेश्वर |
नीतिः संख्यापयामास शाश्वतीर्धरणीतले ||२०

केशवपंडितांचे दण्डनीती प्रकरणम् प्रसिद्ध झाले आहे. त्यास शेवटच्या ग्रंथपूर्तीत वरील माहितीस दुजोरा देणारा मजकुर आहे. ती ग्रंथपूर्ती अशी : 'इतिश्रीम्भुछत्रपतिविचरिते ग्रन्थे बुधभुषणे' श्री महत्पुरोहित दोदर भटात्मज केशव पण्डितविरचित धर्म कल्पलतान्तर्गत नीतिमंजर्यादण्ड नीतिपुराणम्' यावरून केशवपंडित संभाजीराजांस त्यांच्या चौदाव्या

वर्षापूर्वीपासूनच गुरू होते असे दिसते."[१२] संभाजीराजे यांच्या साहित्याचा आधार घेऊन वा.सी.बेंद्रे यांनी मांडलेला निष्कर्ष योग्य आहे. केशवभट्ट हे संभाजीराजे यांचे ज्ञानदानाचे गुरू होते, हेही मत ऐतिहासिकदृष्ट्या पटण्यासारखे आहे. त्यांनी संभाजीराजांना युध्दकला, लेखनकला, न्यायदानविषयक ज्ञान दिले असल्याचे स्पष्ट होते.

संभाजीराजे यांच्या शिक्षण विषयक बाबींचा आढावा विविध तत्कालीन साहित्यांच्या आधारे प्रस्तुत प्रबंधात विस्ताराने घेण्यात आलेला आहे. हा आढावा घेत असताना काही निरीक्षणे नोंदविणे महत्वाचे आहे ती, निरीक्षणे पुढील प्रमाणे मांडता येतील.

१. शिवाजी महाराजांना शिक्षणाचा वारसा शहाजीराजे-जिजाऊ यांच्याकडून प्राप्त झाला होता. तो वारसा शिवाजी महाराज-जिजाऊ यांनी संभाजीराजांना दिलेला असणार हे निश्चितपणे सत्य आहे.

२. संभाजीराजे कुशाग्र बुध्दीमत्तेचे धनी असून त्यांची आकलन क्षमता मोठी होती, हे त्यांनी आत्मसात केलेल्या ज्ञानावरून स्पष्ट होते.

३. संभाजीराजे यांना मराठी, हिंदी, संस्कृत, मोडीलिपी इत्यादी भाषा लिपीचे ज्ञान होते. या भाषेतून ग्रंथ निर्मितीही त्यांनी केलेली आहे.

४. संभाजीराजे शस्त्रात, कुस्ती, भाला, तलवारबाजी, इत्यादी युद्धशास्त्रात व धर्मशास्त्रात पारंगत होते. त्यांनी विविध युद्ध जिंकलेली होती. यातून त्यांच्या युद्धविषयक शिक्षणाचा प्रत्यय येतो.

५. संभाजीराजे यांच्या शिक्षणाची सोय शिवाजी महाराज यांनी उत्तम प्रकारे केलेली होती. स्वराज्यांचे उत्तराधिकारी म्हणून संभाजीराजांच्या व्यक्तिमत्वाची जडण-घडण जाणीवपूर्वक करण्यात येत होती.

६. संभाजीराजांच्या शिक्षणाची जबाबदारी शृंगारपुरच्या केशवभट्ट यांच्यावर सोपविण्यात आली होती. या बाबीस तत्कालीन ऐतिहासिक साधनाचा आधार मिळतो. याद्वारे संभाजीराजांचे शिक्षक पगारी होते. या बाबींचा धार्मिकतेशी संबंध नाही.

७. संभाजीराजे यांचा लहानपणी अथवा मोठेपणी रामदास स्वामी यांच्याशी कोणत्याही स्वरूपाचा संबंध आलेला नव्हता, तसा संबंध जोडणे ऐतिहासिक दृष्ट्या योग्य नाही.

८. वा.सी.बेंद्रे याचे संभाजीराजे यांच्या शिक्षणाबाबतची मते अधिक विश्वसनीय आणि ऐतिहासिकदृष्ट्या योग्य आहेत.

९. 'बुधभूषणम्' या संस्कृत ग्रंथाची निर्मिती संभाजीराजे यांनीच केलेली असून, हा ग्रंथ तत्वज्ञान व राजनितीशास्त्राचा उत्तम नमुना आहे.

१०. संभाजीराजे यांचे जीवितकार्य, अलौकिक पराक्रम पाहता त्यांना प्राप्त झालेले शिक्षण उच्च दर्जाचे असणार, हे निश्चित आहे. त्यांच्या शिक्षणावर शिवाजी महाराज-जिजाऊ यांचे लक्ष असणार हेही स्पष्ट आहे.

## १.१८ संभाजीराजे यांचा विवाह

संभाजीराजे यांचे सांसारिक जीवन याबाबत इतिहासात फारसे उल्लेख सापडत नाहीत, जी माहिती उपलब्ध आहे त्या माहितीमध्ये एक वाक्यता दिसत नाही. काही इतिहासकारांच्या मते संभाजीराजे यांचा एकच विवाह झाला होता, तर काहींच्या मते त्यांचे दोन विवाह झाले होते. दुसऱ्या विवाहाबाबत स्पष्टपणे माहिती उपलब्ध होत नाही. यामुळे संभाजीराजे यांचे वैवाहिक जीवन मुले व मुली इत्यादीबाबत मतभेद आढळतात.

प्रस्तुत ठिकाणी संभाजीराजे यांच्या विवाहाबाबत आणि सांसारिक जीवनाबाबत विस्ताराने चर्चा करावयाची आहे. शिवाजी महाराजांनी शृंगारपूर घेतल्यानंतर म्हणजे इ.स.

१६६१ सालानंतर संभाजीराजे यांचा विवाह पिलाजी शिर्के यांची कन्या राजसबाई यांच्याबरोबर मोठ्या थाटामाटात साजरा झाला. विवाहानिमित्त पाच लाख रूपये खर्च आला. वधूचे नाव 'येसूबाई' असे ठेवण्यात आले, असा उल्लेख मल्हार रामराव चिटणीस विरचित शिवछत्रपती महाराज यांचे सप्तप्रकरणात्मक चरित्रात सापडतो. यावरून ही माहिती विश्वसनीय मानण्यास संदेह नाही. इतिहासकारामध्ये संभाजीराजांच्या पहिल्या विवाहाबाबत मतभेद नाहीत. संभाजीराजे येसुबाई यांना भवानीबाई नावाची मुलगी व शिवाजी उर्फ शाहू नावाचा मुलगा, अशी दोन अपत्य होती. हे लक्षात घेता संभाजीराजांचे वैवाहिक जीवन सुखी असल्याचे स्पष्ट होते.

संभाजीराजेंच्या दुसऱ्या विवाहाबाबत फारशी माहिती उपलब्ध होत नाही. त्यांची पत्नी कुणाची मुलगी होती, याबाबतही फारशी माहिती इतिहासात उपलब्ध नाही. या दृष्टीने कमल गोखले यांनी 'शिवपुत्र संभाजी' या ग्रंथात नोंदविलेले मत पाहणे महत्वाचे ठरेल, ते मत पुढीलप्रमाणे, "संभाजीराजेंचे दुसरे लग्न दुर्गाबाई नावाच्या स्त्रीशी झाले होते. हे लग्न केव्हा आणि कोठे झाले आणि ही मुलगी कोणाची असावी यासंबंधी काहीच माहिती मिळत नाही. "[१३] कमल गोखले यांनी आपले हे मत ताराबाई कालीन कागदपत्रे खंड-१ च्या आधारे मांडलेले आहे. संभाजीराजे यांच्या विवाहाबाबत फारशी माहिती उपलब्ध नसल्याचा अभिप्राय गोखले नोंदवित असल्या, तरी तत्कालीन काळातील कागदपत्रे, ग्रंथ इत्यादीमध्ये या विवाहाची माहिती उपलब्ध आहे. संभाजीराजांच्या या लग्नाची माहिती सुरतस्थित 'हरि' कवीने तीन काव्यात सांगितली आहे. पहिले 'शम्भुराजचरितम्' हे काव्य १९ जानेवारी १६८५ ला लिहून पूर्ण झाले. त्यानंतर 'हैह्येन्द्र काव्य' व त्यावरील टीका 'शम्भुविलासिका' इत्यादी रचना उपलब्ध आहेत.

संभाजीराजे यांचा दुसरा विवाह सुविध पार पडलेला होता हे हरिकवीने केलेले या विवाहाचे वर्णन पाहिले तरी समजून येईल. हरिकवी म्हणतो :[१४]

पश्र्वादगौरी हरवगृहं तं गंरूः संनिनाय ||८७

चंपानाग्नी रातीमिव जगन्मोहिनी स्वां कुमारी |

तत्रानैषीदति विलुलितः सुर्यजासेवकोऽापि ||९८

लोकन्सवीन्विदित महाश्र्चर्यसौंदर्यपुरां |

चंपाशंपाद्युतितातिरस्कारिणी प्रादुदासीत् ||९९

स्वयां शोभामिव विपुलिता शंभवेभ्यपर्यंती ||१००

पश्र्वातां समलांकृता तपनजादासो ददौ शंभने |

भुपायाशु सदासिगं सुविधिना हर्षाश्रुमालाधरः ||

तंत्रज्ञोथ गंरूश्वतुष्कमतयतौदंपती सुंदरी |

लाजाहोमविधी विध्तुमुदितौ ज्योत्स्नाशशांकाविव ||१३४

लाजाहोमाविधी पुरोहितवरस्तांभ्यां प्रकार्यकृतं |

पर्यकालय दुक्रचिंसुललितौ सप्तांचिष तो ततः ||

सत्संबंधम है तुकं प्रकटयद् गोत्रप्रचांर बुधाः |

संख्यं सप्तवादी नयद् ब्रिम्हयादि भिर्दश्वर्य|"१३५

कवीच्या वरील वर्णनाचा बारकाईने विचार करता संभाजीराजांचा दुसरा विवाह सविध पद्धतीने झालेला आहे. या विवाहास अनुलोम म्हणता येईल. कच्छवाहाचे रजपूत घराण्यातील 'दुर्गाबाई' होत्या. रजपूत हे पूर्वीपासून पराक्रमी, राज्यकर्ते होते. त्यांचे वैवाहिक संबंध पराक्रमी, शूर आणि राज्यकर्त्यांशी आले. अर्थात त्यांनी जात-धर्म या बाबींचा फारसा विचार केला नाही.

संभाजीराजे दुर्गाबाई यांचा विवाह मोठ्या थाटामाटात झाला आहे. याचे वर्णन काव्यात येते. त्याबरोबर तिच्या सौंदर्याचे, सालंकृत विवाह संपन्न झाला. इत्यादी बाबींचे वर्णन आलेले आहे. शिवाजी महाराज या विवाहास उपस्थित होते का ? या बाबींचा स्पष्ट पुरावा उपलब्ध होत नाही. हा विवाह संभाजीराजे दिलेरखानाच्या छावणीत असताना झाला, असे अनेक इतिहासकारांचे मत आहे. काही बाबींचा विचार करता हा विवाह यापूर्वीच झाला असण्याची शक्यता आहे. या विवाहाबाबत अधिक संशोधन होण्याची गरज आहे. असे मला स्वतःला वाटते. संभाजीराजे-दुर्गाबाई यांना अपत्य असल्याचा उल्लेख वा.सी. बेंद्रे आपल्या 'श्री. छत्रपती संभाजी' या ग्रंथात म्हणतात, "दुसऱ्या बायकोला मदनसिंह व उधोसिंह असे दोन मुलगे व एक-दोन मुली होत्या. तिच्या मुलींची नावे उपलब्ध नाहीत." [१५] वा.सी. बेंद्रे यांच्या वरील नोंदीचा विचार करता संभाजीराजे-दुर्गाबाई यांना चार अपत्य झाली होती. त्यांचे संसारिक जीवन दीर्घकाळ असण्याची शक्यता आहे. बहुधा संभाजी-राजांच्या निधनापर्यंत असावे हेच यातून स्पष्ट होते.

दुर्गाबाई यांच्या वैवाहिक जीवनाचा आणि विवाह प्रसंगांचा विचार करता बखरकार म्हणतात त्यानुसार त्या नाटकशाळेतील असण्याची शक्यता नाही. बखरकारांनी नोंदविलेली माहिती अज्ञानावर अथवा लोककथेवर आधारित असण्याची शक्यता आहे. नाटक - शाळेतील स्त्रीबरोबर होणारा विवाह एवढ्या मोठ्या थाटामाटात होत नाही. याही बाबी विचारात घ्याव्या लागतील. संभाजीराजाच्या व्यक्तीमत्त्वाचा वैचारिक जाणिवांचा सामाजिक धोरणांचा आणि त्यांना बालपणी प्राप्त झालेल्या संस्कारांचा विचार करता, त्यांचे जीवनचरित्र स्वच्छ आणि पारदर्शक आहे. असे असतानासुध्दा त्यांच्या चारित्र्यावर दुवर्तनाचे आरोप झालेले आहेत. हे आरोप त्यांच्या हयातीतसुध्दा झालेले आहेत. या बाबींचा विचारही करणे महत्त्वाचे आहे. या आरोपांचा थोडक्यात आढावा प्रस्तुत ठिकाणी घेतल्यास संभाजीराजांचा राज्य कारभार या विषयाची चिकित्सा अधिक संयुक्तिकपणे करता येईल. त्यांच्या व्यक्तिमत्त्वाचा योग्य शोध घेता येईल.

### १.१९ संभाजीराजे: त्र्यं. शं. शेजवलकर

मराठ्यांच्या इतिहास लेखनावर प्रदीर्घ संशोधनात्मक लेखन त्र्यं. शं. शेजवलकर यांनी केले आहे. 'श्री. शिवछत्रपि-संकल्प, शिवचरित्राची प्रस्तावना आराखडा व साधन' या ग्रंथामध्ये 'शिवाजी संभाजी संबंध' या बाबत काही विचार नोंदविले आहेत. संभाजीराजे याच्या दुवर्तनाचा दाखला देतांना त्यांनी इ.स. १६७५ च्या अखेरीस शिवाजी महाराजांवर झालेल्या विषप्रयोगांच्या घटनेचा आधार घेतात. शेजवलकर लिहितात, "प्रसंग सन १६७५ च्या अखेरीस झालेल्या शिवाजीचा दिर्घ आजार व त्यातून त्यांच्या मृत्यूची उठलेली चौफेर बातमी हा आहे. इंग्रजांना कळाले की, शिवाजीला त्याच्या मुलानेच विष घातले, कारण त्याला कळले की, रायगडाच्या पहारेकऱ्यांना संभाजी रात्री किल्ल्याखाली उतरण्याची आपली खोड न सोडील तर त्याला बेशक तटावरून लोटून द्यावे असे फर्माविले होते. संभाजीराजे रात्री शिवाजीच्या प्रमुख ब्राह्मणांपैकी एकाच्या मुलीला भेटण्यासाठी किल्ल्याखाली उतरत असे व तिच्याशी त्यांचा अनैतिक संबंध होता. इंग्रजांच्या पत्रातील ही नोंद इतकी सहजरित्या स्पष्ट स्वरूपात आली आहे की त्या बद्दल शंका घेणे कठीण आहे."[१६]

शेजवलकरांच्या वरील लेखनाचा मुख्य आधार इंग्रजांच्या बातमीपत्रातील माहितीचा आहे, हे उघड आहे. आता मूळ बातमी कशी होती याचा सारांश जयसिंगराव पवार यांनी 'छत्रपती संभाजी: एक चिकित्सा' या आपल्या ग्रंथात दिलेला आहे. तो पुढील प्रमाणे, "भावार्थ, गेले अनेक दिवस शिवाजीच्या मृत्युच्या व त्याच्या दफनविधीच्या बातम्या येत आहेत. असे म्हणतात की, त्याला त्याच्या मुलाने विष घालून मारले. शिवाजीच्या एका बाह्मण मंत्र्यांच्या मुलीबरोबर संभाजीराजेंचे अनैतिक संबंध होते. संभाजीने त्या मुलीला रात्री भेटायला जायचे सोडले नाही, त्याला रायगडाच्या तटावरून फेकून द्यायचा हुकूम शिवाजीने आपल्या रक्षकांना दिला होता. शिवाजी डोक्यातील कळांनी भयंकर आजारी होता, याबद्दल आम्हास खात्रीने माहिती होती, सिद्दी संबळ व दाभोळ आदी ठिकाणांचे

व्यापारी सांगतात की, शिवाजी मेला आहे. परंतु आम्हास त्या बातमीत तथ्य दिसत नाही. कारण शिवाजीचा प्रधान मोरोपंत जो माहुलीच्या पायथ्याशी आपल्या सैन्यानिशी छावणी टाकून आहे, तो अजूनही तेथून हललेला नाही."[१७] वरील बातमीचा बारकाईने विचार केल्यास शिवाजी महाराज साताऱ्याला आजारी होते. या दरम्यान त्यांचा मृत्यू झालेला नाही. इंग्रज बातमीपत्रातील माहिती ऐकीव स्वरूपाची आहे. हेही लक्षात घ्यावे लागेल. त्यांनी बातमीच्या शेवटी नोंदवितांना म्हणतात. मोरोपंत यांचा तळ हाललेला नाही, या अर्थी महाराजांचा मृत्यू झालेला नाही. असा तर्क इंग्रज बातमीपत्रात नोंदवित असताना श्री. शेजवलकरांनी संभाजीराजे यांच्यावर खुनाचा आरोप करणे ऐतिहासिकदृष्ट्या सत्यास धरून नाही. त्याच बरोबर त्यांचे अनैतिक संबंध होते असे ओढून ताणून स्पष्ट करण्याचा प्रयत्नही बरोबर नाही.

श्री. शेजवलकरांच्या संभाजीराजे यांच्या नोंदीबाबत 'जयसिंगराव पवार' आपल्या 'छत्रपती संभाजीः एक चिकित्सा ' या ग्रंथात निष्कर्ष काढताना म्हणतात, ते ऐतिहासिक दृष्ट्या योग्य आहे. त्याचा अभिप्राय पुढीलप्रमाणे, "संभाजीराजे महाराजांवर विषप्रयोग करण्याचे कारण कोणते? तर किल्ल्यांच्या पायथ्याशी असणाऱ्या ब्राह्मणकन्येस भेटण्याची खोड संभाजीराजांनी सोडली नाही, तर त्याचा कडेलोट करावा अशी महाराजांनी सांगितलेली शिक्षा. गंमत अशी की खुद्द इंग्रजांनीच आणखी काही दिवसानंतरच्या बातमीपत्रात (७ एप्रिल १६७६) विषप्रयोगाचा कर्ता संभाजीराजा नसून एक न्हावी आहे, असे म्हटलेले आहे. म्हणजे संभाजीराजे त्या ब्राह्मण कन्येस भेटण्यास जाणे, त्यावर शिवाजी महाराजांनी सांगितलेली कडेलोटाची शिक्षा, ही शिक्षा टाळण्यासाठी संभाजीराजांनी महाराजांवर केलेला विषप्रयोग या तीन पायऱ्यांतील शेवटची पायरीच निखळल्यावर वरच्या दोन पायऱ्या आपोआप कोसळतात. इंग्रजांचे बातमीपत्र तत्कालीन व अस्सल असले तरी त्यातील माहिती अस्सल असतेच असे नाही, हे इतर अनेक इंग्रज बातमीपत्रांवरूनही समजून येईल."[१८] जयसिंगराव पवार यांनी नोंदविलेला अभिप्राय अगदी स्पष्ट आणि

ऐतिहासिक सत्याला धरून असल्यामुळे त्यावर अधिक भाष्य करण्याची गरज नाही. त्यांनी स्पष्टपणे शेजवलकरांच्या मतातील त्रुटी स्पष्ट केलेल्या आहेत. या अभिप्रायाचा अर्थ इतकाच, संभाजीराजे कुवर्तनाचे वा व्यसनाधीन नव्हते.

**१.२० संभाजीराजेः प्रा. वसंत कानेटकर**

प्रा. वसंत कानेटकरांनी संभाजीराजे यांच्या दुवर्तनाबाबत आपले मत नोंदविले आहे. हे मत मांडत असताना त्यांनी लोककथांचा आधार घेतला आहे. त्या कथेतील मुलीस 'गोदावरी' हे नावसुद्धा बहाल केलेले आहे. कानेटकरांच्या मताचा आढावा घेऊन "मध्ययुगात बायका पळवणे, त्यांच्यावर बळजबरी वा बलात्कार करणे, या फार 'डोळे वटारून' बघण्याच्या गोष्टी नव्हत्या. अंगवस्त्रे, नाटकशाळा आणि लग्नाच्या अनेक बायका हा तर त्या काळी कौतुकाचा आणि प्रतिष्ठेचा मामला मानला जात होता. मग शिवाजी महाराजांची संभाजीराजांवर 'इतराजी' का झाली असेल ? मल्हार रामराव चिटणीस आपल्या बखरीत सांगतो, ते सगळेच खरे नसले तरी तो जाता जाता शिवाजी महाराजांच्या तोंडून एक रिवाज बोलून दाखवितो... राज्याचे अधिकारी हे अगम्यागम श्रेष्ठ वर्णाचे ठायी जाले. म्हणजे क्षत्रिय असून ब्राह्मण मुलीशी राजाने संग केला, हे पाप घडले. बळजबरी केली म्हणून नव्हे"[१९] श्री. कानेटकरांनी मध्ययुगीन काळातील स्त्रीविषयीचा दृष्टीकोन नोंदविताना स्त्रियांना गौण लेखले आहे. तत्कालीन काळात स्त्रिया ठेवणे प्रतिष्ठेचे असल्याचेही नोंदवितात. मराठा स्वराज्यात या गोष्टींना स्थान नव्हते. शिवाजी महाराजांच्या प्रशासनात असल्या गोष्टी खपवून घेतल्या जात नसत. अर्थात संभाजीराजे त्यांच्याबाबत त्या केव्हाही खपवून घेतल्या नसत्या हे वेगळे सांगण्याची गरज नाही.

संभाजीराजांनी स्त्रीसंग केला म्हणून शिवाजी महाराज नाराज झाले नाहीत तर ब्राह्मण स्त्रीशी संबंध ठेवले म्हणून नाराज झाले, असे म्हणणे म्हणजे श्री. कानेटकर तत्कालीन घटनेला वर्णश्रेष्ठत्व जोडत आहेत. हेच यातून स्पष्ट होते. शिवाजी महाराजांच्या

दृष्टीने कोणत्याही वर्णातील स्त्रीवर झालेला अन्याय सारखाच होता. श्री. कानेटकर नोंदवित असलेली स्त्रीविषयक मानसिकता मध्ययुगीन काळातील नसून पेशवे काळातील आहे. ज्या बखरीचा आधार घेतलेला आहे या बखरीचा लेखनकाळ पेशवाईतील आहे.

संभाजीराजांच्या चारित्र्याला अशा प्रकारच्या गोष्टी जोडणे म्हणजे महान राजांच्या चारित्र्याचे हनन करून त्यांच्या आयुष्यभराच्या जीवित-कार्याला मातीमोल करणेच म्हणावे लागेल. स्वतःचे चारित्र्य कलंकित होईल, अशी कोणतीही स्त्रीविषयक कृती संभाजीराजांच्या हातून संपूर्ण जीवनभरात घडलेली नसल्याचे अनुमान त्यांच्या चरित्रावरून, प्रशासन व्यवस्थेवरून व विचारावरून स्पष्ट होते.

## १.२१ संभाजीराजांच्या तथाकथित नायिका

संभाजीराजे यांचे चरित्र जनमानसात संभ्रम निर्माण होईल अशा पद्धतीने बखरकार लोककथा आणि आधुनिक इतिहासकार अपवाद वगळता निर्माण करण्याचा प्रयत्न करतात. असे होण्यामागे तत्कालीन साधनांची पुरावा म्हणून स्वीकार करत असताना, सत्यशोधनाचा अभाव, दुसरे कारण मात्र लोकप्रचलित मत आहे. म्हणजे ते सत्यच असणार. या दृष्टीने झालेले लेखन अशा लेखनामुळे चारित्र्यसंपन्न युवराजाचे चरित्र, जिवितकार्य डागाळले जात आहे. याचे भान दिसत नाही. इतिहासलेखकांनी या दृष्टीने संभाजीराजे यांच्यावर अन्यायच केला आहे. अपवादात्मक लेखकांनी परिश्रमपूर्वक संभाजीराजांच्या चरित्राला न्याय देण्याचा प्रयत्न केला आहे ही बाब समाधानाची आहे.

संभाजीराजांच्या चरित्राशी जोडण्यात आलेल्या नायिका याबाबत शोध घेतल्यास त्या घटनेतील असत्यता स्पष्ट होते.

## १.२२ संगीत श्री. छत्रपती संभाजी नाटक

इ.स. १९८१ साली आत्माराम मोरेश्वर पठारे यांनी संगीत श्री. छत्रपती संभाजी महाराज नावाचे नाटक लिहिले. हे नाटक रंगमंचावर सादर करण्यात आले. या नाटकामध्ये

काल्पनिक 'तुळसा' ही व्यक्तिरेखा असून तिचा संबंध संभाजीराजे यांच्याशी जोडण्यात आला. ही प्रेमकथा नाटकाचा विषय होती. त्याचबरोबर आत्माराम पठारेची साहित्यकृतीतील नायिका होती असे असताना पुढे ती संभाजीराजांच्या चरित्राला जोडण्यात आली. या बाबींचा विचार करता साहित्यातील पात्राला इतिहास लेखनाचा आधार प्राप्त झाला आणि संभाजीराजांच्या चारित्र्याला डाग लागला, ही वस्तुस्थिती लक्षात घेतल्यास वास्तवामध्ये 'तुळसा' नावाची ऐतिहासिक व्यक्ती नसल्याचे स्पष्ट होते आणि संभाजीराजे यांच्या चारित्र्यावरील डागही नाहिसा होतो.

'तुळसा' हे साहित्यातील काल्पनिक पात्र असून त्या पात्राचा संभाजीराजांच्या जीवनचरित्राशी कोणत्याही स्वरूपाचा संबंध नाही. या पात्राला लोककथेचाही आधार सापडत नाही. हेही लक्षात घ्यावे लागेल.

### १.२३ लोककथेतील गोदावरी व कमळा प्रकरण

गोदावरी आणि संभाजी यांच्या प्रेमावर आधारित लोककथा प्रचलित आहे. वरवर पाहता ही कथा शिवाजी महाराजांचे पुत्र संभाजीराजे यांच्या जीवनावर आधारीत असावी असे वाटते. पण लोकमनाचा भावनाविष्कार स्व-मनाचा आविष्कार असतो. आपल्या सुप्त भावना गीतातून, लोककथेतून व्यक्त करत असतात. त्या भावना व्यक्त करताना समाजातील प्रसिद्ध मान्यवर अथवा जनसामान्यांचा आधार असणाऱ्या व्यक्तिंच्या लौकिकाचा आधार घेत असतात आणि आपल्या भावना व्यक्त करतात. अशीच गोदावरी संभाजी यांच्या प्रेमकथेची लोककथा प्रचलित झाली. यांचा संबंध संभाजीराजे यांच्याशी जोडण्यात आला. या बाबी लक्षात घेतल्यास संभाजीराजेंच्या चरित्रात व ऐतिहासिक साधनांमध्ये या घटनेचे पुरावे सापडत नाही. यावरून स्पष्ट होते, की लोककथा जनसामान्यांची काल्पनिक निर्मिती आहे.

थोरातांची 'कमळा' ही पन्हाळा परिसरात प्रसिद्ध असणारी लोककथा आहे. या कमळाची समाधी पन्हाळ्याच्या पूर्वेस असल्याचे सांगितले जाते. ती यशवंतराव थोरात या

वीरांच्या 'गोडाई' नावाच्या पतिव्रता पत्नीची आहे. या बाबत मु.गो. गुळवणी यांच्या मताचा आधार देतांना जयसिंगराव पवार आपल्या 'छत्रपती संभाजीः एक चिकित्सा' या ग्रंथात म्हणतात, "पन्हाळ्याच्या परिसरात ही लोककथा सांगितली जाते. पन्हाळ्याच्या पायथ्याशी पूर्व बाजूस असणारे एक 'थडगे' आजही पन्हाळ्यावरील पर्यटकांना संभाजीराजांची नायिका 'कमळा' हिचे आहे, असे म्हणून दाखविले जाते, पण पन्हाळ्याचे एक संशोधक मु.गो. गुळवणी यांनी या 'थडग्या'चा शोध घेऊन ते थोरातांच्या कमळेचे नसून थोरात घराण्यातील यशवंतराव थोरात या शूर पुरूषाचे व त्याच्या गोडाई नावाच्या पतिव्रता स्त्रीचे आहे, हे पुराव्यानिशी सिध्द केले आहे. पुढच्या कालखंडात बाळाजी विश्वनाथाच्या फौजेशी करवीरकरांच्या बाजूने लढत असता पन्हाळ्याच्या पायथ्याशी हा यशवंतराव थोरात धारातिर्थी पडला. त्याची बायको त्याच्या बरोबर सती गेली. या उभयतांची ही समाधी आहे."[२०] वरील बाबींचा विचार करता ऐतिहासिक घटनेचा झालेला विपर्यास सहज समजतो. या विपर्यासामुळे एका महान व्यक्तिचे चरित्र कसे विपर्यस्त केले जाते याची कल्पना येते.

संभाजीराजांसारख्या महान राजांच्या चरित्राला कलंकित करणाऱ्या गोष्टी काही काळ चिकटवून राहिल्यामुळे महाराष्ट्राची अपरिमित हानी झाली आहे, असे म्हणावे लागेल. शिवाजी महाराजांच्या संस्कारांमध्ये वाढलेले संभाजीराजे यांच्यावर न्याय, निती आणि मानवतेचे संस्कार झालेले होते. या बाबींचा विचार करता संभाजीराजांचे व्यक्तिमत्व चारित्र्यसंपन्न असणार हे स्पष्ट होते. दुसऱ्या बाजुने विचार करता स्त्रियांच्याबाबतीमध्ये महाराज फार दक्ष व न्यायनिष्ठूर होते. स्वतःच्या मुलाकडून अशी चूक झाली असती, तर महाराजांनी कठोर शासन करण्यास मागेपुढे पाहिले नसते. महाराजांना पुत्रप्रेमाइतकेच स्वराज्य प्रिय होते.

शिवाजी महाराजांच्या हयातीत वा नंतरही संभाजी महाराजांच्या हातून अशी कोणतीही गोष्ट घडलेली नाही, त्यामुळे स्वतःचे चरित्र कलंकित होईल. असे संभाजीराजे

यांचे जीवनचरित्र, न्यायप्रियता, स्वजनांवरील प्रेम आणि स्त्रीविषयक दृष्टीकोन पाहिल्यास वाटते.

संभाजीराजे औपचारिक शिक्षण व युद्धकलेचे शिक्षण घेत असताना लहान वयातच त्यांना राजकारणाचे प्रत्यक्ष धडे घेण्याची संधी मिळाली होती. इ.स. १८ जून १६६५ ला वयाच्या नवव्या वर्षीच मुघलांचा मनसबदार झाले. इ.स. १६६४ साली औरंगजेबाने मिझ ाािराजा जयसिंगाला शिवाजी महाराजांवर स्वारी करण्यासाठी पाठविले. दक्षिणेत येताच जयसिंगाने ३० मार्च १६६५ रोजी पुरंदरला वेढा घातला. हा वेढा मोडून काढण्यासाठी शिवाजी महाराजांनी नाना प्रयत्न केले. पण या वेढ्यात विजय होण्याची शक्यता कमी वाटू लागली. या वेढ्यात मराठ्यांची पुष्कळ प्राणहानी झाली असती आणि पैसाही खर्च झाला असता. फार काळ मुघलांविरूद्ध टिकाव धरू शकत नाही हे लक्षात येताच शिवाजी महाराजांनी जयसिंगाबरोबर तहाची बोलणी केली.

मराठ्यांच्या इतिहासातील व संभाजीराजे यांच्या जीवनातील अत्यंत महत्वपूर्ण म्हणून पुरंदरचा तह मानावा लागेल. हा तह शिवाजी महाराज आणि मिर्झाराजे जयसिंग यांच्यात स्वराज्याच्या अनुषंगाने झालेला असला तरी संभाजीराजांच्या राजकारणातील प्रवेशाचा प्रारंभ या तहाने होत असल्यामुळे, या तहाला संभाजीराजे यांच्या दृष्टीनेही अनन्य साधारण महतत्त्वआहे. पुरंदरच्या तहाचा इतिवृत्तांत पाहता, संभाजीराजेंचा राजकीय प्रवेश समजण्यास मदत होईल. सौ. कमल गोखले आपल्या 'शिवपुत्र संभाजी' या ग्रंथात तहाबाबत सविस्तर माहिती तारीख-वारानुसार नोंदवितात ती पुढील प्रमाणे, "३० मार्च १६६५ रोजी पुरंदरला वेढा घातला. शिवाजी महाराजांनी मुघली फौजांचा प्रतिकार करण्यासाठी अनेक उपाय योजले...... फार काळ मुघलांविरूद्ध टिकाव धरणे शक्य नाही हे ध्यानात येताच शिवाजी महाराजांनी जयसिंगाबरोबर तहाची बोलणी सुरू केली. दि. ११ जून १६६५ या दिवशी महाराज आणि जयसिंग यांची भेट झाली. दि. १३ जून १६६५ ला मराठे मुघल यांच्यात तह झाला. या तहान्वये शिवाजीला देशावरचे नऊ आणि कोकणातील

चवदा किल्ले आणि त्यांच्या खाली येणारा मुलूख मुघलांना द्यावा लागला. त्यातून वगळलेले राजगड, तोरणा, रायगड, तळेगड इत्यादी बारा किल्ले आणि त्या खालचा एक लक्ष होन उत्पन्न असलेला प्रदेश महाराजांकडे राहिला. शिवाजी महाराजांनी औरंगजेबाची एकनिष्ठपणे सेवा करावी, असेही तहात ठरले होते. सहाजिकच ते औरंगजेबाचे ताबेदार झाले होते. या पेचातून महाराजांनी युक्तिने स्वतःची सुटका करून घेतली. त्यांनी पाच हजाराची मनसब आणि नोकरीच्या खर्चाची जहागीर संभाजीराजेंच्या नावाने स्वीकारली आणि राजकारणाचे डावपेच करण्यासाठी ते स्वतः मोकळे राहिले. त्यामुळे राजकारणाचे प्रत्यक्ष धडे घेण्याचीही संधी त्यांना मिळाली."[२१] पुरंदरच्या तहामध्ये प्राणहानी बरोबर स्वराज्यातील तेवीस किल्ले द्यावे लागले.

पुरंदरच्या तहानुसार स्वराज्याच्या राजकारणाला एक नवे वळण लागले. शिवाजी महाराजांना औरंगजेबाचा एकनिष्ठ सेवक होण्यासाठी तहात अट ठेवण्यात आली. तेव्हा शिवाजी महाराजांनी स्वराज्याच्या रक्षणासाठी स्वतःला या अटीमध्ये न गुंतवता संभाजीराजांना या तहामध्ये सामिल करून, शिवाजी महाराजांनी संभाजींना प्रत्यक्ष राजकारणात आणले. हा संभाजीराजांचा राजकारणातील पहिला प्रवेश होता.

### १.२४ पुरंदरच्या तहानुसार संभाजीराजे जयसिंगाच्या छावणीत

संभाजीराजांना मुघलाची मनसब प्राप्त झाल्यानंतर संभाजीराजांना तहानुसार मुघलाकडे जाणे प्राप्त होते. इ.स. १५ जून १६६५ रोजी संभाजीराजे उग्रसेन कच्छवाह बरोबर जयसिंगाकडे गेले. याबाबत 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' यातील नोंद पाहणे महत्वाची आहे. ती पुढीलप्रमाणे, "या तहानुसार शिवाजी आणि संभाजी ता. १५ जून १६६५ ला राजगडावर गेले. तहात ठरलेल्या अटीप्रमाणे दि. १७ जूनला उग्रसेन कच्छवाह बरोबर संभाजीस राजा जयसिंगाच्या हवाली करण्यासाठी त्याच्या छावणीत पाठविले. ता. १८ जून रोजी केवळ आठ वर्षाचा संभाजी राजा मुघलांच्या छावणीत दाखल झाला. "[२२]

संभाजीराजांना मुघलांची मनसब मिळाल्यानंतर मुघलाच्या राज्यकारभारात सहभाग हाच त्यांच्या राजकीय वाटचालीचा आरंभ होता.

### १.२४.१ मिर्झाराजा जयसिंगाच्या छावणीत संभाजीराजेंचे स्वागत

संभाजीराजे तहानुसार मिर्झाराजा जयसिंगाच्या छावणीत मन्सूबदार म्हणून दाखल होतात. त्यांचे स्वागत त्यांच्या मानसन्मानानुसार होते. याबाबत सौ. कमल गोखले आपल्या 'शिवपुत्र संभाजी' या ग्रंथात म्हणतात, "जयसिंगाने पोषाख आणि रूपयाच्या हौद्यासह हत्ती देऊन संभाजीचा सन्मान केला. "[२३] संभाजीराजांना मानसन्मान जयसिंगराजाने दिला. संभाजीराजांना मनसब दिली असली, तरी शिवाजीराजांशी केलेल्या तहानुसार संभाजीराजे मिर्झाराजा जयसिंगाकडे ओलीस होते. तहानुसार राजा जयसिंगाने शिवाजी महाराजांच्या मदतीने विजापूरवर स्वारी केली. परंतु या स्वारीत मुघलांना यश मिळाले नाही.

विजापूरकर गोवळकोंडेकर यांच्याशी शिवाजी महाराजांनी संधान बांधून एकजूट करू नये, म्हणून शिवाजीराजे यांना औरंगजेबाच्या भेटीचे आमंत्रण राजा जयसिंगांनी दिले. या भेटीमागे राजा जयसिंगाचा राजकीय धूर्त डावपेच, मुत्सद्दीपणा होता.

संभाजीराजांच्या राजकीय जीवनाला मुघलाच्या तहानुसार प्रारंभ झाला होता. त्यांना मुघलाची राजनैतिकता, डावपेच, भव्यदिव्य आलिशान जीवनशैली, इत्यादी गोष्टीचे दर्शन घडत होते. स्वराज्यातील व्यापक लोककल्याणकारी राज्याचे दर्शन मुघलाच्या राज्यात नसल्याचेही त्यांना जाणवले असणार.

### १.२४.२ शिवाजी महाराज-संभाजीराजे यांची आग्र्यास भेट

मिर्झाराजा जयसिंगाच्या धूर्तपणामुळे आणि राजकीय परिस्थितीमुळे शिवाजी महाराजांनी औरंगजेबाच्या भेटीचे निमंत्रण स्वीकारले. या भेटी मागील शिवाजी महाराजांचा हेतू स्पष्ट होता. स्वराज्यावरील मुघलाचे संकट टाळणे व काही काळ शांतता ठेवणे. तर जयसिंगाचा हेतू विजापूरकर-गोवळकोंडेकर यांच्या पासून शिवाजी महाराजांना दूर ठेवून

औरंगजेबाच्या जवळ आणणे. आग्राभेट राजकीय उद्दिष्टांनी प्रेरित झालेली होती. या भेटीमागील दोन्ही राजांचे हेतू भिन्न-भिन्न होते. मिर्झाराजा जयसिंग आणि शिवाजी महाराज यांच्या संबंधातील एक महत्वाची बाब म्हणजे जयसिंगाचा शिवाजी महाराजांच्या राजकीय कारवायाबाबत विश्वास नव्हता. मात्र शिवाजी महाराजांच्या मनात औरंगजेबाबाबत राजकीयदृष्ट्या पूर्ण विश्वास होता.

संभाजीराजांना लहान वयात आग्ऱ्याला औरंगजेबाच्या भेटीसाठी शिवाजी महाराजांना घेऊन जावे लागले अथवा संभाजीराजांना जाणे भाग होते. कारण संभाजीराजे औरंगजेबाचे मनसब असल्यामुळे जाणे प्राप्तचं होते. आग्रा भेटीसाठी शिवाजी महाराज-संभाजीराजे निघाले याचे वर्णन अत्यंत भावपूर्ण आणि ह्दयगम्य स्वरूपात 'शिवचरित्र प्रदीप' मध्ये नोंदविले आहे. ते पुढील प्रमाणे, " लहान वयातच संभाजीला आपल्या पित्याचे प्रतिनिधित्व स्वीकारावे लागलेले होते. तो मुघलांचा मनसबदार त्याला शिवाजी महाराजांबरोबर आगऱ्याला जाणे प्राप्त होते. त्यांच्या बालवयाचा विचार केला तर महाराष्ट्रातून दूर उत्तरेस जाणे फारच त्रासकारक होते यात शंका नाही. जिजाऊ आणि इतर आप्त मंडळींचा निरोप घेऊन दोघे पितापुत्र दि. १५ मार्च १६६६ या दिवशी शत्रूच्या शिबीरात जाण्यासाठी निघाले."[२४] आप्त मंडळी व राजमाता जिजाऊ यांनी शिवाजी महाराज व संभाजीराजे यांना आग्रा जाण्यासाठी निरोप दिला होता. महाराष्ट्र-आग्रा प्रवासाचा विचार करता आणि संभाजीराजे यांच्या बालवयाचा विचार करता या निरोपामागे संभाजीराजांच्या काळजीचे कारण दिसते. संभाजीराजांच्या राजकीय प्रवेशानंतर प्रथमच ते बादशहाच्या भेटीसाठी जात होते ही गोष्ट लक्षात घेणे महत्वाचे आहे.

शिवाजी महाराज व संभाजीराजे आग्रा भेटीसाठी जात असताना घेतलेल्या सावधगिरीचे व आपल्या बरोबरचा लवाजमा आणि हवामानाबाबतचे वर्णन संभाजी-राजांच्या धैर्याची, प्रवासातील काटकपणाची, सहनशिलतेची साक्ष देते. स्वराज्याचा भावी राजा स्वराज्य रक्षणाचे धडे अगदी लहान वयापासून घेत असल्याची साक्ष या भेटीतील

अनुभवाने येते. या प्रवासाचे वर्णन करताना तत्कालीन बातमीपत्र नोंदवितात. "तेव्हा पालखी, घोडे, उंट अशा साधनांनीच प्रवास करावा लागत असे. या दूरच्या प्रवासाकरिता हवामानही अनूकूल नव्हते. मे-जूनच्या सुमाराला उत्तर हिंदूस्थानात उन्हाळाही तापदायक असतो. अशा खडतर परिस्थितीत प्रवास करून दोघेही दि. ११ मे १६६६ रोजी आग्ऱ्यास पोहोचले. मालुकचंदाच्या सराईत पोहोचल्यावर त्यांनी आपले तंबू ठोकले."[२५] आग्ऱ्याला जाण्यासाठी अंतर खूप दूरचे असल्यामुळे आणि संभाजीराजे लहान असल्यामुळे शिवाजी महाराजांनी खूप काळजी घेतली होती. हे वरील नोंदीवरून स्पष्ट होते.

### १.२४.३ आग्रा दरबार आणि शिवाजी महाराज-संभाजीराजे

संभाजीराजांना स्वतंत्र सरदार म्हणून मनसबदारी स्वीकारण्याची पहिली संधी मिर्झाराजा जयसिंगाच्या छावणीत मिळाली होती. आग्ऱ्याला गेल्यानंतर संभाजीराजांच्या नजरेला औरंगजेबाचे वैभव पडले. सामान्य समाजजीवनात वाढलेल्या संभाजीराजाचे संस्कार सर्वसामान्य जीवनाशी एकरूप होते. राजदरबारातील सुबत्तेवर संभाजीराजे मोहित झाले नाहीत.

### १.२४.४ शिवाजी महाराज व संभाजीराजे यांचे आग्ऱ्यास स्वागत

शिवाजी महाराज व संभाजीराजे आग्ऱ्यात आल्याचे मिर्झाराजा जयसिंगला कळताच त्याने आपला मुलगा कुमार रामसिंग याला निरोप पाठविला. कुमार रामसिंगने शिवाजी महाराजांना देण्यासाठी गिरधरलाल मुन्शीबरोबर एक चांदीच्या साजांनी मढविलेला घोडा आणि पोषाख पाठविला. शिवाजी महाराजांनी या भेटीचा स्वीकार केला. मुन्शीला २०० रू. आणि पोषाख देऊन परत पाठविले. इत्यादी गोष्टीचा विचार करता शिवाजी महाराजांचा मानसन्मान मिर्झाराजा जयसिंगाकडून राखला जाताना दिसतो. अर्थात शिवाजी महाराजांप्रमाणे संभाजीराजांनाही मानसन्मान मिळत होता.

दि. १२ मे १६६६ ला रामसिंगाचा राजवाड्याभोवती पहारा असल्यामुळे तेथून तो स्वागत करण्यासाठी महाराजांच्या छावणीपर्यंत जवळ आला. शिवाजी महाराजांना औरंगजेबाच्या दरबारात घेऊन जाण्यासाठी गिरधरलाल मुन्शीला त्याने पुढे पाठविले. शिवाजी महाराज, संभाजीराजे व गिरधरलाल दरबाराजवळील 'दाहारा-अश' नावाच्या बागेजवळ आले. शिवाजी महाराजांना फिरोज बोगतून आणण्यासाठी रामसिंग दुगरमल चौधरीला पाठविले. शिवाजी महाराज, संभाजीराजे आणि कुमार रामसिंग यांची भेट झाली. हे सर्वजण दिवान-इ-आममध्ये पोहचेपर्यंत औरंगजेब दिवाण-इ-खासमध्ये गेले होते. सर्वजण त्या ठिकाणी गेले. आसदखानने त्यांना औरंगजेब बादशहा पर्यंत घेऊन गेला. शिवाजी महाराजांनी एक हजार मोहरा, रूपये दोन हजार नजर आणि रूपये पाचशे हजार निसार म्हणून बादशहाला नजराना दिला. शिवाजी महाराजांना औरंगजेबाच्या दरबारात घेऊन जाईपर्यंत कुठेही समज-गैरसमज झालेला दिसत नाही.

मिर्झाराजा जयसिंग यांच्यापुढे शिवाजी महाराजांना उभे करण्यात आले ज्या ताहीरखानास पंधरा दिवसापूर्वीच पाच हजाराची मनसब दिलेली होती. त्याच्या बरोबर उभे करण्यात आले. प्रत्यक्ष शिवाजी महाराजांना उद्देशून काहीच बोलले नाही. औरंगजेबाचा वाढदिवस असल्यामुळे शिवाजी महाराजांनाही सर्वाबरोबर विडा दिला.

### १.२४.५ शिवाजी महाराजांना दरबारात अपमानास्पद वागणूक

शिवाजी महाराजांना ताहीरखानाच्या जागेवर उभे केल्यामुळे महाराजांना राग आला. हे औरंगजेब बादशहाच्या लक्षात आले. त्यांनी कुमार रामसिंहला त्याचे कारण विचारावयास सांगितले असता शिवाजी महाराज सांगतात, 'आपल्याला योग्य तो मान न देता कुठे तरी उभे करण्यात आले. माझी मनसब मी काढून टाकतो असे महाराजांनी चिडून कुमार रामसिंहाला सांगितले.' यानंतर रामसिंहाने महाराजांची समजूत काढण्याचा खूप प्रयत्न केला. पण शिवाजी महाराजांचे मत परिवर्तन झाले नाही. त्याच दिवसाच्या

संध्याकाळी शिवाजी महाराजांनी बादशाह व गिरधरलाल यांच्याशी चर्चा केली आणि सांगितले माझा मुलगा संभाजीराजे तुमच्याकडे नोकरीसाठी पाठवितो. तो बादशहाचा चाकर राहिल.

दरबारातील व त्यानंतरचा घटनाक्रम पाहता आणि शिवाजी महाराजांनी नाराज होण्याचे कारण पाहता महाराजांना राजा म्हणून द्यावयास हवा तो मानसन्मान बादशहाच्या दरबारात मिळाला नाही. यामुळेच महाराजाचे मन दुखावते. या सर्व बाबी संभाजीराजे पाहात होते. त्यांच्या मनावर या घटनांचा खोलवर परिणाम घडत होता. यातूनच त्यांचे राजकीय मन घडत होते.

औरंगजेबाने १३ मे रोजी शिवाजी महाराजांची चौकशी केली. महाराज दरबारात येणार आहेत का ? अंदाज काढला. महाराज दरबारात आले नाहीत. रामसिंग बरोबर संभाजीराजे बादशहाच्या दरबारात गेले आणि रामसिंगाशेजारीच उभे राहिले. भेट म्हणून औरंगजेब बादशहाने संभाजीराजांना 'सरोपा' रत्नजडित खंजीर आणि एक मोत्याची माळ दिली. औरंगजेब बादशहाने संभाजीराजांचा मानसन्मान राखला होता. त्याच्या मनसबीला शोभेल असा मान दिलेला होता. संभाजीराजांचा दरबारातील हा पहिलाच मानसन्मान होता.

### १.२४.६ आग्राः शिवाजी महाराजांना कैद आणि सुटका

आग्र्याच्या भेटीदरम्यान दरबारात घडलेल्या प्रसंगाने शिवाजी महाराज दुखावले होते. त्याचबरोबर बादशहाने दरबारात बोलावूनही महाराज हजर राहिले नाहीत. यामुळे दरबारातील जहानारा बेगम, ताहिरखान व राजा जसवंतसिंह हे शिवाजी महाराजांच्या विरूद्ध बादशहा जवळ तक्रार करतात. त्यानंतर शिवाजी महाराजांना कैद करावे, मृत्यू द्यावा की नजर कैदेत ठेवावे या विषयी चर्चा करतात. औरंगजेबाने सिद्दी फौलादला आज्ञा देऊन शिवाजी महाराजांना अंदाजखानाच्या घरी घेऊन जाण्यास सांगितले. शिवाजी महाराज पळून जाणार नाही अथवा काही अडचणी करणार नाही, याबाबत बादशहाने कुमार

रामसिंग यांच्याकडून हमीपत्र लिहून घेतले. याच दरम्यान १५ मे १६६६ रोजी शिवाजी महाराजांनी कुमार रामसिंगाला एक पत्र लिहिले. त्यामध्ये महाराजांनी चांगल्या वागणुकीची अपेक्षा व्यक्त केलेली आहे. शिवाजी महाराज औरंगजेबाला भेटण्यास गेले नाहीत. पण कुमार रामसिंगाबरोबर संभाजीराजे नियमितपणे दरबारात जात असत.

ता. १७ ऑगस्ट १६६६ रोजी सकाळच्या वेळी शिवाजी महाराज व संभाजीराजे औरंगजेबाच्या कैदेतून निसटून बाहेर पडले. यामुळे औरंगजेबाला संताप आला त्यांनी या दोघांना पकडण्यासाठी सर्वत्र आपले सैन्य पाठविले पण त्यांच्या हाती निराशा पडली.

संभाजीराजांच्या बालवयात आणि राज्यकारभाराच्या प्रारंभीच नाट्यमय आणि संकटाने भरलेला प्रसंग जीवनात घडतो. संभाजीराजे न घाबरता अत्यंत संयमाने, धैर्याने आणि वडिलांच्या मार्गदर्शनाने संकटाला सामोरे जातात. त्यांच्या बालमनावर राजपुत्राचे वा धैर्याचे जे संस्कार करण्यात आलेले होते याची उत्तम साक्ष त्यांच्या वागण्यातून समजते. या घटनेचा प्रत्यक्ष संबंध शिवाजी महाराजांच्या राजकीय जीवनाशी होता. पण संभाजीराजे यांना या घटनेमुळे राजकीय जीवनाचा जवळून परिचय झाला. यातूनच त्यांच्या मनाची राजकीय जडण-घडण होत गेलेली दिसते. यावरून काही निष्कर्ष काढता येतील.

१. संभाजीराजांना औरंगजेबाची मनसब होती. लहान वयात मनसब मिळाल्यामुळे त्यांच्यावर स्वराज्यापासून दूर राहण्याचा प्रसंग आला.

२. शिवाजी महाराज स्वराज्याचा भावी वारस म्हणून संभाजीराजांकडे पाहत होते. यामुळे त्यांना राजकीय धडे लहान वयापासून दिले होते.

३. संभाजीराजांनी आग्र्यापर्यंतचा प्रवास इतक्या लहान वयात केला आणि रायगडावरील परतीचाही प्रवास व्यवस्थितपणे केला, यातून त्यांची शारीरिक, मानसिक क्षमता स्पष्ट होते.

४. संभाजीराजांचे अडचणीच्या काळातील दरबारातील वर्तन, राहणीमान राजपुत्राला शोभणारे होते. यातून त्यांच्या व्यक्तिमत्वातील आणि संस्कारातील राजकीय मूल्य स्पष्ट होतात.

५. शिवाजी महाराजांनी आग्ऱ्याच्या भेटी दरम्यान संभाजीराजांना औरंगजेबाच्या नोकरीत ठेवण्याचा निर्णय घेतला हा निर्णय संभाजीराजांच्या राजकीय क्षमताबाबतचा आत्मविश्वास महाराजांनी स्पष्ट केलेला आहे, असे वाटते.

## १.२५ इ.स. १६७० नंतरचा काळ आणि संभाजीचा राज्यकारभारातील प्रवेश

इ.स. १६७० पूर्वी संभाजीराजे यांना आग्ऱ्याच्या भेटीचा समृद्ध अनुभव होता. त्याचबरोबर १६६७ साली पुन्हा मोगलाची मनसबदारी प्राप्त झाली होती. पुढे १६६९ साली मोडली. याबाबीचा विचार करता संभाजीराजांना राज्यकारभाराचे प्रगल्भ अनुभव प्राप्त झाले होते. स्वराज्याचा उत्तराधिकारी म्हणून जे अनुभव हवे होते ते संभाजीराजांना लहान वयातच मिळालेले होते. त्यांच्या अनुभवजन्य प्रशासनाबाबत वा.सी. बेंद्रे आपल्या 'श्री छत्रपती संभाजी महाराज' या ग्रंथात म्हणतात, 'सप्तहजारी सुभेदारी ' चा अनुभव तीन-चार वर्षे घेतला. अशा तऱ्हेने त्यांच्या बालपणातील काळ इतर नैमित्तिक व राजनैतिक शिक्षणाबरोबर प्रत्यक्ष अनुभवाचाही लाभ घेण्यात गेला. हा काळ संघर्षाचा असल्याने त्यांच्या कानावर येणाऱ्या शिवाजी महाराजांच्या अनेक हालचाली व यशापयश यांचा त्यांच्या मनावर सारखा संस्कार होत राहिला. दरबारातील सरदारांच्या तरतम हुद्यांचा व त्यांस प्राप्त झालेल्या कमीअधिक मानमरातबाचाही त्यांच्या बालमनावर परिणाम झाला. त्यामुळे संभाजीराजांचा आत्मविश्वास दृढतर होऊ लागला तसाच त्याबरोबर त्यास स्वयंनिर्णयाने कारभार आटोपण्याचे वळणही आपोआप लागू लागले. हीच संभाजीराजांची वृत्ती कारभाऱ्यास किंचित जाचक वाटू लागली असल्यास नवल नाही. शिवाजी महाराजांनी स्वसामर्थ्याने मिळवलेल्या राज्याचा युवराज व राज्याबाहेरही मोगली दरबारासारख्या साम्राज्यात मिळालेल्या मानसन्मानाचा धनी या भूमिकेत ज्याच्या आयुष्याच्या बालपणास सुरूवात झाली व ज्यांनी सर्व मंत्री वगैरेच्या मुलांबरोबर शिक्षण

घेऊन जे युद्धविद्येत कुशल व शास्त्र आणि राजविद्येत तरबेज होते. त्या संभाजीराजांनी आपले वर्तन अधिकारपूर्वी व खंबीर राखू लागणे अगदी साहजिक व संयुक्तिकही होते."[२६] वा.सी. बेंद्रे यांनी संभाजीराजांच्या बालपणातील व तारूण्यातील राजकारणाचा व स्वभावातील स्वराज्यनिष्ठेचा अचूक शब्दांत वेध घेतलेला आहे. इ.स. १६७० पूर्वीच संभाजीराजांना मुघली मनसबदारीमध्ये राज्यकारभाराचे धडे व मानसन्मान प्राप्त झाला होता. मुघलांच्या मनसबदारीतच राज्यकारभाराचे काटेकोरपणे काम संभाजीराजांनी केलेले असल्यामुळे स्वराज्यात त्याच दृष्टीने लक्ष देण्यास सुरूवात झाली. याचा परिणाम स्वराज्यातील मंत्र्यांचा कारभार काटेकोरपणे संभाजीराजांनी पाहण्यास सुरूवात केली.

संभाजीराजांच्या राज्यकारभारावर शिवाजी महाराजांच्या राजकीय मूल्यांचा प्रभाव होता. त्याचबरोबर परकीय सत्तेमध्ये राज्यकारभार करत असतांना तत्कालीन परिस्थिती अनुकूल निर्णय घेण्याचे स्वसामर्थ्य त्यांना प्राप्त झाले होते. यातुनच त्यांची निर्णय क्षमता आणि परिस्थितीला खंबीरपणे सामोरे जाण्याचे सामर्थ्य त्यांच्यामध्ये प्रदीर्घ अनुभवाने व बालवयातील जबाबदारीने प्राप्त झाले होते. इ.स. १६७० नंतर प्रत्यक्ष राज्यकारभारात संभाजीराजांचा वावर सुरू झाला. स्वतंत्रपणे राज्यकारभाराचे निर्णय घेऊ लागले होते. युद्ध आघाडीवर जावू लागले. यामुळे मनसबदारीत असणारे संभाजीराजे स्वराज्याच्या राजकारणात प्रत्यक्षपणे सहभाग घेऊ लागले. त्यांच्या कारकीर्दीतील अत्यंत महत्वाचा कालखंड या दरम्यान सुरू झाला.

### १.२६ संभाजीराजांचा स्वराज्यातील राज्यकारभारात प्रवेश

शिवाजी महाराज व मोघल याचे सौख्य तुटल्यानंतर 'मोगली सप्तहजारी' व खानदेश वऱ्हाडची सुभेदारी हा करार तुटला. संभाजीराजाकडून मुघलाची मनसब तुटली. यानंतर प्रत्यक्षपणे संभाजीराजाचा स्वराज्यातील राज्यकारभारात प्रवेश झाला. जिजाऊ स्वराज्यातील शिक्कामोर्तब, तक्रारी निवारण, निर्णय देणे इत्यादी गोष्टीत लक्ष घालत असत. आता त्यांना वयोमानानुसार कारभारात लक्ष घालणे शक्य नव्हते. त्याचबरोबर

त्यांना पाचाडात ठेवण्यात आल्यामुळे रायगडावर खजिन्यासह निवडक सरदाराबरोबर संभाजीराजे राहात असल्यामुळे शिवाजी महाराजांनी संभाजीराजांकडे जिजाऊंनी सर्व जबाबदाऱ्या दिल्या. याबाबत वा.सी.बेंद्रे आपल्या 'श्री छत्रपती संभाजी महाराज' या ग्रंथात म्हणतात, "शिवाजीराजास मोगलाईवर चढाई करून गेलेले सर्व किल्ले व प्रदेश परत काबीज करावयाचे होते. मोरापंत हा एकटाच युध्दकुशल ब्राह्मण सरदार होता त्याला ह्या स्वारीवर पुष्कळ कामकाज साधावयाचे होते. शिवाजीराजांच्या गैरहजेरीत राजधानीत (रायगडावर) मुखत्यारीने राज्यकारभार पाहणारी राजमाता वृद्ध झाल्याने राज्याचा कारभार शके १५९२ साधारण नाम संवत्सरे मघवद्य एकादसीस (२६ जानेवारी १६७१) शिवाजीने संभाजीस सांगितला.' शिवाजीराजांचा शिक्कामोर्तब मार्ग जिजाबाईच्या ताब्यात राहावयाचा. त्याचप्रमाणे तक्रारीबद्दल व्यवस्था लावणे, ताकीद देणे वगैरेही कारभार तिला जातीने पाहावा लागे, हे तिच्या अनेक उपलब्ध पत्रांवरून सिध्द आहे. जिजाऊ व सर्व मंत्री पाचाडात राहात. जिजाऊसाठी पाचाडाजवळ एक मैलावर स्वतंत्र गढी बांधुन ठेविली होती. संभाजीराजे व निवडक किल्ल्यांवरील नोकर खजिन्यासह रायगडावर असत. फक्त कामानिमित्त व परवानगीनेच किल्ल्यांवर जावयाचे हा नेहमीचा शिरस्ता होता. तो रायगडावरही कटाक्षाने पाळीत संभाजीराजांस कारभार मिळण्यापूर्वीही ते शिवाजी महाराजांच्या दरबारात बसत व शिष्टाचार पाळत."[२७] संभाजीराजांचा १६७० पूर्वीही राजदरबारात वावर होता. त्यांना मानसन्मान होता. नंतर त्यांच्यावर महत्वाच्या जबाबदाऱ्या देण्यात आल्या. खजिन्याची जबाबदारी, न्याय निवाड्यातील जबाबदारी आणि राज्यकारभारात लक्ष घालण्याची जबाबदारी देण्यात आली. इत्यादी बाबींचा विचार करता संभाजीराजे प्रत्यक्षपणे प्रशासन व्यवस्थेमध्ये कार्य करण्यास प्रारंभ करतात.

संभाजीराजांच्या कार्यपद्धतीचा आणि पारदर्शक स्वभावाचा प्रभाव शिवाजी महाराज व मंत्री मंडळावर पडला असावा. त्यांनी रयतेचे प्रश्न सहानुभूतीपूर्वक समजून घेतले. त्यांना योग्य तो न्याय दिला. यामुळे सर्वसामान्य रयतेला संभाजीराजांबाबत आपुलकी वाटत असे.

## १.२७ 'बुधभूषण' ग्रंथ : संभाजीराजे

संभाजीराजांनी संस्कृत भाषेमध्ये राज्यव्यवस्था नीती सांगणारा ग्रंथ लिहिला आहे. या ग्रंथाचा लेखन काळ इ.स. १६७० नंतरचा आहे. या ग्रंथामध्ये राज्यव्यवस्थेबाबतची मूल्य आलेली आहेत. ती उच्च राजनैतिकतेचे द्योतक आहेत. या ग्रंथातील श्लोकसंग्रह शिवाजी महाराजांना राज्यव्यवहाराबाबत केलेल्या उपदेश असावेत असे वाटते. या ग्रंथामध्ये महत्वाचा एक श्लोक आलेला आहे. तो श्लोक संभाजीराजे राजकीय, सामाजिक गुणवर्णन करणारा आहे. तो श्लोक पुढील प्रमाणे : [२८]

तस्यात्मनः शंभुरिति प्रसिद्धः समस्तसामंत शिरोवतंसः|

यःकाव्यसाहित्यपुराण गीत कोदण्डविद्यार्णवपारगामी ||१५

भाषांतर- म्हणजे काव्य, अलंकारशास्त्र, पुराणे, संगीत आणि धनुर्विद्या यात पारंगत असलेला त्याचा (शिवाजीचा) मुलगा शंभु या सर्व मांडलिक राजांच्या अग्रस्थानी शोभत आहे.

संभाजीराजांच्या प्रस्तूत श्लोकाचे सूक्ष्म चिंतन केल्यानंतर एक गोष्ट सहज नजरेत येते. ती म्हणजे शिवाजी महाराजांनी संभाजीराजांना उत्तम प्रकारचे उत्कृष्ट शिक्षण देऊन सुविद्य योद्धा, राज्यकर्ता आणि बहुजनांचा उद्धारकर्ता केले होते असे दिसून येते. यासाठी 'शिवभारत' या ग्रंथामध्ये शहाजीराजांनी शिवाजी महाराजांना ज्या विद्या देऊन योद्धा बनविले होते. त्यासाठी परमानंदाने 'सनई' करून शिवाजींना पाठविले असे म्हटले आहे. त्याच प्रकारे संभाजीराजांना शिवाजी महाराजांनी 'सनई' करून स्वराज्याच्या वृद्धी, राज्यकारभारासाठी तयार केले होते.

## १.२८ स्वतंत्रपणे राज्यकारभाराचे अधिकार दिले

इ.स. १६७१ नंतर संभाजीराजांना स्वतंत्र अधिकार, न्याय निवाड्याचे हक्क वाकनिस, मुतालिक, कागद, (शाई) शाही, खर्चासाठी रूपये इत्यादी देऊन राज्यकारभारात

घेतले होते. याबाबतची माहिती 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' या ग्रंथात नोंदविली आहे. ती माहिती पुढील प्रमाणे, "१९ सप्टेबर १६६१ पूर्वीच महादाजी यमाजी हा चिरंजीव संभाजीराजे यांकडे वाकनिसीचे मुतालिकीस होता. त्याला दरबारात येण्याजाण्याचे काम करावे लागे. म्हणून वार्षिक १०० होन मुक्रर केले होते. लिहिण्यासाठी कागद, शाही (शाई) स्विरे (१) व मदतनीस देण्यास शिवाजी महाराजांनी दि. १९ सप्टेंबर १६७१ या दिवशी धारराव निंबाळकर यांस लिहिले होते"[२९] या नोंदीवरून स्पष्ट अर्थबोध होतो. संभाजीराजांना राज्यव्यवहारात घेताना शिवाजी महाराजांनी त्यांना स्वतंत्र अधिकार आणि त्यांच्या हाताखाली योग्य माणसे दिली होती.

संभाजीराजांचा स्वराज्यातील प्रवेश नव्या राजाला वा राजपुत्राला शोभेल असाच करण्यात आलेला आहे. यातून शिवाजी महाराज संभाजीराजांवर स्वराज्याची जबाबदारी सूचित करत आहेत. तर दुसऱ्या बाजूस स्वराज्यातील जनतेला मंत्र्यांना, सरदारांना, स्वराज्याचा उत्तराधिकारी संभाजीराजे असल्याचे स्पष्ट करतात.

### १.२९ संभाजीराजांच्या यशस्वी युद्ध मोहिमा

राज्यव्यवस्थेत आल्यानंतर इ.स. १६७२ सालानंतर संभाजीराजे आघाडीवर जाताना दिसतात. शिवाजी महाराजांनी संभाजीराजांना मोठ्या तुकड्यांचे नेतृत्व दिले असल्याच्या नोंदी आहेत. त्यांच्या नेतृत्वाखाली झालेली युद्ध यशस्वी झाल्याचेही तपशिल उपलब्ध होतात. त्यांच्या युद्धावरील आघाडीची माहिती देणारा वृत्तांत गुजरातमध्ये असणारा फ्रेंच प्रवासी 'ॲबे करे' नोंदवितो, "शिवाजी राजांनी आपल्या सैन्याचे विभाग करून शेजारच्या सर्व शत्रूंवर एकाच वेळी हल्ला चढविला आहे... शिवाजी राजांनी हजार शूर अशा सैन्याचा आपल्या मुलाच्या (संभाजीराजे) ताब्यात दिला होता. हा युवराज लहान असला तरी धैर्यशील आणि आपल्या पित्याच्या कीर्तीस साजेल असा शूर वीर आहे. शिवाजी महाराजांसारख्या युद्धकुशल बापाबरोबर नाहूर तो युद्ध कलेत तरबेज झालेला

असून, चांगल्या वयोवृद्ध सेनापतीचीही बरोबरी करील इतका तो तयार आहे. तो मजबूत बांध्याचा असून अति रूपवान आहे. "[३०] प्रस्तुत नोंदीबाबत सुरेंद्रनाथ सेन यांचे म्हणणे असे आहे की, ॲबे करे याला ही सर्व माहिती मराठा सरदाराने सांगितली असावी. वरील नोंदीतील तपशील पाहिले असता संभाजीराजांना युध्दाचे ज्ञान लहान वयापासूनच होते. ते पराक्रमी आणि संख्येने मोठ्या असणाऱ्या सैन्यांच्या तुकडीचे नेतृत्व करत होते. शिवाजी महाराजांच्या पराक्रमाला साजेसा असा पराक्रम त्यांच्या हातून होतो आहे. असे सेन नोंदवितो. यावरून संभाजीराजास पराक्रम, नेतृत्व गुण समजतात.

## १.३० खंबायत-गुजरात प्रांतावर स्वारी : संभाजीराजे

संभाजीराजे स्वराज्याच्या राज्यकारभारात आल्यानंतर त्यांनी युद्धाच्या परराष्ट्र वकीलाशी लुटीसाठी मोहिमा आखल्या. काही मोहिमा शिवाजी महाराजांच्या आदेशावरून करण्यात आल्या. स्वारीवर जाण्यासाठी संभाजीराजे अत्यंत प्रसन्न, आनंदी असत. स्वराज्य उभारणीसाठी कोणतेही खडतर कष्ट घेण्याची तयारी संभाजीराजांनी ठेवलेली होती. खंबायत-गुजरात स्वारीवर जाण्यासाठी संभाजी अत्यंत उत्साही होते. याचे वर्णन 'ॲबे करे' यांनी अत्यंत समर्पक शब्दात नोंदविले आहे. "संभाजीराजाला खंबायत आणि गुजरात प्रांतावरील राज्यांवर स्वारी करण्यास हुकूम देण्यात आला. आपल्या वडिलांनी व आपल्याला इतकी महत्वाची व मोठी कामगिरी सांगितलेली पाहून त्याला धन्यता वाटली आणि मोठ्या कार्यप्रेरित होऊन तो आपल्या सैन्यानिशी विशेष पराक्रम करून दाखविण्यास उद्युक्त झाला. ज्यांच्यावर तो स्वारी करणार ते त्याच्या नावाच्याच दराऱ्याने पळून गेले, त्यामुळे त्याला यश आणि किर्ती मिळविणे सोपे गेले. त्याने थोड्या अवधीत बराचसा मुलुख कब्जात आणला. या बालराजाची सर्वत्र इतकी स्तुती केली जाते की, त्याच्या बापालाही हेवा वाटत असेल. "[३१] संभाजीराजांच्या पराक्रमाचा दरारा स्वराज्यात व परकीय सत्तेलाही वाटत होता. त्यांच्या पराक्रमाने अनेक शत्रू पळून गेल्याची नोंद अतिशयोक्ती वाटत असली तरी शत्रूला भीती वाटत होती हे मात्र खरे.

संभाजीराजांना त्यांच्या पराक्रमाने सर्वत्र नावलौकिक आणि आपलेपणा प्राप्त झाला या गोष्टीचा अभिमान शिवाजी महाराजांना वाटणे स्वाभाविक आहे. यावरून संभाजीराजांच्या राज्यव्यवहाराची पकड आणि दरारा स्पष्ट होतो. महाराजांचा विश्वास संभाजीराजांनी सार्थ ठरवला होता.

संभाजीराजांच्या प्रशासन व्यवस्थेचा विचार करता उत्तम प्रशासक, कुशल सेनापती, धैर्यशील 'राजा' इत्यादी गोष्टींचा स्पष्ट उलगडा त्यांच्या जीवनचरित्रांचा अभ्यास केल्यास स्पष्ट होतो. संभाजीराजे लहानपणापासून अडचणींना सामोरे जात लहानाचे मोठे झाले होते. आईचे छत्र हरविल्यामुळे सर्वांचा संभाजीराजांना लळा आणि प्रेम होते. लहान वयातच शिवाजी महाराजांनी संभाजीराजांना राज्यकारभारात सामावून घेतलेले होते. यातुनच त्यांनी मुघलांचे मनसब आणि आग्राभेटीसाठी बरोबर घेऊन गेले. स्वराज्याचा राजपुत्र लहानपणापासून स्वराज्याच्या रक्षणासाठी तयार केले जात होते. उत्तम प्रकारे राजव्यवस्थेचे धडे संभाजीराजांनी प्राप्त केले होते.

इ.स. १६७० पूर्वी मुघालांची मनसब संपुष्टात येते. शिवाजी महाराज संभाजी-राजांना स्वराज्याच्या राज्य कारभारात घेतात आणि स्वराज्यातील खजिना, शिक्के, तंटे, महसूल इत्यादी जबाबदाऱ्या देतात. संभाजीराजे या जबाबदाऱ्या अत्यंत कुशलतेने पार पाडतात. त्याचबरोबर गुजरात मोहिमेवर गेले, दहा हजार सैन्याचे नेतृत्व केले. याबाबी पाहता संभाजीराजांचा यशस्वी प्रारंभ झालेला होता. तत्कालीन काळातील परकीय प्रवासी, परकीय शत्रू, मुघल इत्यादींवर संभाजीराजांचा मोठा वचक बसला होता.

संभाजीराजे राज्यकारभाराचे शिक्षण घेत असताना त्यांचा इंग्रज वखारदाराशी संबंध आला. शिवाजी महाराजांच्या अनुपस्थितीत संभाजीराजांना इंग्रजांशी वागण्या-बोलण्याचा वा करार करण्याची संधी मिळाली. संभाजीराजांचा संबंध टॉमस निकल्स याच्याशी आला. त्यांनी अत्यंत अदबीने त्यांची चौकशी, राहण्याची व्यवस्था केली.

महाराजांच्या अनुपस्थितीत टॉमस निकल्स याचे म्हणणे शिवाजी महाराजांना निवेदन करण्याचे वचन दिले. यातून संभाजीराजे यांचे प्रशासनातील अनुभव स्पष्ट होतात.

प्रस्तूत प्रकरणाच्या अभ्यासातून हाती आलेले निष्कर्ष नोंदविले आहेत. ते निष्कर्ष पुढील प्रमाणे,

**समारोप**

१. संभाजीराजांच्या जन्मानंतर दोनच वर्षात त्यांच्या आईचे निधन झाले. आईविना मोठे होणारे संभाजीराजे यांच्यावर आईप्रमाणे प्रेम व माया जिजाऊ, शिवाजी महाराज, सावत्र आईंनी केली. उत्तम संस्कार, शिक्षण आणि राज्यव्यवस्थेचे धडे संभाजीराजांना त्यांच्या कुटुंबियांकडून मिळाले.

२. संभाजीराजांना वयाच्या ९ व्या वर्षी औरंगजेबाची मनसब मिळाली होती. या मनसबीनुसार त्यांना काही काळ मुघलांच्या छावणीत लहान वयात रहावे लागले होते. या ठिकाणीही त्यांचा दरारा होता.

३. मुघलाच्या मनसबीनुसार संभाजीराजांना औरंगजेबाच्या वाढदिवसासाठी आग्र्याला जावे लागले होते. दुरचा प्रवास, वातावरण प्रतिकूल आणि शिवाजी महाराजांवर ओढविलेला कैदेचा प्रसंग याचा परिणाम संभाजी राजावर झाला. अशा वातावरणात व राजकीय घडामोडीत संभाजीराजांचे व्यक्तिमत्व तयार झाले.

४. आग्र्याच्या प्रसंगामध्ये वयाने लहान असणाऱ्या संभाजीराजांचे मनोधैर्य, चिवटपणा आणि प्रसंगावधानी स्वभाव इतयादी बाबींचा प्रत्यय आला.

५. संभाजीराजांना अक्षर ज्ञानाबरोबर पुराण-शास्त्र, तलवारबाजी, कुस्ती, बाण-भाला, इत्यादी शस्राचे आणि शास्राचे शिक्षण दिले होते. त्याचबरोबर प्रशासनाचे उत्तम शिक्षण देण्यात आले होते . हे शिक्षण शिवाजी महाराज यांनी पगारी शिक्षकांची नियुक्तीद्वारे केले होते.

६. संभाजीराजांनी इ.स. १६७५ च्या नंतर 'बुध्दभूषण' नावाचा राजनीतीवरील उत्तम ग्रंथ लिहिला हा ग्रंथ वाङ्मयीन विषय तत्वज्ञानाच्या दृष्टीने उत्तम आहे.

७. इ.स. १६७० नंतर संभाजीराजांचा स्वराज्याच्या राजकारणात प्रत्यक्षपणे प्रवेश झाला. जिजाऊ यांच्याकडे असणाऱ्या जबाबदाऱ्या संभाजीराजांना सोपविण्यात आल्या. यातून संभाजीराजांची योग्यता समजते. त्यांनी शिवाजी महाराजांचा राजकीय विश्वास सार्थ ठरविला.

८. संभाजीराजांनी गुजरात व अन्य ठिकाणांवर हल्ले चढविले आणि स्वराज्यासाठी संपत्ती जमवली. शिवाजी महाराजांनी दहा हजार सैन्यांचे नेतृत्वाची जबाबदारी संभाजीराजांवर टाकली. संभाजीराजांनी ही जबाबदारी यशस्वीपणे पार पाडली.

९. इंग्रज प्रवासी आणि शत्रुकडील लोकांनाही संभाजीराजांच्या पराक्रमाची प्रचिती आलेली होती. या बाबतीतील नोंदी मुक्तकंठाने त्यांनी नोंदविलेल्या आहेत. यावरून संभाजीराजांचा राजकीय व पराक्रम इत्यादीचा प्रत्यय येतो.

१०. प्रशासनातील उत्तम जाण संभाजीराजांना असल्याचा प्रत्यय त्यांच्या प्रत्येक राजकीय धाडसी निर्णय, दरबारातील शिष्टाचार, परकीय वकीलांसोबतचे संबंध इत्यादी बाबीचा विचार करता ते अधिक स्पष्ट होते.

११. संभाजीराजांना स्वराज्याचा उत्तराधिकारी म्हणून शिवाजी महाराज प्रयत्न करत होते. महाराजांनी संभाजीराजांना अडचणीतून सावरण्याचे कार्य उत्तम प्रकारे केले. यातून त्यांची प्रशासनविषयक अनुभवांची कल्पना येते.

पुढील प्रकरणामध्ये संभाजीराजे यांचे स्वराज्याच्या उभारणीतील अनुभव व स्वराज्य निर्मितीतील योगदान या बाबींचा चिकित्सकपणे शोध घेतला आहे.

**संदर्भ सूची :**


१. बेंद्रे, वा.सी : श्री. छत्रपती संभाजी महाराज, पार्श्व पब्लिकेशन, कोल्हापूरः चतुर्थ आवृत्ती, २०१३ पृ. ६७

२. गाडे, करिना : ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खंड-२, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे प्रथमावृत्ती, १९६०

३. बेंद्रे, वा.सी.: छ. संभाजी महाराजः उनि. पृष्ठ ६७

४. तत्रैव पृ.६७

५. तत्रैव पृ. ७०

६. दिवेकर, स.म. (संपा) : कवी परामनंदकृतः शिवभारत, भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे शके १८४९ पृ. ८३

७. मावजी, पु.वि. व पारसनीस, द.वि. (संपा) : सनदापत्रातील माहिती भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे १९१३ पृ. १५७, खंड ३१.

८. साने, का.ना. (संपा) : चिटणीसकृत शिवछत्रपती महाराज यांचे सप्तप्रकरणात्मक चरित्र काव्येतिहास संग्रह प्रकरण पुणे १८८९ पृ. २७१-७२

९. Velankar, H. D.श्री मच्छंभुनृपविरचितम बुधभुषणम, Published by Bhandarkar oriental Research Institutes Government Oriental Serice, Class-३, No.२ Pune १९२६ Pe, ०२.

१०. Sen, Surendra : Foreign bioqraphies of Shivaji Vol.II Book Company Ltd.Calcutta, १९३१ p. २३२.

११. बेंद्रे, वा.सी. : श्री. छ. संभाजी उनि. पृ. ६८

१२. तत्रैव पृ. ६९

१३. गोखले, कमल : शिवपुत्र संभाजी. कॉन्टिनेन्टल प्रकाशन पुणे १९७१ पृ. २८

१४. बेंद्रे, वा.सी.(संपा) केशवपिंतकृतम धर्मकल्पलतान्तर्गतनीतिमंजयमि नीतिप्रकरणम् (सम) भा.इ.स.म. ग्रंथमाला ५९ पुणे १९४३ पृ. २७२

१५. बेंद्रे, वा.सी. श्री. छत्रपती संभाजी उनि. पृ. ११४

१६. शेजवलकर, त्र्यं. शं. श्री शिवछत्रपती, मराठी मंदीर प्रकाशन मुंबई १९७१ पृ. १४२.

१७. पवार, जयसिंगराव : छत्रपती संभाजीः एक चिकित्सा, मेहता पब्लिशिंग हाऊस, कोल्हापूर २०१८ पृ. ४४.

१८. पवार, जयसिंगराव : छत्रपती संभाजीः एक चिकित्सा तत्रैव पृ. ४४.

१९. कानेटकर, वसंत : रायगडाला जेव्हा जाग येते, मेहता पब्लिशिंग हाऊस, पुणे १९८० पृ. ७१.

२०. पवार, जयसिंगराव : छत्रपती संभाजी : एक चिकित्सा उ.नि. पृ. ४७.

२१. गोखले, कमलः शिवपुत्र संभाजी, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे आवृत्ती २०१४ पृ. २८.

२२. राजवाडे, वि.का. (संपा) मराठ्यांच्या इतिहासाची साधने खंड-८, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे १९०३ पृ. १६.

२३. गोखले, कमल : शिवपुत्र संभाजी, उनि. पृ. २९.

२४. आपटे, द.वि. व दिनेकर, स.म. (संपा) : शिवचरित्रप्रदीप (मराठी) भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे ग्रंथमाला ४ पुणे आवृत्ती १९२५ पृ. २३.

२५. Shih, rajhabir and Sarkar, Jadnnath (Trams. Jation), Rajasthani records) Shivaji's visit to Aurangazeb at Agra. Indian history Congress Research series No.१, Colcutta १९६३ p. ३०२.

२६. बेंद्रे, वा.सी. श्री. छत्रपती संभाजी महाराज उनि. पृ. ८४.

२७. तत्रैव पृ. ८५-८६

२८. कदम, रामकृष्णः बुधभूषण-राजनीती, राजमयुर प्रकाशन पुणे २०१२ पृ. ७२.

२९. राजवाडे, वि.का. (संपा) : मराठ्यांच्या इतिहासाची साधने (खंड-८), भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे १९०३ पृ. ९१.

३०. Sen, Surendra Nath : Foreign Bioqrophies of Shivaji Vol. II Book company Ltd. Colcutta, १९३१ p. २३२-२३३.

३१. वाड, ग.चि व मावजी, पु.वि. : दक्षिणेतील सरदारांच्या कैफियती, भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे १९०६ पृ. २९.

*****

# प्रकरण दुसरे
# संभाजीराजांचे स्वराज्यनिर्मितीतील योगदान

२.१ स्वराज्य : सामाजिक, राजकीय व सांस्कृतिक विचारप्रणाली

२.२ शहाजीराजे-जिजाऊ : स्वराज्यनिर्मितीचा संकल्पक

२.३ शिवाजी महाराजांना शहाजीराजांची प्रेरणा

२.४ स्वराज्यनिर्मितीची पायाभरणी : शिवाजी महाराज

२.५ संभाजीराजे : स्वराज्यनिर्मितीचा हेतू लोककल्याण

२.६ स्वराज्यनिर्मिती आणि संभाजीराजे

२.७ संभाजीराजे आणि दिवाणी कामकाज

२.८ दरबारातील तंट्याचे निकाल आणि संभाजीराजे

२.९ सॅम्युअल ऑस्टिन तंटा आणि संभाजीराजांची उपस्थिती

२.१० शिवाजी महाराजांच्या कारकीर्दीतील संभाजीराजांची दोन पत्रे

२.११ स्वराज्यरक्षण आणि संभाजीराजांच्या युद्ध आघाड्या

२.१२ स्वराज्याच्या कामात शिवाजीला संभाजीची मदत

२.१३ स्वराज्य आणि इंग्रज वाटाघाटीची यशस्वी मध्यस्थी

२.१४ संभाजीराजांबाबतचे इंग्रजांचे गौरवपूर्ण उद्गार

२.१५ स्वराज्य भक्कम संभाजीराजांचे प्रयत्न

२.१६ स्वराज्याची तत्त्वज्ञानात्मक विचारप्रणाली

२.१७ उदारमतवाद आणि संभाजीराजांचे राजकीय धोरण

# प्रकरण दुसरे
# संभाजीराजांचे स्वराज्यनिर्मितीतील योगदान

मध्ययुगीन कालखंडातील राजकीय, सामाजिक, सांस्कृतिक-धार्मिक परिस्थिती अत्यंत गुंतागुंतीची अस्थिर होती. सामान्य माणसाचे जीवन संकटमय, भयपूर्ण आणि लाचारीचे होते. जमीनदार, सरदार मन मानेल तसे वागत. सत्तांतर सातत्याने होत असे. आजचा प्रदेश उद्या कोणत्या राजवटीच्या अंमलाखाली असेल याची निश्चिती नसे. अस्थिर राजवटीमुळे सामान्य जनतेला स्थिर जीवन प्राप्त झाले नव्हते. तर सरदार, मनसबदार यांच्यामध्ये सत्तात्मक स्पर्धा होती. या स्पर्धेला मूल्यात्मकता नव्हती. यामुळे स्वामीनिष्ठेपेक्षा, लाचारी, कारस्थाने अधिक असत. अशा संकटामध्ये महाराष्ट्र सापडलेला होता.

देवगिरीच्या रामदेवराय यादव यांच्या राजवटीमध्ये अंतर्गत कलह, धार्मिक कर्मकांड, रूढी-परंपरा आणि मंत्रीमंडळातील मंत्र्यांची स्वार्थी महत्वाकांक्षा इत्यादी कारणांनी यादवांचे राज्य अस्त पावले. यामुळे परकीय सत्तेला महाराष्ट्रामध्ये राज्यकारभारासाठी वाव मिळाला. या परकीय सत्तेतील शोषणव्यवस्था तत्कालीन सरदारांना ज्ञात झाली नाही, असे म्हणता येणार नाही. पण स्वस्वार्थाकडे अधिक लक्ष दिल्यामुळे स्वराष्ट्राचा नाश झाला. राजकीयदृष्ट्या ही परिस्थिती परिवर्तीत करण्यासाठी फारसे प्रयत्न झाले नाहीत, त्यानंतर सत्तांतरे झाली असली तरी, राजकीय परिस्थिती फारशी बदलली नाही. या दृष्टीने पुढे सर्वव्यापक परिवर्तनाचा प्रयत्न १६ व्या शतकामध्ये शहाजीराजे-जिजाऊ आणि शिवाजी महाराज यांनी 'स्वराज्य' निर्मितीच्या माध्यमातून केलेला आहे. या राज्यव्यवस्थेला व्यापक मानवतेचे, स्वातंत्र्याचे, न्यायाचे मूल्यस्वरूप होते. या बाबींचा तपशिलात पुढे विचार करण्यात आलेला आहे.

मध्ययुगीन कालखंडामध्ये समाजपरिवर्तनाचा वैचारिक विचार प्रवाह नाथ संप्रदाय, महानुभाव संप्रदाय, वारकरी संप्रदाय इत्यादी संप्रदायाने निर्माण केला. या संप्रदायांचा मुख्य

वैचारिक गाभा धर्मव्यवस्था सुधारण्याचा होता. यामुळे परिवर्तनाच्या चळवळीला सामाजिक व्यापक आयाम प्राप्त झाले. जगभरातील परिवर्तनांच्या चळवळीचा विचार करता भक्ती संप्रदायाच्या आधारे समाज परिवर्तन करणारी व्यापक चळवळ म्हणून या चळवळीचा अग्रक्रमाणे विचार करावा लागेल. या चळवळीने सर्व स्तरातील लोकांना एकत्र केले आणि वैचारिक परिवर्तनाच्या भूमिकेबरोबर सांस्कृतिक मूल्यात्मक भूमिका घेतली. यातुनच नव्या विचारसरणीचा उदय झाला. विचारसरणीचा गाभा मानवी स्वातंत्र्य हा होता. आधुनिक काळात ज्या मूल्यस्वरूपात आणि वैचारिक तत्वज्ञानातून मानवी स्वातंत्र्याचा विचार युरोपमध्ये उदयास आला, त्या स्वरूपातील शास्त्रशुद्धता व तंतोतंतता 'भक्ती संप्रदायातून' प्रतिबिंबित होत नसली तरी स्वातंत्र्याचा विचार महत्त्वपूर्ण ठरला.

महानुभाव व वारकरी संप्रदायांच्या सांस्कृतिक, सामाजिक आणि धार्मिक परिवर्तनाच्या चळवळी राजकीय परिवर्तनाच्या प्रबोधनाची व्यापक बीजे रूजलेली आहेत. यातुनच सत्तांतर, स्वराष्ट्र प्रेम, स्वबांधव स्नेह, स्वराज्य इत्यादी मूल्यांची निर्मिती झाली असून यातूनच 'स्वराज्य' निर्मितीची प्रेरणा शहाजीराजे-जिजाऊ यांना स्फूरली असावी. या दृष्टीने अभ्यास झालेला असून अधिक व्यापक अभ्यासाची गरज असल्याचे जाणवते. कारण नवा राजकीय विचार उदय सामाजिक, सांस्कृतिक तत्वज्ञानात असतो. या सिध्दांताचा विचार करता स्वातंत्र्य समता, न्याय, मानवता आणि बंधुत्व या मूल्यविचारातून 'लोकशाही' ही राजकीय शासन प्रणाली विकसित झालेली आहे असे दिसते. या दृष्टीने महानुभाव वारकरी संप्रदायांच्या वैचारिक भूमिकेत स्वराज्य स्थापनेची उद्याची बीजे असण्याची खूप शक्यता आहे. म्हणूनच या अभ्यासाची गरज जाणवताना दिसते.

## २.१ स्वराज्य : सामाजिक, राजकीय व सांस्कृतिक विचारप्रणाली

'स्वराज्य' ही केवळ मुघल सत्तेला दिलेल्या पर्यायांची राजकीय व्यवस्था नसून ती सामाजिक-राजकीय विचारप्रणाली होती. या वैचारिक व्यवस्थेमध्ये समाजाच्या व्यापक विकासाचा हेतू, उद्दिष्ट्ये सामावलेली होती. समाजजीवनाला स्थिर आणि दूरगामी विचार

मूल्ये देण्याच्या ध्येयाने प्रेरित झालेला विचार स्वराज्य निर्मितीमागे असताना दिसतो. मालोजीराजे-शहाजीराजे यांच्या काही पिढ्या राजकारणामध्ये वावरलेल्या होत्या. यामुळे समाजजीवन, नेतृत्व आणि प्रशासनव्यवस्था इत्यादी गोष्टी त्यांनी जवळून पाहिलेल्या असल्यामुळे प्रशासन व्यवस्थेचा मनमानी कारभार आणि या कारभारात शोषण होणारी जनता याच्याबाबत मनस्वी चिंतन भोसले घराण्याने केलेले आहे. याबाबतचे पुरावे इतिहासात जागोजागी सापडतात.

'स्वराज्य' ही राजकीय विचारप्रणाली असून, या प्रणालीच्या केंद्रस्थानी सामान्य बहुसंख्य जनतेच्या हिताचा, कल्याणाचा आणि स्वातंत्र्याचा विचार आहे. मुघल राजकीय सत्तेत 'राजा' हा सर्वश्रेष्ठ असून, त्याच्या केंद्रस्थानी सत्तेचे केंद्रीकरण झालेले असते. यामुळे सामान्य जनता न्याय, हक्क, अधिकार आणि विकासापासून वंचित राहते. स्वराज्यामध्ये मात्र राजापेक्षा 'जनतेचा विकास', या बाबीला अधिक महत्व दिले जात असल्यामुळे, आधुनिक भारताच्या लोकशाही समाजव्यवस्थेची मूल्ये स्वराज्याच्या मूल्य व्यवस्थेत रूजली असे स्पष्टपणाने जाणवते.

'बळी' हे नाव शेतकऱ्यासाठी योजले जाते. यातून बळीराजाचा शेतीशी आणि शेतकऱ्याशी असणारा घनिष्ट नातेसंबंध स्पष्ट होतो. शिवाजी महाराजांच्या आयुष्यातील प्रारंभीची सामाजिक-राजकीय कृती म्हणजे पुण्याची भूमी नांगरणे होय. या कृतीमागे कृषी आणि सांस्कृतिक सहसंबंध आहे. आपण निर्माण करीत असलेले स्वराज्य शेतकऱ्यांचे, कष्टकऱ्याचे आणि आपल्या पूर्वजांच्या वैचारिक वारसाचे पुनर्जीवन असल्याचे एकाअर्थाने सूचित करतात. अर्थात बळीराजा आणि शिवाजी महाराज यांच्यामध्ये शेती-शेतकरी यांच्या शोषणमुक्तीचे समान सूत्र आहे. एवढ्यावरून स्वराज्याच्या वैचारिक मूल्यांचा अर्थ सूचित होतो.

स्वातंत्र्य व मानवतावादी राज्यव्यवस्था निर्मितीचे स्वप्न शहाजीराजे-जिजाऊ यांनी पाहिले आणि शिवाजी महाराजांच्या रूपात सत्यात आणण्याचा प्रयत्न केला. संभाजी राजांच्या पराक्रमाने स्वराज्याचे रक्षण झाले आणि विस्तारही झाला.

## २.२ शहाजीराजे-जिजाऊ : स्वराज्यनिर्मितीचा संकल्पक

'स्वराज्य' निर्मिती ही प्रक्रिया शहाजीराजे यांच्यापासून झालेली आहे. शहाजीराजे स्वतंत्र व्यक्तिमत्वाचे, स्वजनहिताचा विचार करणारे होते. त्यांना सातत्याने स्वजनतेचे राज्य असावे असे वाटे. यातूनच स्वराज्याची कल्पना स्फूरली या दृष्टीने दोन वेळा प्रयत्नही झाला. पण त्या गोष्टींना यश आले नाही. त्यांचा हा प्रयत्न पाहून आदिलशहाने त्यांना पुणे, सुपे, चाकण आणि इंदापूरची जहागिरी दिली होती. पण विजापूरच्या जहागिरीवर पाठविण्यात आले. यामागे आदिलशहाची धोरणात्मक राजकीय योजना होती. शहाजी-राजांना पुण्याच्या जहागिरीत ठेवल्यास ते स्वतंत्र विचाराचे असल्यामुळे नव्या राज्याची निर्मिती करतील याचमुळे त्यांना दूर ठेवण्यात आले. यातुनही त्यांचे स्वराज्यविषयक प्रयत्न स्पष्ट होतात.

शहाजीराजांच्या पराक्रमाने, स्वतंत्र व्यक्तिमत्वाचे आणि त्यांचे योग्यतेचे अत्यंत समर्पक, अर्थपूर्ण वर्णन 'शिवभारत' या ग्रंथामध्ये 'परमानंदस्वामी' यांनी केलेले आहे. ते पुढील प्रमाणे,[१]

पूर्वमस्यैवावलंबादिभरामःपितामम |
विध्वस्तारामिरध्यास्त निर्विशंकः स्वमानसम् ||२६
सहसावमतः सोड्यं मतिमंदतचा मया |
मामुपेक्ष्या गती मानदिभरामादनंतरम् ||२७
महामानी महागाहुरसौ शाहमहीपतिः |
कृत्वा मदाधिक स्नेहमिभरामेण वर्धितः ||२८

**भाषांतरः**

पूर्वी माझा बाप इब्राहिमशहा हा याच्याच साह्यानें

शत्रुंचा विध्वंस करून निश्चित होता. पण त्याच्या

मृत्यूनंतर म्या मुर्खपणाने त्याचा एकाएकी अपमान

केल्यामुळे तो मान शहाजी मला सोडून गेला. इब्राहिमशहाने

ह्या मनमानी व पराक्रमी शहाजीवर मजपेक्षा

अधिक प्रेम करून त्यास योग्यतेस चढविले.

परमानंदस्वामींनी शहाजीराजांच्या योग्यतेची नोंद शहाजीराजांचे व्यक्तिमत्व समजून घेण्याच्या दृष्टीने जितकी महत्वाची आहे; तितकीच त्यांचे स्वातंत्र्याच्या अनुषंगाने विकसित असणारे समाजमन ही समजून घेण्याच्या दृष्टीने महत्वपूर्ण आहे. वरवर पाहता शहाजीराजे स्वाभिमानी वाटतात; पण खोल व्यक्तिमत्वाचा विचार करता नोकरीला असतानाही व्यक्ती गुलामीची वागणूक देणारी मूल्य त्यांना रूचत नसताना दिसतात. यामागे त्यांच्या मनात असणारी व्यापक स्वातंत्र्याची मूल्य प्रतिबिंबित होतात. सरदार असताना आपणास अशी वागणूक दिली जात असावी या विचाराने त्यांचे मन व्यथित होत असावे. असा तर्क बांधण्यास वरील श्लोकामुळे खुपसा वाव आहे. शहाजीराजांसारखा महापराक्रमी योद्धा आपणास सोडून गेला; याचे दुःख इब्राहिमशहाच्या मुलास का होते याचा शोध घेतल्यास वरील बाबींचा सहज उलगडा होतो.

शहाजीराजांसारख्या पराक्रमी शूर स्वाभिमानी, स्वजनहितदक्षराजाने स्वराज्याचे स्वप्न पाहिले नव्हते, असे म्हणणे ऐतिहासिकदृष्ट्या म्हणता येणार नाही. त्यांनी स्वराज्याचे स्वप्न पाहिले आणि आपल्या आयुष्यातच स्वराज्याचा पाया घातला, शिवाजी महाराजांच्या पराक्रमाने या स्वराज्य स्वप्नाला मूर्त स्वरूप प्राप्त झाले, तर संभाजीराजांच्या पराक्रमाने, राजकीय विचाराने आणि सर्वसामान्यांच्या सहकार्याने स्वराज्याचा विस्तार झाला. यामुळे

महाराष्ट्राच्या राजकीय, सामाजिक-सांस्कृतिक जीवनात वैचारिक परिवर्तन झाले. मला स्वतःला असे वाटते की, फ्रेंच राज्यक्रांतीपूर्वी महाराष्ट्रात तीनशे-साडेतीनशे वर्षापूर्वी (१)स्वातंत्र्य, (२) न्याय, (३)समता, (४)बंधुत्व आणि जनसामान्यांचे हित या मूल्यांची ओळख झालेली होती. अर्थात स्वराज्याच्या मूल्यतत्वांचा पाया वरील तत्वावर आधारित होता.

## २.३ शिवाजी महाराजांना शहाजीराजांची प्रेरणा

शिवाजीराजे आणि त्यांचे वडिलबंधू संभाजी महाराज यांच्या कार्यकर्तृत्वाची प्रेरणा, मार्गदर्शक आणि मूल्यशिक्षक शहाजीराजे-जिजाऊ ही असताना दिसतात. या दोघांच्याकडे पराक्रम, उत्तर राज्यव्यवस्था, नेतृत्व गुण, इत्यादीचा मोठा वारसा होता. हा वारसा त्यांनी आपल्या मुलांना दिला. मुलांनाही हा वारसा आपल्या सामर्थ्याने, क्षमतेने यशस्वीपणे आत्मसात केला आणि आई-वडिलांप्रमाणे आपले नाव इतिहासावर अधोरेखित केले. शिवाजी महाराजांना शहाजीराजांनी पुण्याच्या जहागिरीवर पाठवितांना स्वतंत्र राजा म्हणूनच पाठविले होते याचे उत्तम काव्य वर्णन 'शिवभारत' ग्रंथामध्ये परमानंदस्वामींनी पुढील प्रमाणे केले आहे ते असे, [२]

ततः कतिपयैरेव गजवाजिपदातिभिः |

मौलेराप्तैरमात्यैश्र्च ख्यातैरध्यापकैरपि ||२५

बिरूदैश्र्व ध्वजैरूच्चैः कोषेणापिच भुयसा |

तथा परिजनैरन्यैरनन्य समकर्मभिः ||२६

समवेतमसुं शाहभुपतिश्शोमने दिने |

प्राहिणोत्पुण्यादेशाय पुण्य काररिणमात्मजम् ||२७

**भाषांतर :**

नंतर काही हत्ती, घोडे व पायदळ, पिढीजात व

विश्वासू आमात्य त्याचप्रमाणे विश्वात अध्यापक,

बिरूदे, उंच ध्वज, विपूल द्रव्य त्याचप्रमाणे

अद्वितीय कर्मे करणारे दुसरे परिजान या समवेत

त्या पुण्यशील पुत्रास शहाजीराजाने शुभदिनी

पुणे प्रांती पाठविले.

शिवभारतातील परमानंद स्वामींचा श्लोक पाहता, शहाजीराजांनी शिवाजी महाराजांना राज्यकारभारासोबत स्वराज्याची प्रेरणा दिल्याचे स्पष्ट होते. पुण्याच्या पारंपरिक जहागिरीवर पाठवत असतानाही हत्ती-घोडे, ध्वज, बिरूदे, अमात्य राजनैतिक सल्लागार आणि जिजाऊंना पाठविले. यामागे शहाजीराजे यांच्या मनातील हेतू स्पष्ट होतो. या कृतीचा स्पष्ट अर्थ असा होतो, शिवाजी महाराजांना जहागिरीवर पाठविताना स्वतंत्र राज्यकारभाराचा हेतू त्यांच्या मनात होता. त्या दृष्टीनेच शिवाजी महाराज-जिजाऊ यांना विशिष्ट शिक्षण देऊन पाठविण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. याबाबत दुमत असण्याचे कारण नाही.

## २.४ स्वराज्यनिर्मितीची पायाभरणी : शिवाजी महाराज

स्वराज्यनिर्मितीतील संभाजीराजे यांचे योगदान अभ्यासत असताना स्वराज्य संकल्प, उभारणी पायाभरणी आणि विस्तार या प्रक्रियेला ऐतिहासिकदृष्ट्या महत्व आहे. या प्रक्रियेचा शोध घेतला असता संभाजीराजे यांचे कार्यकर्तृत्व, पराक्रम आणि स्वराज्य उभारणीतील योगदान ऐतिहासिकदृष्ट्या स्पष्ट होण्यास मदत होईल. शहाजीराजे-जिजाऊ यांनी तत्कालीन राजकीय अस्थिरतेला प्रतिक्रिया म्हणून नव्या मूल्यांवर आधारित राज्याचे

स्वप्न सातत्याने आणण्याच्या दृष्टीने प्रतिकूल परिस्थितीशी प्रयत्न केले. त्यांनी शिवाजी महाराजांची जडण-घडण स्वतंत्र राजा म्हणून केली. त्यांचे शिक्षण राज्यव्यवस्थेचे धडे अत्यंत हेतूपूर्वक आणि जागृतपणे दिले. यामुळे शिवाजी महाराजांचे व्यक्तिमत्व नवे स्वराज्य उभे करू शकले, हे स्पष्ट होते.

शिवाजी महाराजांनी स्वपराक्रमाने स्वप्रतिष्ठेने स्वराज्य निर्माण केले. यामागे शहाजीराजे-जिजाऊ यांचे मार्गदर्शन, सहकार्य होते. शिवाजी महाराजांनी स्वराज्य निर्माण करत असताना आपले आयुष्य वेचले, कर्तृत्व पणाला लावले, परकीय सत्तेचा उन्माद रोखण्यासाठी सातत्याने नितीमान, कर्तृत्ववान सरदारांना बरोबर घेतले. त्यांना स्वराज्याचा विचार सांगितला. त्यांची मने स्वराज्यासाठी प्रेरित केली आणि स्वराज्याचे देखणे स्वरूप साकार केले. शिवाजी महाराज आणि त्यांच्या सहकार्यांनी स्वराज्याची उत्तम तत्वप्रणालीवर पायाभरणी केली. याबाबत 'शिवपुत्र संभाजी' या ग्रंथात कमल देसाई म्हणतात, "शिवाजीराजे आपल्या वडिलांच्या पुण्यातील जहागिरीत असतानाच त्यांनी इ.स. १६४६ साली आदिलशाही सत्तेशी झगडा सुरू केला. त्यावेळी त्यांच्याकडे इंदापूर, सुपे, पुणे व चाकण हे परगणे होते. दादोजी कोंडदेव यांच्याकडे आदिलशहातर्फे बारा मावळची व्यवस्था होती. त्यांनी सुव्यवस्था उत्पन्न केलेल्या या दुर्गम प्रदेशात सुलतानांनी दुर्लक्ष केलेले होते. या भागातील लोकांनी मराठ्यांच्या स्वातंत्र्य लढ्यात आणि स्वराज्याच्या उभारणीत संपूर्ण सहकार्य दिले. 'हे राज्य व्हावे ही श्रींची इच्छा आहे' असे सांगून आत्मविश्वासाने शिवाजी महाराजांनी दडपणाने आणि भीतीने ग्रासलेल्या सरदारांना स्वराज्य स्थापनेच्या महान कार्यात एकरूप केले. [३]

शिवाजी महाराजांनी स्वराज्य उभारणीच्या प्रारंभी काळातच आदिलशाही सत्तेशी झगडा दिला. तत्कालीन काळातील मोठ्या सत्तेशी स्वीकारलेले वैर पाहून अन्य सरदार, वतनदार, जमीनदार यांना शिवाजी महाराजांचा दरारा वाटू लागला. महाराजांनी आदिलशहाशी झगडा १६४६ ला स्वीकारला तेव्हा या प्रदेशाची व्यवस्था दादोजी कोंडदेव

पाहत असल्याचा उल्लेख कमल गोखले करतात. यावरून स्पष्ट होते. शिवाजी महाराज-दादोजी कोंडदेव यांचा इतिहास कल्पितात तसे संबंध येण्याची शक्यता फार-फार कमी आहे किंबहुना नाहीच.

शिवाजी महाराजांनी आपल्या परगण्यातील मावळे, सरदार, वतनदार यांना नव्या स्वराज्याच्या उभारणीसाठी एकत्र करण्याचा व्यापक प्रयत्न केला. या प्रयत्नाना यश येऊन स्वराज्याची पायाभरणी व्यापक मूल्यव्यवस्थेवर करण्यात आले असे म्हणता येईल.

### २.५ संभाजीराजे : स्वराज्यनिर्मितीचा हेतू लोककल्याण

स्वराज्य निर्मितीची प्रक्रिया व्यापक जनहिताच्या मूल्यांशी एकरूप होती. केवळ साम्राज्यवादाचा आणि 'राजपद' भूषविण्याच्या वरवरच्या घटनेशी, स्वराज्याचा संबंध नव्हता. जातीपातीच्या अन् धर्मव्यवस्थेच्या पलिकडील माणसांचे व माणूसपणाचे संरक्षण करण्याच्या व्यापक हेतूशी निगडीत होते. स्वराज्य हे अन्य राज्यव्यवस्थेपेक्षा असंख्य बाबींमध्ये वेगळे होते.

स्वराज्यनिर्मितीच्या मूल्यव्यवस्थेचा विचार करता, एक गोष्ट स्पष्टपणाने जाणवते. असंघटित समाजाला विधायकदृष्ट्या संघटित करणे आणि सर्वांच्या हिताचे राज्यनिर्माण करणे. राजाधिकारातील लष्करशाही नाहीशी करून, लोककल्याणाची शासनव्यवस्था निर्माण करण्याचे स्वप्न स्वराज्याच्या निर्मितीमागे होते. स्वराज्यातील विचारमूल्ये पुढीलप्रमाणे:

१. सर्वसामान्यांचे सर्वसमावेशक स्वराज्य असावे.

२. सर्वसामान्यांना आपल्या शारीरिक, बौद्धिक क्षमता सिद्ध करता येतील आणि त्या क्षमतांचा सन्मान व्हावा.

३. सततची राजकीय अस्थिरता नाहीशी करणे, स्थिर शासनव्यवस्था निर्माण करणे.

४. उत्पादित मालावर व साधनांवर जनतेचा अधिकार अबाधित असावा.

५. मानवी जीवनाचा व मानवी मूल्यांचा मानसन्मान व्हावा.

वरील सर्व बाबी स्वराज्याच्या निर्मितीमागे होत्या. यासाठी सातत्याने शिवाजी महाराज आणि त्यांच्या कुटुंबाने सातत्याने प्रयत्न केलेले आहेत.

स्वराज्याच्या शासनव्यवस्थेचा आणि उद्दिष्टांचा विचार करता शिवाजीने निर्माण केलेली शासन व्यवस्था संभाजीराजांनी जशीच्या तशी पुढे चालविली, इतकेच नाही तर स्वतःच्या प्रतिभेने नवीन मूल्ये त्यात समाविष्ठ केली ती जनसामान्यांच्या हिताच्या दृष्टीने अधिक उपयोगी होती. याबाबीचा अधिक विचार संभाजीराजांची न्यायव्यवस्था या स्वतंत्र प्रकरणात करणार आहे. यामुळे या ठिकाणी फक्त सूचित करतो आहे.

स्वराज्यनिर्मितीमागे सरदारांना एकत्रित आणून सर्वसामान्यांचे न्याय हक्कांवर आधारित स्वराज्य निर्माण करण्याचा हेतू असल्याची भूमिका कमल गोखले यांनी 'शिवपुत्र संभाजी' या ग्रंथात नोंदविताना म्हणतात, "अनेक मानापमान सहन करीत शहाजीसारखे अनेक मराठे सरदार परकियांच्या नोकऱ्यांत कर्तृत्व गाजवीत होते. स्वदेशावर परकियांची सत्ता बळकट करण्यातच त्यांचे शौर्य आणि कर्तृत्व खर्च होत होते. या सर्व सामर्थ्यवान व पराक्रमी मंडळींची शक्ती स्वराज्य, स्वधर्म आणि स्वजनांसाठी कोणीतरी वळविणे आवश्यक होते. कोणतीतरी ठिणगी पेटवून प्रेरणा देण्याची आवश्यकता होती. दक्षिणेतील शाह्यांत लढणाऱ्या या मराठेवीरांनी पार्श्वभूमी तयार केली होती. याच वीरांच्या साहाय्याने मराठ्यांना स्वातंत्र्य आणि स्वतंत्र अस्तित्व मिळवून देण्याचा महत्वाकांक्षी उद्योग शिवाजी महाराजांनी आपल्या अंगावर घेतला. "[४] कमल गोखले यांचे मत स्वराज्य निर्मितीमागील तत्कालीन राजकीय उद्देश स्पष्ट करणारे आहे. स्वराज्याबरोबर स्वजनांचे राज्य निर्माण करून महाराष्ट्रातील जनतेला स्थिर शासन देण्याचा हेतू स्वराज्यामागे असल्याचे स्पष्ट होते.

## २.६ स्वराज्यनिर्मिती आणि संभाजीराजे

स्वराज्य ही लोककल्याणकारी राज्यव्यवस्था होती. ही व्यवस्था सातत्याने वृध्दिंगत झाली पाहिजे. यासाठी शिवाजी महाराजांपासून खूप प्रयत्न चालविलेले होते. संभाजीराजांना स्वराज्य निर्मितीच्या कार्याचे धडे प्रत्यक्षपणे संभाजीराजांना लहानपणापासूनच देण्यात आलेले होते. वयाच्या नवव्या वर्षी संभाजीराजांच्या नावे मुघलाची मनसब शिवाजी महाराजांनी घेतली. यामागील राजकीय हेतू स्पष्ट आहे. आपण मुघलाचे मांडलिक झालो; तर स्वराज्याच्या कार्याला अडथळे निर्माण होतील हे शिवाजी महाराजांनी ओळखले होते. यामुळे संभाजीराजांच्या नावे मनसब घेतली. या मनसबीचा फायदा प्रत्यक्षपणे स्वराज्यावरील शत्रुच्या संकटांना रोखण्यासाठी झाला. ज्या-ज्या वेळी संभाजीराजांना मुघलाची मनसब घेण्यात आली त्या-त्या वेळी मुघलांनी मराठा प्रदेशावर स्वाऱ्या केल्या नाहीत यामुळे स्वराज्याच्या उभारणीस मदत झाली. प्रत्यक्ष-अप्रत्यक्षपणे संभाजीराजांनी स्वतःचा जीव धोक्यात घालून स्वराज्यासाठी लहानपणापासून प्रयत्न केलेले आहेत.

## २.७ संभाजीराजे आणि दिवाणी कामकाज

संभाजीराजांच्या स्वराज्य कारभारातील व्याप पाहता त्यांना दिवाणी कामकाजाचा अनुभव होता असे दिसते. या कामातील एक नोंद 'शिवकालीन पत्रसारसंग्रह' मध्ये उपलब्ध असून ती पुढीलप्रमाणे आहे, "कमर्यात मावळ येथील कुलकर्णी जानकी कोम रंगभट बिन बाळंभट ठक्कार हीची मिरासी होती. शंकराजीभोवर मुतालिकिस ठेवला होता. हा कागद संभाजीराजांनी करून दिला होता. तरी यादव नार्मदऊ यांनी संभाजीचा कागद शंकराजी भोवर याचे कुलकर्णी म्हणून नेला. म्हणून शिवाजी महाराजांनी कार्यात मावळचा सुभेदार आणि हवालदार यांना लिहून तो कागद रोखुन धरण्याविषयी आणि शंकराजी मुतालिकच असल्याचे दि. १२.१०.१६७४ रोजी लिहिले. "[५] या नोंदीवरून संभाजीराजांचा स्वराज्याच्या कामकाजात सर्वत्र वावर असताना दिसतोच, सर्वक्षेत्रात बारकाईने त्यांचे लक्ष असल्याचा स्पष्ट पुरावाच म्हणावा लागेल.

## २.८ दरबारातील तंट्याचे निकाल आणि संभाजीराजे

शिवाजी महाराजांच्या दरबारामध्ये संभाजीराजे उपस्थित असत. ते न्याय निवाडा पाहता यातून त्याचे स्वराज्याच्या कामातील योगदान आपणास स्पष्टपणे जाणवते. याबाबतची नोंद 'मराठा इतिहासाची साधने' यामध्ये आलेली नोंद महत्त्वपूर्ण आहे. ती नोंद पुढील प्रमाणे, "महाराजांच्या कारकिर्दीत संभाजीच्या पुढे काही तंट्याचे निकाल होत असत. १६७५ मध्ये गोपालसेठ यांच्या सेठेपणासंबंधी तंटा निर्माण झाला होता. दि. १३.०३.१६६७ ला या तंट्याचा निकाल लागला. या महजरात संभाजी होता. गोपाळसेठ बाजूने निकाल लागून त्याचे सेठेपण खरे ठरले. त्याबद्दल संभाजीला भेट म्हणून २ होन आणि सरकारी संरणी म्हणून त्याने १५० होन द्यावे असे ठरले. "[६] यावरून संभाजीराजांचा दरबारातील वावर आणि उपस्थिती दिसून येते. न्यायदानाच्या कार्यातील त्यांचे योगदानही स्पष्ट होत आहे. स्वराज्याच्या राज्यकारभाराला अधिक कार्यक्षम, पारदर्शी करण्यासाठी शिवाजी महाराजांच्या बरोबर संभाजीराजे सहभागी होताना दिसतात. यातून त्यांचे स्वराज्याबाबतचे योगदान स्पष्ट होते.

## २.९ सॅम्युअल ऑस्टिन तंटा आणि संभाजीराजांची उपस्थिती

संभाजीराजे रायगडावर असतील तेव्हा दरबारातील कामकाजासाठी उपस्थित असत. याबाबतची नोंद 'इंग्रजबातमी' नोंदविली असून ती नोंद पुढील प्रमाणे, "६-९-१६७५ रोजी सॅम्युअल ऑस्टिन हा रायगडला राजापूरच्या वखरीच्या लुटीच्या भरपाईची मागणी करण्यासाठी आला होता. दि. ९.७.१६७५ रोजी यांनी महाराजांची भेट घेतली. या शिष्टाईच्या वेळी संभाजी शिवाजीराजांच्या बाजूला बसला होता आणि इतर अधिकारी उभे होते. "[७] यावरून संभाजीराजे स्वराज्याचा राज्यकारभार पूर्वीपासून अगदी लहान वयापासून समजून घेत होते. अशा वातावरणात निर्माण झालेले संभाजीराजांचे व्यक्तिमत्व स्वराज्याच्या दृष्टीने अधिक कार्यक्षम असणार हे स्पष्टच आहे.

## २.१० शिवाजी महाराजांच्या कारकीर्दीतील संभाजीराजांची दोन पत्रे

संभाजीराजाचे स्वराज्यातील योगदान हे खूप मोठे आहे. त्यांनी शिवाजी महाराजांच्या मृत्यूपूर्वी अगदी लहान वयापासून स्वराज्याच्या कारभारात लक्ष घातले होते. याबाबतची महत्वपूर्ण दोन पत्रे उपलब्ध असून या पत्राचा आशय पाहता संभाजीराजांचा स्वराज्याच्या कारभारातील अनुभव व योगदान याचा स्पष्ट परिचय होतो. संभाजीराजांचे हे दोन महत्वपूर्ण पैलू समजून घेण्याच्या दृष्टीने ही पत्रे महत्वाची आहेत. ती पत्रे अनुक्रमे पुढील प्रमाणे, "ता. ४-५-१६७५ रोजी संभाजीने पुण्याच्या राघो भास्कर हवालदाराला लिहिले की, निलोजी निळकंठ राऊ, यांकराजी निळकंठराऊ व विसाजी निळकंठराऊ व त्रिंबक निळकंठराऊ यांसी मौजे चांबिली तर्फे कऱ्हेपठार परगणे मजकुर येथे इनाम कास टका एक आहे. त्यावरी तुम्ही मिटासपटी २५ होनू घालुनु पैका मागता म्हणऊन कलो आले. तरी वागधे मजकुरावरी मिरासपटी घातली नसतां उगेच आपले भातेने पैका मागता हे कोण खेश या उपरी त्यास येऊ रूकेयाची तसवा न देणे त || त्याचे इनमास पेशजी रूळा घेतला लागली नाही पेस्तरहि तुम्ही मिरासपटी व हरएक बाबे तसवा न देणे. "[८] सदरचे पत्र जुन्नर परगाण्याचे असून तत्सपत्रातील भाषा न्यायप्रिय आणि समज देणारी आहे. यावरून संभाजीराजांचा स्वराज्यातील अनुभव ज्ञान-संपन्न व नीतीतत्वावर आधारित आहे. यातून स्वराज्याप्रती योगदानही स्पष्ट होते.

संभाजीराजांचे पुणे येथील पत्रसुध्दा त्यांच्या राज्यकारभाराच्या अनुभवाची व योगदानांची साथ देणारे आहे. ते पत्र पुढील प्रमाणे, "पुणा येथे कास टका इनाम एन्ड आहे त्यासी मिटासपटी देणे म्हणून राघो भास्कर होनु २५ लाविले आहेत. म्हणुन कलो आले तरी ज्या माहालास मिरासोपटी घातली आहे तेथे इनामदारास हिसाबीने द्यावे यैसा तह केला आहे. त्यास जे माहाली मिरासपटीच घातली नाही तेथे इनामदारास पैके मागणे कोण गोष्टी त्याहीमध्ये नीलकंठराऊ यास पटी मागणे हें उगिच नाही. तरी तुम्ही राघोभास्कारास एन्ड कागद लेहून देणे आणि त्यांचे वाटे नवजासे यैसी गोष्टी करणे. मशारनिल्हे निलकंठ राऊ

याचे इनामास पेशजीही तसवीस लागली नाही आणि हाली राघो भास्कर पटी मागतो याबद्दल तुम्ही त्यास बहुत वजाने लेहून यशारानिल्हे निलकंठरायाचे वाटे नव जाती त्यांचा बोभाटा हुजुर नये यैसी गोष्टी करणे. "[९]

संभाजीराजांचा न्यायनिवाडा पाहता त्यांच्यातील न्यायनिष्ठता स्पष्ट होते. त्यांनी शिवाजी महाराजांच्या काळापासूनच राज्यकारभारात लक्ष घालण्यास सुरूवात केल्याचेही स्पष्ट होते. यातून स्वराज्य निर्मितीतील त्यांचे योगदान बालपणापासून प्रारंभित झाल्याचे स्पष्ट होते. या गोष्टीचा विचार करता संभाजीराजांचे अनुभवविश्व राजकीयदृष्ट्या समृद्ध झ ाले असणार ही गोष्ट सिध्द होते.

## २.११ स्वराज्यरक्षण आणि संभाजीराजांच्या युद्ध आघाड्या

शिवाजी महाराजांच्या नेतृत्वाखाली आणि मार्गदर्शनाने संभाजीराजे स्वतः युद्ध आघाडीवर गेले होते. यातून संभाजीराजांचे स्वराज्यनिर्मितीतील योगदानही स्पष्ट होते. स्वराज्याचा आर्थिक पाया भक्कम करण्याच्या दृष्टीने संभाजीराजांनी काही प्रयत्न केलेला आहे. १६७५ मध्ये शिवाजी महाराजांनी संभाजीराजांना युद्धाच्या आघाडीवर घालविलेले दिसते. आदिलशाहीच्या मुलखावर करण्यात आलेल्या स्वारीमध्ये संभाजीराजांचा प्रत्यक्ष सहभाग असल्याची नोंद पेशाने डॉक्टर असलेल्या 'जॉन फ्रायरने' केलेली आहे. ती नोंद पुढीलप्रमाणे, "मध्यंतरीच्या काळात आदिलशाहीतील सरदारांच्या बेबनावाचा फायदा घेऊन मन मानेल तिकडे शिवाजी राजाने सैन्य दौड करीत आहे. त्याच्या सैन्यातील संभाजीच्या नेतृत्वाखालील तुकडी भेट गोवळकोंडा राज्यातल्या भागानगरपर्यंत गेली. आणि दुसरी तुकडी गोव्याजवळीच्या फोड्यांवर चालून गेली. शिवाजी राजांच्या मुलाने भागानगरमधील काही भाग लुटला व शहरात जाळपोळ केली. तोच बहलोलखान आडवा आल्यामुळे त्याला चुकवित दुसऱ्याच रस्त्याने परत फिरला. वाटेत संभाजीने हुबळी, रायबाग आणि इतर बाजारपेठांवर छापे घालून त्या लुटल्या. "[१०] या आघाडीवरून संभाजीराजांनी स्वराज्यासाठी

अमाप संपत्ती आणली. स्वराज्याचा खजिना समृद्ध करण्याच्या दृष्टीने ही मोहिम महत्वाची ठरली. त्याचबरोबर दक्षिणेत स्वराज्याचा दरारा वाढला. यातून संभाजीराजे यांची स्वराज्याविषयीची तळमळ, स्वराज्य वृद्धीसाठीचे प्रयत्न स्पष्ट होतात.

## २.१२ स्वराज्याच्या कामात शिवाजीला संभाजीची मदत

कमल गोखले शिवकालीन पत्रासार संग्रहाचा आधार देऊन संभाजीराजांची स्वराज्याला झालेली मदत स्पष्ट करताना म्हणतात, "शिवाजी महाराजांनी १६७५ च्या एप्रिल महिन्यात फोड्यांचा वेढा चालु केला. त्याच वेळी त्यांनी आदिलशाही हद्दीतील यादगीर व गोवळ कोंड्याच्या दृष्टीतील भागानगर जवळची दोन मोठी शहरे लुटली आणि तेथून पुष्कळ संपत्ती आणि सावकार फोंड्याला शिवाजीपाशी नेले. "[११] या सैन्याचे नेतृत्वही संभाजीनेच केलेले दिसते. इंग्रज वखारवाल्यांनी संभाजीच्या नावाचा उल्लेख केलेला नसला तरी फ्रायरने तो केलेला आहे. याच वेळी १६७५ च्या एप्रिल महिन्यात बहलोतखान या भागातून आला तो शिवाजीने त्याला लाच दिल्यामुळे मिरजेत धडकला होता."[१२] फोंड्यांच्या वेढ्यात महाराजांना मदत करण्यासाठी संभाजी तेथे गेला असावा. फोंडा घेतल्यानंतर त्यांच्या आसपासच्या गावासंबंधी वाद निर्माण झाल्यामुळे संभाजी आणि गोवेकर पोर्तुगीज यांच्यात लढाई झाली. यात संभाजीला माघार घ्यावी लागली होती. "[१३]

अस्सल पत्रांच्या आधारे संभाजी महाराजांचे स्वराज्याप्रती योगदान महत्वपूर्ण, स्वराज्य निर्मितीच्या दृष्टीने मौलिक आहे. याचा स्पष्ट निर्देश होताना दिसतो. कमल गोखले यांची ऐतिहासिक साधनांची चिकित्सा व उपयोग करण्याची हातोटी वाखाणण्यासारखी आहे. त्याचबरोबर पुराव्याच्या छाननीची पद्धतही शास्त्रशुद्ध आहे. यामुळे पुराव्यांच्या अस्सलतेचा प्रत्यय त्यांच्या लेखनात दिसतो.

## २.१३ स्वराज्य आणि इंग्रज वाटाघाटीची यशस्वी मध्यस्थी

स्वराज्याच्या योगदानाबाबत संभाजीराजांचे कार्य व्यापक स्वरूपाचे आहे. स्वराज्यातील अडचणी दूर करण्यासाठी अत्यंत कष्टप्रद स्वरूपाचे कार्य त्यांच्या हातून घडल्याचे ज्ञान इतिहासाचा अभ्यास करता स्पष्ट होते. त्यांची कार्यपद्धती आधुनिक स्वरूपाची असून स्वराज्याच्या हिताचाही आणि शत्रूच्या समाधानाचा एकाच वेळी ते विचार करत असत. शिवाजी महाराजांना सुद्धा एखाद दुसरे प्रसंग बरेच दिवस वाटाघाटी करून सुटलेले नाहीत असे प्रसंग संभाजीराजांनी अत्यंत खुबीने, बुद्धीचातुर्याने सोडविलेले आहेत. याबाबतचा इ.स. १६७७ चा इंग्रज आणि शिवाजी महाराज यांच्यातील वाटाघाटीचा प्रसंगी 'शिवकालीन पत्रासारसंग्रह' मधील नोंद पाहिल्यास अधिक स्पष्ट होईल. ती नोंद पुढील प्रमाणे, " इ.स. १६७७ च्या सुरूवातीला इंग्रजांनी राजापुरची वखार बंद करून तेथील लोकांना सुरतकरांनी परत बोलाविले होते. हे कळताच शिवाजीने इंग्रजांच्या तक्रारी मिटविण्याकरिता आणि त्यांनी राजापूर सोडु नये म्हणून संभाजीला इंग्रजांकडे पाठविले होते आणि यापुढे सर्व काही न्यायाने आणि नियमितपणे देण्याचे आश्वासन दिले होते. "[१४]

संभाजीराजांच्या कार्यप्रणालीचा विचार करता स्वराज्यासाठी अत्यंत असाधारण कार्यकर्तृत्व त्यांनी निर्माण केलेले आपणास जाणवते. राजकीय पेच प्रसंग ओळखण्याची त्यांची आकलन क्षमता थक्क करणारी होती. त्याचबरोबर वाटाघाटीमध्ये प्रतिपक्षाच्या अपेक्षा आणि डावपेच याबाबींचे तार्किक ज्ञान संभाजीराजांना प्रदीर्घ अशा राजकीय अनुभवांनी प्राप्त झाले असल्याचे दिसून येते. त्यांच्या राजकीय कामगिरीचा स्वराज्याच्या वृध्दिसाठी अधिक उपयोग झालेला आहे. राजकीय क्षेत्रातील सर्व विभागाचे अचूक ज्ञान वा शिष्टाचार त्यांना ज्ञात होता. महाराजांच्या अनुपस्थितीत राज्यकारभाराचे अथवा पेचप्रसंग सोडविणे, परराज्यातील मंत्र्यांचे म्हणणे समजून घेणे. याबाबत संभाजीराजांच्या राजकीय कार्यप्रणालीवर शिवाजी महाराजांचा अपार विश्वास असल्याचे स्पष्टपणे जाणवते.

## २.१४ संभाजीराजेंबाबतचे इंग्रजांचे गौरवपूर्ण उद्गार

संभाजीराजे यांच्या बाबत स्वलेखकाने वा दरबारी लेखकाने काढलेले उद्गार, यापेक्षा परकीय सत्तेने काढलेले उद्गार संभाजीराजांना समजून घेण्याच्या दृष्टीने अधिक महत्वाचे आहे. स्वराज्याचे शत्रू असणारे इंग्रज वखारवाले संभाजीराजे स्वराज्याचे अधिकृत राजे नसतात. शिवाजी महाराजांच्या हाताखाली कामगिरी करत असताना काढलेले उद्गार गौरवपूर्ण आहेत. संभाजीराजांच्या राजकीय वाटचालीचा अत्यंत महत्वपूर्ण निर्देश असल्याचे स्पष्ट होते.

संभाजीराजांच्या कोणत्या ना कोणत्या कारणाने इंग्रजांशी राजकीय संबंध आलेला होता. त्यांच्याशी वाटाघाटीत्मक कार्य करण्याची संधी त्यांना प्राप्त झाली होती. सुरतेतील इंग्रजांचे त्यांच्याविषयी अधिक अनुकूल मत झालेले होते. दि. १.१.१६७७ च्या पत्रात सुरतकर इंग्रज मुंबईकरांना लिहितांना जे गौरवपूर्ण उद्गार काढलेले आहेत ते ऐतिहासिक दृष्ट्या संभाजीराजांच्या स्वराज्य योगदानावर अधिक प्रकाश टाकतात. ते उद्गार पुढील प्रमाणे, "शिवाजीच्या फर्मानाची मात्र तितकी खात्री वाटत नाही हे आमच्या ध्यानात आहे. परंतू त्याची भरभराट होऊन त्यांचे राज्य वाढत आहे. त्यामुळे आपल्याच राज्यात तो आमची लूट करील अशी शंका घेववत नाही. त्यांच्या मरणानंतर काळजी करण्याचे कारण दिसत नाही. कारण त्याच्या मुलाला मुकूट (अधिकार) प्राप्त झाला असून तो बराच समंजस दिसतो. (his son is already crowned and of sufficient understanding he appears.) "[१५]

१६७१-१६७७ पर्यंत अथवा कित्येक वर्ष इंग्रजांच्या राज्यकारभार अथवा कामकाजात संभाजीराजांनी हस्तक्षेप केलेला नाही. इंग्रजांना संभाजीराजांबाबत वाटणारा विश्वास सार्थ होता. त्याचे राजकारणातील नैतिक वर्तन पाहता शत्रुलाही विश्वासाचा दिलासा वाटणारा स्वराज्य रक्षक, स्वराज्यहितचिंतक या दृष्टीने संभाजीराजाचे कार्य कौतुकास्पद आहे. यातूनच त्यांचे स्वराज्यविषयी योगदान स्पष्ट होते. स्वराज्याच्या विस्ताराबरोबर, स्वराज्याच्या तत्वनिष्ठ आचारांना त्यांनी अधिक महत्व दिले.

## २.१५ स्वराज्य भक्कम संभाजीराजांचे प्रयत्न

स्वराज्याचा पाया वैचारिक मूल्यांवर उभा राहिला होता. या व्यवस्थेला मानवतेचे, समतेचे आणि जनकल्याणाचे अधिष्ठान प्राप्त झालेले असल्यामुळे सत्तेचे विकेंद्रीकरण, समाजकल्याणात्मक राज्यव्यवस्था या मूल्यांना आपोआप महत्व प्राप्त झालेले होते. स्वराज्यातील कोणत्याही गोष्टी कोणत्याही एका व्यक्तिच्या मालकीची अथवा खाजगी नव्हती. त्यावर जनतेचा आणि स्वराज्य प्रशासनाचा पूर्णतः अधिकार असे. यामुळे प्रगत लोकसत्ता म्हणून स्वराज्याकडे पाहिले जात होते. त्यामुळे सामान्य जनतेला स्वराज्य व स्वराज्याचे रक्षक आपले वाटत. त्यांच्या संरक्षणाची जबाबदारी सर्वजण घेतांना दिसतात. स्वराज्याने लोकांना आपले मानले व लोकांनी स्वराज्याला आपले मानले. स्वराज्याचे सर्वेसर्वा प्रशासक म्हणून शिवाजी महाराजांना खूप मानसन्मान प्राप्त झाला होता. जनता त्यांच्याबाबत नम्रतेने लीन होत असे. या स्वरूपाचा मानसन्मान संभाजीराजांना प्राप्त झालेला होता. अर्थात हा मानसन्मान त्यांनी शिवाजी महाराजांचे पुत्र म्हणून प्राप्त झालेला नसून त्यांच्या स्वकर्तृत्वाने त्यांनी तो प्राप्त केला होता. याही बाबींचे ज्ञान संभाजीराजांच्या स्वराज्य उभारणीतील योगदानाचा विचार करताना असणे गरजेचे आहे.

शिवाजी महाराजांचा वारसा व संस्कार भक्कम होते. याबाबींचाही आवर्जुन उल्लेख होणे महत्वाचे असताना संभाजीराजांच्या अंगभूत क्षमताही कमालीच्या प्रगल्भ होत्या. याचेही भान सूचित व्हावे यादृष्टीने प्राप्त झालेल्या वारशाला स्वकष्टाने यशामध्ये परिवर्तीत करण्याचे कौशल्य आणि सामर्थ्य संभाजीराजांकडे होते. या दृष्टीने त्यांच्याकडे पाहणे महत्वाचे असल्यामुळे प्रस्तूत बाबींचा निर्देश केलेला आहे. संभाजीराजांच्या कार्यकर्तृत्वाचा विचार करता त्यांनी आपल्या सामर्थ्याने स्वराज्याचा पाया आर्थिक, सामाजिक, राजकीय. तत्वज्ञानात्मक भक्कम केलेला आहे. अष्टप्रधान मंडळावर आपली करडी नजर ठेवलेली आहे. ज्याचे काम भ्रष्ट आहे त्यांना समज दिली. ज्यांनी स्वतःत बदल केले त्यांचे कौतुक केले. ज्यांनी आपला अहंकार जपला त्यांना बडतर्फ केले.

स्वराज्यांच्या कामात संभाजीराजांनी कोणत्याही प्रकारचा हलगर्जीपणा केला नाही वा करणारांची गय केली नाही. याचमुळे स्वराज्य पुढील काळात संभाजीराजांच्या निधनानंतर ही सामर्थ्यशाली राहिले. त्याचे मुख्य कारण संभाजीराजांच्या प्रशासन व्यवस्थेमध्ये वा त्यांनी स्वराज्य भक्कम करण्यासाठी योजलेल्या उपाय-योजनेत आहे, असे दिसते.

### २.१६ स्वराज्याची तत्त्वज्ञानात्मक विचारप्रणाली

कोणत्याही सामाजिक संस्थेचा पाया तत्त्वज्ञानात्मक प्रणालीवर उभा राहिलेला असतो. या तत्त्वज्ञानापासून राजकीय व्यवस्था अलिप्त नसते. प्रामुख्याने भारतीय समाजरचनेचा पाया धर्मरूप तत्त्वज्ञानावर मध्ययुगीन कालखंडामध्ये आधारित असताना दिसतो. या धर्मतत्त्वज्ञानाचा प्रभाव यादवांच्या राजवटीच्या अस्ताचे, एक कारण असून, त्यादृष्टीने इतिहासात खुप उहापोह झाला आहे. संभाजीराजांच्या काळात असणाऱ्या मुघलसत्तेचा तत्त्वज्ञानात्मक पाया साम्राज्यवादी होता.

स्वराज्यामध्ये साम्राज्यविस्तारापेक्षा समाजविकासाचे वा समाजरक्षणाचे तत्त्व अधिक महत्वाचे मानले. स्वराज्याच्या तत्त्वज्ञानाचा दार्शनिकविचार हा प्राचीन भारताच्या सांस्कृतिक जीवनामध्ये असून, तो कृषीश्रमसंस्कृतीच्या विचारमूल्यात आहे. 'आदि शिव' या दैवताच्या तत्वज्ञानात आहे. या दृष्टीने स्वराज्यातील योद्ध्याला प्रिय असणारी देवता 'हर हर महादेव' असे स्मरण विचारार्थ आहे. लोककल्याणाच्या अंगाने स्वराज्यात येणारी 'बहुजन हिताय' ही संकल्पना अधिक महत्वाची आहे. वैदिक तत्त्वज्ञानाशी स्वराज्याचा संबंध लावण्याचा अनेक अभ्यासक प्रयत्न करतात. पण तो ऐतिहासिक नसून कृत्रिम होताना दिसतो. यज्ञसंस्कृती वा वेदसंस्कृतीचा शिवाजी महाराजांपासून स्वराज्यात कोणीही विचार केलेला नाही. ही बाब नजरेआड करून चालणार नाही. शिवाजी महाराज-संभाजीराजे प्रयत्नवादी 'कार्यकारणभाववाद' या तत्त्वज्ञानावर अधिक श्रद्धेने विश्वास ठेवीत होते. संभाजीराजांनी समाजहितासाठी स्वीकारलेल्या 'कृषी-श्रम' संस्कृतिच्या तत्वज्ञानांची बैठक अधिक अधिक घट्ट केली. या जीवनमूल्यांसाठी आयुष्यभर संघर्ष करत राहिले.

त्यांच्या प्रयत्नामुळे वा कार्यकर्तृत्वामुळे स्वराज्याची तत्वज्ञानात्मक बैठक अधिक भक्कम झाली. येवढे मात्र निश्चितपणे म्हणता येईल.

## २.१७ उदारमतवाद आणि संभाजीराजांचे राजकीय धोरण

संभाजीराजांचे व्यक्तिमत्व सर्वसमावेशक आणि लोककल्याणकारी स्वरूपाचे होते. त्यांच्या व्यक्तिमत्वात लोकहितांच्या जाणिवा अधिक होत्या. त्यांनी त्यांच्या राजकीय जीवनप्रवासात सामान्यांच्या अडचणी अधिक आस्थेने समजून घेतल्या आणि त्या सोडविण्यासाठी काही वेळा नियमांनाही बदल दिली. या बाबींचा कांगावा मंत्र्यांनी वारंवार केला. काही काळानंतर राजाराम महाराजांची पत्नी जानकीबाई ही वारली. तेव्हा संभाजी महाराजांनी राजारामाची आणखी दोन लग्ने लावून दिली. पहिली हंबीरराव मोहिते यांची कन्या अंबिकाबाईंच्या दुसऱ्या लग्नाचा उल्लेख आला नाही अशी तीन लग्ने संभाजी महाराजांनी साजरी केली. "[१६]

संभाजीराजांना स्वराज्याचे राजपद प्राप्त झाल्यानंतर काही दिवसातच त्यांनी राजारामाचे लग्न करून दिले. या गोष्टीचा विचार गृहकलहाच्या पार्श्वभूमीवर केल्यास त्यांच्या स्वकुटुंबावर असणारे लक्ष वा प्रेम स्पष्ट होण्यास मदत होईल. संभाजीराजांनी कोणत्याही स्थितीत आपल्या कुटुंबाची जबाबदारी अन काळजी दुर्लक्षित केलेली नाही. याबाबतचा महत्वपूर्ण उल्लेख परमानंदस्वामी यांच्या काव्याचा आधार घेऊन 'शिवकालीन पत्रसारसंग्रहात' नोंदविलेला आहे तो पुढील प्रमाणे, "संभाजीराजांनी रायगडला गेल्यावर राजारामाला वस्त्रभूषणे देऊन त्यांचा सत्कार केल्याचे सोयराबाई, पुतळाबाई या मातांशी गोड बोलून त्यांनी ममतेने वागविल्याचे परमानंदने काव्यात म्हटले आहे. राजारामाला नजर कैदेत ठेवले असले तरी संभाजी महाराजांनी त्याला दयेने वागविले होते. त्याच प्रमाणे त्याला थोड्याशा जमीनीचा कारभार मिळाला असून तो तेवढ्यावर संतुष्ट आहे."[१७]

संभाजीराजांनी शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर सुत्रे हातात घेतली. त्यानंतर आपल्या मातांचे सांत्वन केले. त्यांना विश्वासाची वागणूक दिली. याबाबतचे उल्लेख ऐतिहासिक दृष्ट्या सत्य वाटतात. १० वर्षाच्या राजारामाला नजर कैदेत ठेवलं हा उल्लेख

सत्य वाटण्यासारखा वाटत नाही. संभाजीराजे ज्या ममतेच्या भावनेने कुटुंबाशी वागतात त्यावरून पाहता त्यांनी आपल्या लहान भावाला नजर कैदेत ठेवले, असे म्हणणे संभाजीराजांच्या व्यक्तिमत्वाला आरोपित केल्यासारखे होईल. आईच्या राज्य मागण्याच्या गुन्ह्याची शिक्षा तिच्या पुत्रास दिली, असे म्हटले तर संभाजीराजांना असहिष्णू म्हणण्यासारखे होईल. त्यांचे विचार पाहता आणि नंतरची राजकीय स्थिती पाहता हे सत्य नाही. वरील सर्व विवेचनावरून हेच स्पष्ट होते. संभाजी महाराज कुटुंबप्रिय राजपुत्र होते. संभाजीराजांच्या व्यक्तिमत्वाचा वा राजकीय व्यक्तिमत्वाचा महत्त्वाचा पैलू म्हणजे त्यांचे सहिष्णू उदारमतवादी धोरण सर्वांना आपलेसे समजणारे त्यांचे व्यक्तिमत्व होते. सर्वांच्या हिताचा व्यापक विचार त्यांनी स्वराज्याच्या राज्यकारभारातून रूजविला आणि आपल्या जनतेचे वा आपल्या माणसांचे हित पाहिले. या मुळेच त्यांना लोककल्याणकारी युवराज म्हणून संबोधले जाते. यामुळे स्वराज्याबाबत जनसामान्यांच्या मनात आशा वा प्रेम उत्पन्न झाले. स्वराज्याप्रती त्यांच्या मनात उदारभाव होता. तसाच उदारभाव स्वराज्यातील जनतेबाबत त्यांच्या मनात होता.

## २.१८ स्वराज्य आणि कुटुंबाकडे विशेष लक्ष

संभाजीराजे यांना मागील वडिल-आजी यांच्या पिढीचा संबंध आणि संस्कार होते. राजपुत्र म्हणून त्यांना विशेष वागणूक न देता सर्वसामान्यांचा राजा म्हणून त्यांच्या व्यक्तिमत्त्वाची जडण-घडण करण्यात आलेली होती. ते वडिलधाऱ्या मंडळींशी आपुलकीने वागत. नम्रतेचे संस्कार त्यांच्यावर जिजाऊ-शिवाजी महाराज यांनी केले होते.

संभाजीराजांनी शिवाजी महाराजांच्या काळातही सर्व कुटुंबियांची मने सांभाळली. त्याचबरोबर स्वराज्याचे राजपद प्राप्त झाल्यानंतरही त्यांनी सर्वांची मने सांभाळली. सर्वांशी आपुलकीने वागले. सर्वांना बरोबर घेऊन राज्यकारभार केला. राजारामांचे राजपुत्राप्रमाणे पालन-पोषण, शिक्षण आणि संस्कार यामध्ये संभाजीराजांचा खूप मोठा वाटा आहे.

याबाबतचे उल्लेख 'श्री छत्रपती संभाजी महाराज' या ग्रंथात वा.सी.बेंद्रे करतात तो उल्लेख पुढील प्रमाणे, "राजाराम महाराजांचे पहिले लग्न १५ मार्च १६८० रोजी प्रतापराव गुजर यांच्या कन्येशी झाले. त्यानंतर शिवाजी महाराज थोड्याच दिवसात वारले.

संभाजीराजांची कौटुंबिक जाणीव जिव्हाळ्यावर, कर्तव्यावर आधारीत होती. त्यांची कौटुंबिक जाणीव व्यापक नातेसंबंधावर आधारलेली होती. त्यांनी कुटुंबातील कोणाचेही मन दुखावले नाही. त्यांनी सर्वतोपरी कुटुंबाची काळजी घेतल्याचे स्पष्ट होते. कौटुंबिक जबाबदारी ही राजपुत्राची प्रजेइतकी जबाबदारीची महत्वपूर्ण बाब असते. राजा हितदक्ष तसाच तो कुटुंबदक्ष सुद्धा असावा लागतो. अन्यथा त्याला कुटुंब अहितदक्षतेचा आरोप लागतो. संभाजीराजांचा एकूण विचार करता त्यांना असा आरोप लावण्यास जागा नाही. एकार्थाने प्रजेच्या हिताचा विचार करणे स्वराज्याच्या वाढीसाठी गरजेचे आहे. तितकाच स्वसंसाराचा विचार करणे गरजेचे आहे. यातून स्वराज्याबाबतचे योगदान आणि कुटुंबाबतची जबाबदारी ही व्यापक अर्थाने स्वराज्याच्या जबाबदारीची कर्मे आहेत.

### २.१९ शिवाजीराजांचा मृत्यु आणि संभाजीराजांचा उदय संक्रमण

स्वराज्याचे स्थित्यंतरे समजून घेण्यासाठी राज्याभिषेकापूर्वीचे स्वराज्य आणि राज्याभिषेकानंतरचे स्वराज्य अशी एक कल्पना करावी लागेल. राज्याभिषेकापूर्वी स्वराज्यातील मावळे, सरदार आणि अष्टप्रधान मंडळ एकसंघपणे राज्यकारभार करत होते. कोणत्याही स्वरूपात स्वराज्यामध्ये चढ-उतार जाणवत नाही. स्वराज्याच्या राज्याभिषेकानंतर परिस्थिती बदललेली आहे. मंत्री आणि संभाजीराजे, कायदामंत्री गट व प्रभुमंत्रीगट यांचा एकमेकात अंतर्गत संघर्ष निर्माण झालेला होता. स्वराज्यामध्ये आणि परप्रांतात अफवांना खुपच पेव सुटले होते. राणी सोयराबाई आणि मंत्र्यांना हाताशी धरून काही कारवाया करण्यास सुरूवात केली होती. या पार्श्वभूमीवर संभाजीराजांचे मुघलांच्या छावणीत जाणे, या गोष्टीने स्वराज्याचे राजकीय वातावरण अधिक गढूळ झाले होते.

इ.स. १६७७ नंतर स्वराज्याची घडी अंतर्गत कलहाने क्षीण झालेली होती. यातच महाराजांचे आजारपण आणि दक्षिणेतील त्यांच्या स्वाऱ्या यामुळे रायगडावर मंत्र्यांचा बेबनाव राज्यकारभार स्वराज्याचा उत्तराधिकारी पन्हाळ्यावर होते. महाराजांच्या मृत्यूची बातमी शत्रूपासून गुप्त ठेवण्यात आलेली होती. या स्थितीत स्वराज्य सापडलेले असताना स्वराज्याच्या राज्यकारभाराची सुत्रे स्वतःच्या हातात संभाजीराजांनी घेतली आणि संकटावर मात करण्याचा निर्धाराने प्रयत्न केला. या प्रयत्नामध्ये संभाजीराजे यशस्वी झाले. या प्रसंगादरम्यान त्यांना आपला स्वभावधर्म वाचविला. तो कसलेल्या राजकीय नेतृत्वाला शोभणारा आहे. आपल्या युक्तीने आणि धैर्याने त्यांनी स्वराज्यावरील संकट दूर केले. यातून त्यांचे स्वराज्य एकसंघ राखण्याचे कौशल्य स्पष्ट होते. त्यांच्या या योगदानाला भारताच्या इतिहासात तोड नाही असेच म्हणावे लागेल.

स्वराज्याच्या संक्रमण काळात संभाजीराजांची राज्य नैतिक भूमिका स्वराज्याच्या पूर्व जीवनासाठी फार-फार महत्वाची आहे. यातून त्यांचे स्वराज्याप्रती असणारे प्रेम व शिवाजी महाराजांच्या कार्याबद्दल असणारी जबाबदारीची भावना स्पष्ट होते.

## २.२० शिवाजी महाराजांचे राजकीय धोरण संभाजीराजांनी स्वीकारले

संभाजीराजांच्या राज्यकारभारातील योगदानाचे मूल्यमापन त्यांच्या स्वराज्य कारभारातील निर्णयावरून करणे अधिक संयुक्तिक ठरले. शिवाजी महाराज आणि संभाजीराजे यांचे संबंध स्पष्ट होतील. त्यांना मावळ्याबद्दल असणारा जिव्हाळा, स्वराज्याची वृद्धी झाली किंवा नाही. स्वराज्यासाठी त्यांनी पराक्रम केला किंवा नाही, परकीय सत्तेशी त्यांनी राजनैतिक संबंध कसे ठेवले या सर्व प्रश्नांची उत्तरे प्राप्त होण्यास मदत होईल. संभाजी राजांच्या स्वराज्य प्रेम व स्वराज्याचे राजकीय धोरण शिवाजी महाराजांच्या धोरणाचे प्रतिबिंब होते. काही ठिकाणी तर त्यांनी शिवाजी महाराजांच्या

धोरणाचा आदराने, आपुलकीने उच्चार केलेला आहे. याबाबतचे संदर्भ 'छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ' यात आलेले आहे ते पुढील प्रमाणे,

१. शिवाजी महाराजांनी ज्याच्यापासून मंत्रोपदेश घेतला त्या गोपाळभट या वेदशास्त्र पंडिताच्या पुत्राचा सन्मान पुढे चालू ठेवताना संभाजी महाराज म्हणतात, "आबासाहेबांचे संकल्पीत आहे ते चालवावे हे आम्हास अगत्य."[१८]

२. इंग्रजांशी झालेल्या एका मैत्रीच्या करारात संभाजी महाराज म्हणतात, "माझ्या वडिलांचे वेळी जो शिरस्ता होता तोच मी पाळीन"[१९]

सुभ्याचे, महालांचे, गडकोटाचे व लष्कराचे लहान-मोठे अधिकारी हे कारभारातील महत्वाचे दुवे होते. राज्ययंत्रणा त्यांच्यावरच उभी होती. केंद्र सत्तेची जरब असेल तरच ते जबाबदारीने जाणिवेने वागतील अशी हुकूमत संभाजीराजांनी आपल्या राज्यकारभारात निर्माण केली होती. यावरून त्यांचे स्वराज्यातील योगदान स्पष्ट होते हे त्यांच्या मोजक्या आज्ञापत्रावरून दिसून येते. उदाहरणार्थ:

३. सज्जनगडावरील समर्थशिष्यांच्या झगड्यात पडणाऱ्या किल्लेदारास समज देताना संभाजी महाराज लिहितात, "तरी तुम्हास ऐसे करावया प्रयोजन काये... याउपरि घे घालमेलीत पडाक्या प्रयोजन नाही. श्री स्वामींच्या समुदायाची काडी इतके अंतर पडो न देणे..."[२०]

४. मोगलांच्या प्रतिकारास वतनदाराचे मोलाचे साह्य होत असे अशावेळी वतनदारांना नाराज करणे ही बाब राज्यहिताची नव्हती. दत्ताजी केशव पिसाळ या जोरखोऱ्याच्या देशमुखाच्या संबंधात संभाजी महाराज जावळीच्या सुभेदारास सूचना देतात. "दत्ताजी केशवजी पिसाळ देशमुख उर्फ जोरखोरे यांची कैलासवासी स्वामींनी हक्क वतन करून दिल्हे आहे. त्याप्रमाणे हे वर्षास मोईनप्रमाणे चालत आले. हल्ली कसुर होते म्हणून कळो आले. तरी हे दिवसांत गनीम काणात पेशक.

या प्रसंग हशमाचा जमाव करावया देशमुख मशारनिल्हेस आज्ञा केली असे व पुढे कित्येक काम त्यांचे हातून घेणे असता, उगेच माणूस दिलगीर करावे आणि स्वामींच्या कार्याचा नाश करावे ही कोण कारकुनी हे गोष्टीने स्वामींचा तरी फायदा तरी ते कौडी इतकी गोष्ट नाही. ऐसे असता असे करावयास गरज काय. या उपरी तरी देशमुख एकंदर रंजीस न करणे. त्यांचा हक्क  जो सालाबादाप्रमाणे चालला आहे, ते प्रमाणे तुम्हीही चालवणे. कसुर काडीइतकी न करणे. पुढे बीमार आल्यास स्वामीं तुमची भीड धरणार नाहीत हे नेमस्त समजणे"[२१]

वतदाराचा स्नेहभाव आणि दंड या दोहोबाबत अंतर ठेवावे व ही शिवाजी महाराजांची राज्यकारभार नीती संभाजीराजांनीही पुढे अंमलात आणली याची उत्तम दोन उदाहरणे संभाजी-चरित्रात आहेत. यावरून संभाजीराजांचे स्वराज्य योगदान स्पष्ट होण्यास मदत होते.

१) कर्नाटकात स्वराज्याच्या सेवेत असणाऱ्या वतनदारांचे पुणे प्रांताचा कृष्णाजी काशी हा कर्नाटकात हरजीराजे महाडीकाजवळ होता. आपण परप्रांती, आपले पुणे प्रांतीचे कुलकर्णी वतन कोणी तर गैरवाका सांगून बळकावीत ही त्यास भीती वाटत होती. म्हणून आपले वतन अमानत आहे. ते तसेच ठेवावे म्हणून तो छत्रपतींना विनंती करतो.

त्यावर छत्रपती लिहितातः तरी तुमची वृत्त अमानत आहे तैसी आहे. पुढे तुमचा कोणी दाईज हुजूर आला तरी तयाचे बोले मोकली करावयाची  आज्ञा होणार नाही. अनामतच आहे. येविसी तुम्ही आपले समाधान असू देणे "[२२]

२) "मावळ प्रांतीच्या सर्जेराव जेधे या मोगलास मिळालेल्या फितूर वतनदाराचे याला संभाजीराजांनी कसेः "ए क्षणी स्वामी आज्ञा करितात तरी गनीमदेखील तुम्हास कापून काढवीतच आहेत. बरे समजणे"[२३] संभाजीराजाच्या वरील आज्ञापत्राचे

विश्लेषण करण्याची गरज नाही. इतक ते स्वच्छ वा स्पष्ट आहेत. या पत्रातून संभाजीराजांच्या स्वराज्याबाबतच्या योगदानाचे निष्कर्ष असे सांगता येतील.

i. शिवाजी महाराजांच्या आदेशाचे पुढील पालन केले आहे.

ii. स्वराज्याच्या हिताच्या गोष्टींना बाधा येणार नाही. याबाबतची काळजी घेतली.

iii. सर्वसामान्यांच्या हक्काला, मालमत्तेला धक्का लावला नाही.

iv. आदेशांची भाषा कठोर आणि स्पष्ट आहे.

v. अडचणींच्या काळात निर्णय धाडसी व स्वराज्य हिताचेच घेतले.

## २.२१ न्याय-निवाड्याबाबत धाडसी निर्णय

संभाजीराजांच्या काळात न्यायव्यवस्था ढासळल्याचा आरोप केला जातो. पण हा आरोप अर्थहीन असल्याचा स्पष्ट होतो. उलट त्या काळातील न्यायनिवाडा अत्यंत पारदर्शी व धाडसी स्वरूपात घेतल्याचे पुढील काही उदाहरणांवरून स्पष्ट होते.

१. प्रचंडगडाच्या घेऱ्यातील गाई म्हशींच्या वनचराई संबंधीचे पत्र, सज्जनगडावरील समर्थ शिष्यातील कथल्यासंबंधीचे पत्र, शहापूरच्या हनुमान मंदिराच्या तंट्यासंबंधीचे पत्र"[२४] पाहिली असता त्यांचे राज्य कारभारातील बारकाईने असणारे लक्ष स्पष्ट होते.

२. "शिवाजी राजाच्या वेळी विकत घेतलेल्या माणसामागे कडक जकात द्यावी लागे, परंतु संभाजीराजांनी गुलामांच्या व्यापाराला संपुर्णच बंदी घातली. ही लक्षात घेण्यासारखी गोष्ट आहे."[२५] वरील सर्व पत्रांचा विचार करता संभाजीराजांची न्यायव्यवस्थेबाबतच्या वरील उदाहरणावरून काही निष्कर्ष पुढील प्रमाणे काढता येतात.

१) सामाजिक-धार्मिक न्याय निवाड्यात कारण नसताना पडणे संभाजीराजांना मान्य नसे. याबाबत त्यांनी अधिकाऱ्यांना सुचना दिल्या होत्या.

२) गुलामाच्या खरेदी विक्रीबाबत त्यांना मनस्वी राग असल्यामुळे त्यावर कायद्याने बंदी आणली. मानवी जीवनातील ही अमानुष पध्दत त्यांनी बंद केली.

३) धार्मिक क्षेत्रामधील न्याय निवाडे सर्वसामान्यांच्या हिताचा विचार करून घेतले.

४) संभाजीराजांचे न्याय-निवाडे अत्यंत धाडसी असत. वरील सर्व बाबींवरून संभाजीराजांचे स्वराज्यातील योगदान अधिक स्पष्ट होण्यास मदत होते. त्यांच्यावर होणारे आरोप आधारहीन असताना दिसतात.

## २.२२ औरंगजेबास नामोहरम

संभाजीराजांच्या व्यक्तिमत्त्वाचा समग्रपणे शोध घेण्याच्या दृष्टीने व त्यांच्या स्वराज्यविषयक कामगिरीचे योग्य आकलन होण्याच्या दृष्टीने औरंगजेबाचे साम्राज्य व राजकीय सामर्थ्य आणि त्या सामर्थ्याला संभाजी राजांनी दिलेला हादरा पाहिल्यास संभाजी राजांचे सामर्थ्य स्पष्ट होते. औरंगजेबाच्याही मनात मराठ्यांचे स्वराज्य सलताना दिसते. औरंगजेबाच्या मनातील सल संभाजीराजांच्या मृत्युनंतरही चालू होता. संभाजीराजांच्या बालपणापासून म्हणजे वयाच्या नवव्या वर्षांपासून मुघल सत्तेशी वा औरंगजेबाशी त्यांचे चांगले-वाईट संबंध आलेले आहेत. संभाजीराजांना कपटाने असंख्यवेळा मारण्यासाठी मुघलांनी प्रयत्न केलेले आहेत. पण चार्तुर्यामुळे आणि बुध्दीसामर्थ्यामुळे संभाजीराजे यातून खुपवेळा यशस्वीपणे बाहेर पडलेले आहेत. त्यांचे शल्य औरंगजेबास नेहमींच सलत आलेले आहे.

औरंगजेबाच्या साम्राज्याच्या विस्तार इ. स. १६८० च्या नकाशानुसार पाहिल्यास थक्क करणारा आहे. तत्कालीन शक्तिशाली सम्राट असणाऱ्या औरंगजेबाला संभाजीराजांनी राजपद प्राप्तीनंतर काही काळातच जेरीस आणले होते. यामुळे औरंगजेबाने

संभाजी राजाविरूध्द व्यापक मोहिम करण्याचे ठरविले. याबाबतचा वृत्तांत 'कारवारच्या' इंग्रजांनी लिहितांना म्हटले आहे. त्यातून औरंगजेबाची मनस्थिती आणि संभाजीराजांचा पराक्रम स्पष्ट होतो. तो वृत्तांत पुढीलप्रमाणे "संभाजीविरूध्द राजाचा इतका दृढ निश्चित झाला आहे की, औरंगजेबाने आपल्या डोक्यावरची टोपी फेकून दिली आणि संभाजीचा वध केल्याशिवाय, त्याला पकडल्याशिवाय किंवा त्यांच्या देशातून त्याची हकालपट्टी केल्याशिवाय आपण ही टोपी आपल्या डोक्यावर घालणार नाही. असे त्याने जाहीर केले आहे."[२६] प्रस्तुत वृत्तात 'कारवार' इंग्रजीचा 'जदुनाथ सरकार' यांनी नोंदविला आहे. यातून त्यांना औरंगजेबाची अस्वस्थ मानसिकता स्पष्ट करायची आहे. या मानसिकतेचा विचार करता संभाजीराजांनी अफाट मुघल साम्राज्याला कडवे आव्हान दिलेले आहे हे स्पष्ट होते. औरंगजेबाने स्वत्वाचा अहंकाराने तळतळाट करावा ही गोष्ट समजते. इतकी सहज नसून संभाजीराजांनी त्यांच्या साम्राज्याला उध्वस्त करण्यासाठी केलेला प्रयत्न आहे. याच्यातून त्यांनी 'टोपी' न घालण्याची महत्वाकांक्षी प्रतिज्ञा केली आहे.

औरंगजेबाने संभाजीराजांना व स्वराज्याला पूर्णतः संपविण्याचा विचार केलेला दिसतो. या सर्व परिस्थितीत स्वराज्याचे रक्षण करण्याची पूर्णतः जबाबदारी संभाजीराजांची होती. अडचणीच्या प्रसंगातही मुघलाचे जीवघेने संकट त्यांनी पेलले आणि यशस्वीपणे परतवून लावले यातून त्यांच्या राजकीय पराक्रमांची, दूरदृष्टीची आणि कसलेल्या सम्राटाला नामोहरम करण्याचे कौशल्य स्पष्ट होते. यातून संभाजीराजे यांचे स्वराज्यविषयक योगदान स्पष्ट होते.

### २.२३ परकीयांशी संभाजीराजांचा संघर्ष

संभाजीराजांनी राज्यकारभाराची सूत्रे हाती घेतल्यानंतर अनेक राज्यसत्तेशी त्यांचा संघर्ष झाला. स्वराज्याच्या रक्षणाच्या दृष्टीने व विस्ताराच्या दृष्टीने हा संघर्ष झालेला होता. यामागे त्यांची भूमिका स्वराज्यावरील संकट टाळण्याच्या दृष्टीने होती. शिवाजी

महाराजांच्या निधनामुळे स्वराज्याच्या शत्रूंनी उचल खाण्यास सुरूवात केलेली होती. या संकटाने न डगमगता संभाजीराजे धैर्याने सामोरे जातात आणि स्वराज्याच्या राज्यकारभाराची घडी व्यवस्थित बसविण्याचा यशस्वी प्रयत्न करतात. यामुळे स्वराज्य रक्षणाचे कार्य यशस्वीपणे पार पाडले जाते.

मुघल हे स्वराज्याचे शत्रू होते. त्याचबरोबर डच, फ्रेंच, पोर्तुगीज आणि इंग्रज त्यांच्या स्वराज्याला संपविण्याचा प्रयत्न करत होते. या बाबतची माहिती तपशिलवार द्यावयाची आहे. संभाजीराजांच्या कारकिर्दीत परकीय सत्तेशी संघर्ष-समन्वय या स्वरूपाचा संबंध आलेला होता. यातून त्यांचे राजकीय धोरण समजते.

## २.२४ संभाजीराजे : सिद्दी व इंग्रज

स्वराज्याच्या अनुषंगाने शिवाजी महाराजांच्या बरोबर परकीय सत्तांचे तह, करार झालेले होते. महाराजांच्या मृत्यूनंतर त्या तहाची अंमलबजावणी व्यवस्थित होते का ? हे पाहण्याचे काम संभाजी महाराज करत होते. मराठे, इंग्रजी आणि सिद्दी या तिघांचे एकत्रित संबंध पाहिल्यास त्यांच्यातील संबंधाची कल्पना येते. सिद्दी आणि इंग्रज यांच्या संबंधावर संभाजी महाराज आणि इंग्रज यांचे राजकीय संबंध अवलंबून असत. यामुळे प्रत्येकाची हालचाल व धोरण स्पष्ट होण्यास मदत होईल आणि संभाजीराजांचे या बाबतीत धोरणही स्पष्ट होईल. याबाबत 'शिवपुत्र संभाजी' या ग्रंथातील अभिप्राय पुढील प्रमाणे, "इंग्रजांनी हिंदुस्थानात अनेक ठिकाणी वखारी घातलेल्या होत्या. सुरतेची वखार ही त्यात मुख्य होती. मराठ्यांचा सुरतेपेक्षा- मुंबईच्या-वखारीशी अधिक संबंध येत असे. सुरतकर इंग्रजांची मुघल आणि सिद्दी यांना सहानुभूती असे आणि सिद्दीला हे सर्व प्रकारचे सहकार्य देत सुरतकर इंग्रजांचे हे धोरण मुंबईकरांना पसंत नसे. परंतु त्यांना प्रत्येक वेळी सुरतकरांच्या सल्ल्यावाचून काही करता येत नसे. या संघर्षामुळे अनेक प्रश्न निर्माण होत असत. "[२७] इंग्रजांच्या मुंबई व सुरत वखारींचे मराठ्यांशी असणारे संबंध परस्पर भिन्न स्वरूपाचे होते.

सुरतची वखार मुघल व सिद्दीला मदत करत असे. तर मुंबईची वखार मराठ्यांना सहकार्य करण्याचे धोरण अवलंबत असे. इंग्रजांच्या प्रमुख वखारीपैकी सुरतची वखार प्रमुख असल्यामुळे मुंबईच्या वखारी अधिकाऱ्याला सुरतच्या अधिकाऱ्याचेच म्हणणे ऐकावे लागत असे. यावरून इंग्रज वखारकारांचे मराठ्याशी असणारे दुटप्पी धोरण स्पष्ट होते.

सुरतच्या वखारीने सिद्दीसारख्या मराठ्यांच्या परंपरागत शत्रुला सहाय्य केल्यामुळे मराठ्यांना त्याचा वारंवार त्रास होत असे. सिद्दीचा बंदोबस्त करण्यात असंख्य समस्या निर्माण झाल्या. सिद्दीबरोबर झालेल्या युद्धात मराठ्यांना पराभव पत्करावा लागला. यामुळे सुरत परिसरात मराठ्यांना आपली सत्ता प्रस्थापित करता आली नाही.

## २.२५ संभाजीराजे व इंग्रज

शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर (इ.स. १९८०) इंग्रज अधिकारी संभाजीराजांना भेटण्यासाठी उत्सूक होते. या भेटीच्या दृष्टीने ते अनुकूल संधीची वाट पाहत होते. संभाजीराजाचे वास्तव्य पन्हाळ्यास असताना त्यांनी राजापुरला आपला नवनिर्वाचीत सुभेदार पाठविला पण संभाजीराजांच्या आदेशाशिवाय काहीच होणार नसल्याचे त्यांनी आपल्या कंपनी अधिकारी वर्गास सांगितले. त्यानंतर त्या अधिकाऱ्याने संभाजीराजांना भेटण्याची विनंती करणारा अर्ज केला. त्या अर्जाला उत्तर देतांना संभाजीराजे म्हणतात, "तूर्त मला सवड नाही. सवड होताच हिशेब पाहून निकाल करू."[२८] असे नापसंतीचे उत्तर त्यांनी पाठविले. शिवाजी महाराजांनी रत्नागिरीच्या बंदरामध्ये पकडलेला इंग्रजांचा बेकायदेशीर माल शिवाजी महाराजांच्या मृत्युनंतर संभाजीराजांकडे परत मागितला. संभाजी राजांनी हा माल देण्यास शिवाजी महाराजांच्या प्रमाणे टाळाटाळ केली. यामागे संभाजीराजांचे धोरण इंग्रजांशी सरळ सरळ विरोध न करता छुप्या स्वरूपात इंग्रजांना जेरीस आणणे असा होता. त्यांच्या आरमारी कारवाया रोखणे व त्यांचे राज्य विस्ताराचे प्रयत्न हाणुन पाडणे.

## २.२६ राजापुरची वखार बंद

काही कारणांनी इंग्रजांना राजापूरची वखार बंद झाल्यावर वखारीतील मालमत्ता, माणसे वखारीतच अडकून पडलेली होती. त्यांना सोडवून आणण्यासाठी इंग्रजांनी सुभेदाराच्या मदतीने संभाजीराजांना विनंती केली पण परवानगी मिळाली नाही. या इंग्रजांनी आपला अधिकारी पाठविला यास संभाजीराजेंनी दिलेले उत्तर : "सध्य अनय कामात गुंतल्याने तुमच्या विनंतीचा विचार नंतर करीन असे सांगून महाराजांनी त्यांना परत पाठविले. "[२९] संभाजीराजांचे हे उत्तर पाहता ते इंग्रजांना सहकार्य करण्याच्या मनस्थितीत नसल्याचे दिसते. यामागे राजकीय कारण असल्याचे अनुमान लावता येते.

## २.२७ इंग्रज रायगडावर संभाजीराजांच्या भेटीसाठी

संभाजीराजे १८ जून १६८० ला रायगडावर गेले. इंग्रजांनी आपले अधिकारी रायगडावर पाठविले. त्यांनी राजांजवळ 'राजापुरच्या हुकुमाचा बक्षिस' विषय काढला. या विषयावर संभाजीराजे काही निर्णय देतील असे त्यांना वाटत होते. कारण राज्याची व्यवस्था निटनेटकी लावल्यामुळे राजे सर्व अडचणीतून मुक्त होते. यामुळे त्यांना वेळ असल्यामुळे अनुकूल उत्तरे प्राप्त होतील असे इंग्रज अधिकाऱ्यांना वाटत होते. अशा राजापूरच्या इंग्रजाची समजूत होती. पण तसे काही घडले नाही. ता. १५ जुलै १६८० रोजी मुंबईकरांनी राजापूरला कळविलेल्या रिपोर्टची नोंद पुढीलप्रमाणे आहे, "संभाजी राजांशी किंवा त्यांच्या मंत्र्यांशी सध्या तरी बोलणी करू नये. त्याचा काही उपयोग होणार नाही. "[३०]

संभाजीराजांनी राजापूरच्या वखारीतील अधिकाऱ्यांशी बक्षीसाचा विषय टाळण्या-मागील काही कारणाबाबत निष्कर्ष काढण्यास जागा आहे. ते निष्कर्ष पुढील प्रमाणे,

१. इंग्रजांनी शिवाजी महाराजांशी केलेला तह पाळलेला नाही.

२. इंग्रजांनी सिद्दीचा बंदोबस्त केलेला नव्हता. त्याच्या हालचाली पूर्ववत चालूच होत्या.

३. सिद्दीचा पेण, नागोठणे या भागात लुटमार करीतच होते.

४. सिद्दीने पकडलेल्या गलबताचा लिलाव उघडपणे चालविला होता.

संभाजीराजांनी इंग्रजांशी अशा स्वरूपाचे राजकीय धोरण ठेवण्याचे कारण 'कमल गोखले' आपल्या 'शिवपुत्र संभाजी' या ग्रंथात म्हणतात, "संभाजी महाराजांच्या भीतीने मुंबईकरांनी सिद्दीचा दाणागोटा बंद करून सर्व मदत थांबविली. सिद्दीचे लोक जेरीस आल्यामुळे त्याने नागोठाणे, पेण, आपटे व बटी येथे लुटालुट करणार नाही असा इंग्रजांशी करार केला. ऑगस्ट महिन्याच्या दुसऱ्या आठवड्यात सिद्दीने आपले आरमार बाहेर काढले. "[३१] यावरून संभाजी महाराजांनी इंग्रजांशी संबंध ताणलेले कारण स्पष्ट होण्यास मदत होते.

## २.२८ सिद्दी मराठा युद्ध

सिद्दीने मराठ्यांच्या प्रदेशांची जाळपोळ, लुटालूट चालविलेली होती. यामुळे संभाजीराजांनी त्यांना धडा शिकविण्यासाठी ता. १८ ऑगस्ट १६८० पूर्वी २०० सैनिकांनी रात्र गुप्तपणे उंदेरी बेटावर हल्ला चढविला हा हल्ला पूर्णतः मराठ्यांच्या दृष्टीने फसला यामुळे या हल्ल्यात मराठा सैन्याची दैना उडाली. सुमारे ८० सैनिक सिद्दीच्या हाती सापडले. याबाबतचा सविस्तर वृत्तांत इंग्रजांनी नोंदविला आहे. तो पुढीलप्रमाणे, "अंधार आणि बेटावरील खाणाखुणांचा परिचय नसल्यामुळे सिद्दीला त्यांची लवकरच चाहूल लागल्याने मराठ्यांचा पराभव झाला. सुमारे ८० मराठ्यांची शिरे सिद्दीने मुंबई बेटावर आणल्यामुळे मराठ्यांच्या वकिलाला वाईट वाटले. डेप्युटी गव्हर्नरने ती शिरे किंवा कैदी मुंबई बेटावर उतरू दिले नाहीत. सर्व डोकी भाल्यावर टोचून त्यांचे किनाऱ्यावर प्रदर्शन करण्याचा सिद्दीचा अमानुष उद्देश मुंबईकरांनी सिद्धीस जाऊ दिला नाही."[३२] मराठ्यांनी पूर्ण तयारीनिशी सिद्दीवर हल्ला न केल्यामुळे या हल्ल्यात सिद्दीचा विजय झाला. पण सिद्दीने या विजयास अमानुष आनंदाचे स्वरूप दिले आणि क्षात्रधर्माला न शोभणारे कृत्य केले असेच म्हणावे लागेल.

सिद्दी व मराठे यांच्या उंदेरी बेटावरील लढाईचे वर्णन 'मराठा साम्राज्याची छोटी बखर' यात आलेले आहे ते पुढीलप्रमाणे, "तो खंदेरीहून मायनायकाचा पुत्र उंदेरीवर ३००

शिपाई माणसानिशी धावून गेला. तेथे लढाई झाली. आरमार घेऊन फिरोन खंदेरीस किल्ल्यास येताना हवशी याणी मुकाबला केला. हातघाईस येऊन मायनाजी नाईक याचे पुत्राचे डोके मारून गलबतात घालून मुंबईस प्रवाशांनी पाठविले. शेख महंमद उंदेरीवर किल्लेदार होता. त्याचवर एक दोन वेळा दर्यासारंग व नाईक मुजुमदार यांनी सरंजाम सुद्धा जाऊन हल्ला केला. परंतू बाजु सर झाली नाही. खांदेरीकरांची कमतीच राहिली. [३३] बखरकारांस 'उंदेरीचा' वृत्तांत स्पष्टपणे तपशिलात ज्ञात नाही. असे त्यांच्या नोंदीवरून समजते. त्यांनी केलेली नोंद अतिशयोक्तीने भरलेली असून ऐतिहासिक घटना घडल्याची नोंद मात्र बरोबर आहे. इतकाच बोध होतो आणि मराठ्यांच्या सैनिकाचा मृत्यूनंतर झालेला अमानुषपणा स्पष्ट होण्यास मदत होते.

मराठे आणि सिद्धी यांच्यामध्ये सातत्याने संघर्ष झालेला आहे. सिद्दींनी आपला स्वभाव व राजनीती सोडली नाही. संभाजीराजांनी सातत्याने त्यांना युद्धाच्या छायेखाली ठेविले. यामध्ये सुरतकर इंग्रजांनी छुप्या पद्धतीने सिद्दीना मदत करण्याचे थांबविले नाही. तर इंग्रज मुंबईकरांवरील संभाजीराजांनी दडपण अधिक कठोर केले. सिद्दी आणि मराठा यांच्यातील संघर्ष शिवाजी महाराजांच्या पासुन चालू होता. संभाजीराजांच्या काळात तो तसाच राहिला. शिवाजी महाराजांप्रमाणे संभाजीराजानेही हा संघर्ष समर्थपणे पेलला व पचविला. स्वराज्याचे रक्षण केले. सिद्दीच्या कारवायामुळे त्यांनी आरमारांची स्थिती भक्कम केली व नावीक क्षमतेत वाढ केली. यामुळे मराठ्यांचे नाविक दल अधिक समर्थ व सक्षम झाले. सिद्दीनी हा उपद्रव संभाजीराजांच्या नंतरही चालू ठेवला. स्वराज्याच्या उत्तराधिकाऱ्यांनी याला सक्षमपणे तोंड दिले.

सिद्दीच्या आरमारावरील आक्रमणाने संभाजीराजांची आरमार स्थिती भक्कम आणि सक्षम असल्याचे स्पष्ट झाले. परकीय सत्तेला रोखण्याचे सामर्थ्य असल्याची जाणीव स्पष्ट होते. या बाबींचा विचार करता, संभाजीराजांना मुघलांबरोबर परकीय सत्तेलाही तोंड द्यावे लागले. यामध्ये इंग्रजांची भूमिका दुटप्पी व सिद्दीच्या हिताची असताना दिसते.

संभाजीराजांनी इंग्रजांशी असणारे तह, करार, अटी कोठेच मांडल्याचा उल्लेख येताना दिसत नाही. यावरून राजकीय नीतीमत्ता स्पष्ट होते. स्वराज्याला सक्षम आणि प्रभावशाली बनविण्याचा प्रयत्न संभाजीराजांच्या राज्यकारभारामध्ये झाल्याचे स्पष्टपणाने जाणवते. यातून त्यांचे स्वराज्यविषयक योगदान स्पष्ट होण्यास मदत होते.

### २.२९ मराठे आणि पोर्तुगीज

पाश्चात्य सत्तेमध्ये पोर्तुगीज यांचा समावेश असून त्यांचा स्वभावधर्म शांत असल्याचे जाणवते. त्यांचा राजसत्तेशी जसा संबंध होता तसाच व्यापाराशी व धर्मांतराशी खूप जवळचा संबंध होता. अमात्यांच्या 'आज्ञापत्रामध्ये भारतात आलेल्या परकीय पाश्चात्य व्यापाऱ्यांच्या स्वभावाचे आणि त्यांच्या मनातील सुप्त हेतुचे वर्णन अगदी मार्मिक शब्दात नोंदविलेले आहे. ते नोंदविताना म्हणतात, "साहुकारामध्ये फिरंगी, इंग्रज आणि वलंदेज व फरासीस तसेच डिगमारादि टोपीकर हे ही लोक साहुकारी करितात. परंतू ते वरकड साहुकारांसारखे नव्हेत. त्यांचे खावेद प्रत्येक राज्य करीत आहेत. त्यांचे हुकमाचे त्यांचे होत्साते हे लोक या प्रांती साहुकारीस येतात. राज्य करणारास स्थललोभ नाही असे काय घडो पहाते ? तथापि टोपीकरांस या प्रांती प्रवेश करावा, राज्य वाढवावे, स्वमते प्रतिष्ठावी हा पूर्णभिमान तदनुरूप स्थळीस्थळी कृतकार्यही झाले आहेत. त्यास ही हट्टी जात हातास आलें स्थळ मेल्यानंही सोडावयाचे नव्हेत. त्यांची अमरफती आले गेले. इतकीस असों द्यावी. त्यास केवळ नेहमी जागा देऊ नये."[३४]

पाश्चात्यांच्या आगमनामध्ये पाहता पोर्तुगीज हे भारतामध्ये सर्वप्रथम आले. इ.स. १५०१ मध्ये त्यांनी आदिलशहाकडून गोवा शहर ताब्यात घेतले. सर्वात शेवटी भारत सोडणाऱ्या परकीयांमध्ये पोर्तुगीज हे शेवटचे आहेत. अन्य परकीयांनी खूप वर्ष व्यापारी हा आपला उद्देश ठेवला होता. पण पोर्तुगीजांनी प्रथम धर्मप्रसार व राज्यकाराभारांच्या दृष्टीने भारताकडे पाहिलेले आहे. परकीय सत्तेला राज्य व प्रदेशांची लालसा अधिक असल्याची

आज्ञापत्राची नोंद अधिक मार्मिक असून त्यांच्या स्वभावावर अचूक बोट ठेवणारी आहे. पोर्तुगीज व मराठे यांचे सुद्धा संबंध सातत्याने आलेले आहेत. या दृष्टीने त्यांचे राजकीय विचार व संभाजीराजांचे धोरण पाहणे महत्वाचे ठरेल.

## २.३० संभाजीराजे व पोर्तुगीज

शिवाजी महाराज आणि पोर्तुगीज यांचे संबंध फारसे चांगले नव्हते. याबाबत सबळ पुरावे उपलब्ध आहे. हे संबंध इ.स. १६७५ मध्ये आदिलशाहाच्या ताब्यातील 'फोंडागड' जिंकून घेतल्यानंतर बिघडले. या किल्यांचा परिसर महाराजांच्या ताब्यात आला. गोव्याच्या भोवतीच्या प्रदेशावर पोर्तुगीज हक्क सांगत. तो हक्क संपुष्टात आल्याने हे संबंध बिघडले होते. शिवाजी महाराजांना फोंडागडाच्या विजयानंतर गोव्यावर स्वारी करायची होती. पण मुघलाबरोबरच्या युद्धात गुंतल्यामुळे राहून गेले. पुढे महाराजांच्या मृत्युनंतर गोव्यातील पोर्तुगीजांना दिलासा मिळाला.

शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर इ.स. १६८० च्या सुमारास संभाजीराजे पन्हाळ्यावर असताना स्वराज्याच्या सभोवती असणाऱ्या परकीय सत्तेशी सलोख्याचा पत्रव्यवहार चालू ठेवला. असाच सलोख्याचा पत्रव्यवहार गोव्याच्या पोर्तुगीजांशीही त्यांनी केला. या पत्रव्यवहारावरून त्यांच्या मनातील भावना स्पष्ट होते. या पत्रातून राजकीय दूरदृष्टीचा प्रत्यय येतो. ते पत्र पुढील प्रमाणे, "दि. ५ मे १६८० च्या सुमारास संभाजीने राजमी नाईक ठाकूर या वकिलाबरोबर गोव्याच्या विजराई इंतोनियो-पाइस-द-सांदे यास सलोख्याचे पत्र पाठविले. या पत्रात संभाजीने आपल्या वडिलांच्या दुःखद निधनाची बातमी देऊन आपण सत्ताधारी झाल्याचे कळविले आणि पोर्तुगीज व मराठे यांच्यात मैत्रीचा तह करण्यास सुचविले. संभाजीच्या या पत्राचे गोव्याच्या गव्हर्नरला कौतुक वाटले."[३५]

व्हाइसरॉयने या पत्राला उत्तर देतांना समाधान व्यक्त केले. शिवाजी महाराजांच्या निधनाबाबत दुःख व्यक्त केले आणि संभाजीराजांनी स्वराज्यची सुत्रे हातात घेतल्याचे

समाधान व्यक्त केले. अनेक दिवसाचे शत्रुत्वाचे संबंध बदलण्याचे वचन दिले. तहासही मान्यता दर्शविली. तहाच्या संबंधात व्हॉईसरॉय-विजराई रायाची पंडिताला सांगतात की, "मी माझ्या साष्ट व कुडाळ येथील फिरंगी अधिकाऱ्यांना युद्धविषयक हालचाली बंद करण्याचे हुकुम दिले आहेत. रायाजी पंडिताला परतण्याचे घाई असल्यामुळे विजयईने पत्र न देता तहासंबंधी तोंडीच सांगून संभाजीराजाला भेट म्हणून सोन्याचा मुलामा दिलेली बंदूक आणि चार कापडाचे नग दिले."[३६] वरील नोंदीवरून संभाजीराजांनी पोर्तुगीजांशी संबंध बदलण्याचा प्रयत्न केला असल्याचे स्पष्ट होते.

संभाजीराजांचे आणि पोर्तुगीजांचे संबंध अगदी दोन वर्षामध्ये १६८२ साली राजकीयदृष्ट्या बिघडले. याला कारणही तसेच घडले. या दरम्यान संभाजीराजांनी कारवारजवळील 'अंजदीव' बेट जिंकून त्या बेटावर किल्ला बांधण्यासाठी चुना व अन्य सामान त्या दिशेने पाठविले. याचा सुगावा 'विजयई' या सेक्रेटरी 'दोतोर लुईस गोल्सावीस कोत' यास लागला. त्याने २९.०४.८२ ला पत्र लिहून ही गोष्ट विजराईस सांगितली. त्याने संभाजीराजांची माणसे पोहचण्यापूर्वी सामानासह आपली माणसे पाठवून किल्ला बांधण्याचे काम सुरू केले. याबरोबर आणखी एक कारण हे संबंध बिघडण्याचे घडले. याबाबतचे कारण 'कमल गोखले' आपल्या 'शिवपुत्र संभाजी' या ग्रंथात देतात. ते पुढील प्रमाणे, "संभाजीराजांनी सिद्दीशी युद्ध करण्याच्या उद्देशाने अरबांशी संगनमत करून त्यांच्या आरामाराची मदत घेतली होती. अरब व संभाजी यांचे मैत्री दिवसेंदिवस वाढत होती. अरब हे पोर्तुगीजांचे शत्रू त्यामुळे अंजदीव बेट संभाजीच्या ताब्यात जाण्याची भीती विजरईला वाटू लागली. दि. ५ मे १६८२ रोजी पोर्तुगीजांनी अंजदीव बेटाचा ताबा घेतला. दि. २.७.८२ रोजी कॅप्टन आरारू सिमोंइस पेटैर याने तेथील किल्याचा पहिला दगड बसविला. सहा महिन्याच्या आत किल्ला बांधून काढला. पावसाळ्यात अंजदीव बेटावर ७०० सैनिक आणि इतर गवंडी, सुतार व लोहार मजूर इ. मिळून १००० माणसे काम करीत होती. ही गोष्ट संभाजीराजांना कळली. त्यांनी आपल्या वकिलामार्फत व अकोल्याच्या सुभेदाराकडून

विजरईकडे वरील कृत्याबद्दल तक्रार केली. परंतु हे बेट पोर्तुगीजांचेच असून त्याबाबत बोलण्यास संभाजीराजांना अधिकार नाही असे जिरईने उत्तर दिले. यामुळे मराठे व पोर्तुगीज यांच्यात वाद निर्माण झाला."[३७]

या गोष्टींचा विचार करता संभाजीराजे आणि विजरई यांचे संबंध बिघडले असले तरी संभाजीराजांना शाहू नावाचा मुलगा झाल्यानंतर विजरई यांनी त्यांना अभिनंदनाचे पत्र लिहिले असून शाहूस एक दागिना नजर केला होता. यानंतर संभाजीराजांनी एक पत्र लिहून विजरईला कळविले, आपण डिचोली, कुडाळ याच परिसरात दोन दारूचे कारखाने उभारले असून कर्नाटकात व मलबारमध्ये 'तोफा, गंधक, सोरा' हे सामान विकत घेण्याची परवानगी मिळाली आहे. तरी हे सामान आणण्यास आरमाराकडून अडथळा होऊ नये. या मागण्या मान्य करण्यात आल्या. तरीही मराठा सरदाराकडून पोर्तुगीजांना योग्य वागणूक मिळाली नाही. या दृष्टीने मराठ्याचे राजकीय व व्यापारी, मैत्रीपूर्ण संबंध स्वराज्याच्या दृष्टीने बरोबर असल्याचे म्हणता येणार नाही. अरबांना सिद्दीच्या दृष्टीने जवळ करत असतांना पोर्तुगीजांना दुखविणे योग्य नव्हते. यामुळे पोर्तुगीज-मराठा संबंध शत्रुत्वाचे झाले.

पोर्तुगीज-मराठा संबंध बिघडल्याचा फायदा औरंगजेब बादशहाने घेण्याचा प्रयत्न केला. त्याने मराठ्यांच्या विरूध्द सतत पोर्तुगीजांना चिथावणी देण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे स्वराज्यावर संकट येण्यास सुरूवात झाली. एका बाजूला पोर्तुगीजांशी मैत्रीचे संबंध ठेऊन दुसऱ्या बाजूला सिद्दीस विरोध करणे योग्य होते. यामुळे अरबांच्या मदतीने सिद्दीचा पाडाव करता आला असता. आणि स्वराज्यांच्या आरमारास अधिक शक्तीशाली आणि भक्कम करता आले असते.

परकीय सत्तेबरोबर मराठ्यांचे संबंध सातत्याने चढ-उताराचे आणि स्वफायद्याचे राहिले विशेषतः पोर्तुगीजांबाबत अधिक स्पष्टपणे असे घडताना दिसते. याचा परिणाम स्वराज्यावर झालेला आहे. त्यामुळे स्वराज्याची फारशी हानी झालेली नाही. ही अधिक

समाधानाची बाब आहे. पुढे पोर्तुगीजांशी संभाजीराजांचे संबंध अधिक दुराव्याचे निर्माण झाले. हे रोखण्यासाठी 'विरजई' सारख्या उदारमतवादी प्रशासकांचे सततचे तडजोडीचे स्वागत संभाजीराजांनी करावयास हवे होते.

## २.३१ सर्वोत्तम भूमिपुत्र-स्वराज्यरक्षक : संभाजीराजे

संभाजीराजांचे स्वराज्यनिर्मिती रक्षक म्हणून खूप व्यापक कार्य आहे. त्यामुळे त्यांना विविध संबोधने लावण्यात आली. उदाहरणार्थ :छावा, धर्मपुत्र, धर्मवीर, इत्यादी. या सर्वांपेक्षा संभाजीराजे विवेकशील मानव होते. हे समजून घेणे महत्त्वाचे आहे. 'छावा' असण्यापेक्षा मानवी जीवनाला सद्सद्विवेक बुध्दीने प्रेरित करण्यासाठी सर्व स्तरावरची स्वातंत्र्याची घोषणा करणारे व सर्वश्रेष्ठ स्वातंत्र्याचा उपासक होते. स्व-राज्याची संकल्पना प्रत्येक - मानवामध्ये रुजविण्यासाठी सातत्याने प्रयत्न केले. या गोष्टींचा विचार करता व त्यांना केवळ आणि केवळ युध्द या राजकीय घटनाक्रमांशी जोडणे योग्य नव्हे. त्यांचे या पलीकडेही व्यापक वैचारिक कार्य आहे. याकडे आता फारसे अभ्यासक्रमांनी पाहिलेले नाही असे म्हणावे लागेल. त्यांनी मानवजातीच्या स्वातंत्र्याबरोबर त्यांच्या विकासाचाही अविरत विचार केलेला, म्हणून केवळ आणि केवळ धर्माशी त्यांचा संबंध जोडणे संयुक्त ठरणारे नाही. राजाचा लौकिक अर्थाने धर्म नसतो. तो ज्या धर्मात जन्मलेला असतो. तो धर्ममात्र असतो. राजाचा धर्म त्याच्या कार्याने प्रेरीत झालेला लोककल्याणाचा 'राजधर्म असतो.' या धर्मविचाराने सर्वधर्म संहिष्णुता, सर्वधर्मरक्षण इत्यादी मूल्यांचा स्वीकार केलेला असतो. या बाबींचा विचार करता संभाजीराजांना 'स्वराज्यरक्षक' असे म्हणणे अधिक संयुक्तिक ठरेल.

स्वराज्यरक्षक संभाजीराजे विविध अर्थाने भूमिपुत्र आहेत, असे त्यांच्या जीवन कार्यावरून स्पष्ट होते. ज्या भूमिमध्ये जन्मले त्याच भुमीचे ऋण मानून येथील लोकांशी आपले नाते सांगितले. राजपदाचे वैभव, सुख आणि मिजास न उपभोगता आपल्या

भूमीच्या आपल्या माणसांच्या रक्षणासाठी रात्रंदिवस झटत राहिले. लढत राहिले अखेर आपल्या प्राणाचाही विचार केला नाही. आबासाहेबांनी वा माझ्या वडीलांनी घालून दिलेल्या मूल्यविचारावरून मी माझे आयुष्य कर्म करेन असा आत्मविश्वास दाखविला आणि आयुष्यभर त्या विचाराशी कृतीने एकनिष्ठ राहिले. याबाबींचा विचार गृहीत धरून मी त्यांना सर्वोत्तम भूमिपुत्र म्हटलेले आहे. आणखीन एकार्थाने ते मला भूमिपुत्र वाटतात. शिवाजी महाराजांनी 'पुण्याच्या भूमीवर नांगर चालवून स्वराज्याची प्रतिकात्मक शेती करत असल्याचा संदेश दिला होता'. या कृतीला असंख्य पैलू आहेत. शेतकऱ्यांच्या खऱ्या-खुऱ्या राज्यसंकल्पनेचाही आहे. वा शिवाजी महाराज स्वतःला सरदार वा राज घराण्यातील न संबोधता आणि शेतकरी व पृथ्वीशी नाते सांगतात. त्यांच शिवाजी राजाचा पुत्र भूमिपुत्र आहे. असे म्हणणे अधिक ऐतिहासिकदृष्ट्या योग्य असेल. नृपती हा खऱ्या अर्थाने भूमिपुत्रच असतो. संभाजीराजेही वारंवार शेतकऱ्यांच्या हिताचा विचार करतात. अखेर आपल्या राज्याचा आपल्या माणसांचा विचार करता-करता पृथ्वीच्या कुशीत स्वतःला विलीन करतात. याही बाबी संभाजीराजे 'भुमिपुत्र' असल्याचे निर्देशित करतात. अशा विविध भुमिकांमुळे त्यांना अन्य विश्लेषण लावण्यापेक्षा 'भुमिपुत्र' हे अधिक संयुक्तिक वा योग्य वाटते.

### २.३२ काळजामध्ये जपावा असा राजपुत्र

अतिव भावनापूर्वक मनाने संभाजीराजांच्या जीवन कार्याशी नतमस्तक व्हावे असे त्यांचे कार्य आहे. मानवी जीवनाला विशिष्ट मूल्यांत्मक जीवनाची जोड देऊन मानवी जीवनाचा समर्थ अर्थबोध करून घेण्यासाठी आयुष्यभर कष्ट उपसले. रात्रं दिवस युध्दाशी मरणांतील यातना सोसल्या माणसाला-माणूस जोडला. त्यांची मने माणूसकीच्या अतिव प्रेमभावाने ओथंबून भरली. माणुसकीबरोबर सर्वधर्म समभाव या दृष्टीने समतेचा मळा फुलविला. ज्यांनी आपल्या आयुष्यात कष्ट आणि काटे पेरली त्यांनी त्यांच्या ही जीवनात सुख, आपुलकी आणि फुलांची पेरणी केली. हे करत असताना राजकीय हेतूंनी काही गोष्टी

कराव्या लागल्या यामागे त्यांचा नाईलाज होता. शेवटी याही गोष्टीने त्यांचे मन दुःखी झाले. त्यांच्या व्यक्तिमत्त्वातून सातत्याने मानवतावादाची छबी प्रतिबिंबित झाली.

सामान्य माणसाला आपलेसे मानणारा, शेतकऱ्यांच्या, स्त्रियांच्या आणि आप्त-स्वकियांच्या हितसंबंधांचा विचार करणारा 'राजा' म्हणून संभाजीराजांचे स्थान ऐतिहासिकदृष्ट्या खुप श्रेष्ठ दर्जाचे आहे. त्याचबरोबर सामान्यांच्या हितसंबंधांना जपणारा राजा म्हणून सामान्य माणसांनी काळजात जपलेला राजपुत्र हे स्थान अभेद्यपणे मानवजातीच्या अंतापर्यंत अखंड राहिल. शिवाजी महाराज संभाजीराजे यांनी भारतीय समाजाला सर्वक्षेत्रात सर्वक्षेत्रातील खुप-खुप भरभरून देण्याचा प्रयत्न केला. समाजानेही सर्व घेण्याचा प्रयत्न केलेला आहे. त्यांच्या कार्याबाबत नम्रताही आहे. त्या दोघांच्या त्यागाने महाराष्ट्राची भूमी सुजलाम सुफलाम झालेली आहे. प्रबोधित झालेली आहे. संभाजीराजे यांचे दोन्ही डोळे फुटले त्याचवेळी महाराष्ट्राचे डोळे उघडले. असे 'धनंजय किर' आपल्या 'कृतज्ञ मी' आत्मचरित्रात म्हणतात, ते असे "हल्लीच्या ललित लेखकांकडून शिवाजी-राजांवर आणि संभाजीराजांच्या संदर्भात मोठाच अन्याय होत आहे. ज्या शिवाजीला जिजाईने वाढविले त्याच जिजाईने संभाजीराजांनाही वाढविले. पण दुर्दैवाची गोष्ट ही वयाच्या सोळाव्या किंवा सतराव्या वर्षी तो बापाच्या विरूध्द मोगलांना जाऊन मिळाला. पण शेवटी संभाजीच्या जीवन कार्याचे वैशिष्ट्ये हे की, ज्या वेळी संभाजीराजांचे दोन्ही डोळे फुटले त्याच वेळी महाराष्ट्राचे दोन्ही डोळे उघडले."[३८]

महाराष्ट्र समाजाची सामाजिक- राजकीय शोकांतिकाकारांनी अगदी अचूक शब्दांत मांडण्याचा प्रयत्न केलेला आहे. महाराष्ट्र साहित्याचे विशेषतः ललित साहित्याने संभाजीराजे यांचे खरे स्वरूप दाखविण्याचा प्रयत्न केला नाही याची खंत वा शल्य त्यांना अस्वस्थ करतांना दिसते. धनंजय कीर म्हणतात त्याप्रमाणे महाराष्ट्र जनतेचे डोळे वैचारिकदृष्ट्या वा मानवतेच्या दृष्टीने पूर्णतः उघडलेले आहे असे म्हणता येत नाही. यासाठी आणखी किती संभाजीराजांसारख्या महामानवांना आपले प्राण गमवावे लागतील हे मात्र काळच सांगेल.

संभाजीराजांच्या स्वराज्यविषयक योगदानाचा विचार प्रस्तुत प्रकरणांत मांडलेला आहे. त्यांच्या जीवनातील राजकीय घडामोडी, चढ-उतार, संकटे आणि राजकीय डावपेच इत्यादी गोष्टींचा आढावा घेतला आहे. संभाजीराजांचे योगदान ज्या स्वरूपात समोर आले ते प्रामाणिकपणे नोंदविण्याचा प्रयत्न केलेला आहे. या प्रकरणांच्या मांडणीतून, संभाजीराजांच्या स्वराज्यविषयक योगदानाचा आढावा घेता, हाती आलेले निष्कर्ष पुढील प्रमाणे नोंदविता येतील.

१. कोणत्याही राज्यव्यवस्थेची उभारणी, त्या राज्यव्यवस्थेने स्वीकारलेल्या तत्वज्ञानावर आधारित असते. याचा विचार करता स्वराज्याच्या तत्वज्ञानामध्ये समता, मानवता, लोककल्याण स्वातंत्र्य आणि बंधुत्वावर आधारित न्यायव्यवस्था इत्यादी मूल्यविचारांवर आधारित होते.

२. संभाजीराजांनी स्वराज्याच्या राज्य कारभाराची व्यवस्था शिवाजी महाराजांच्या विचारधारेवर आधारितच ठेवली. महाराजांनी केलेले तह, करार आणि दिलेले शब्द जसेच्या तसे पाळले आणि शत्रूच्याही मनात स्वत:बद्दल वा स्वराज्याबद्दल विश्वास निर्माण केला.

३. शिवाजी महाराजांच्या मृत्यूसमयी म्हणजे इ.स. १६८० ला संभाजीराजांनी पन्हाळ्यावर राहून अत्यंत संयमाने स्वराज्याला संकटातून बाहेर काढले व परराज्यावर आपला वचक कायम ठेवला. राज्यपदाचा प्रश्न अत्यंत संयमाने हाताळला या गोष्टीला इतिहासात तोड नाही.

४. मंत्र्यांच्या स्वभावाबाबत भ्रष्ट कारभाराबाबत सातत्याने समज दिलेली आहे. शेवटी स्वराज्याच्या अस्तित्वाचा प्रश्न निर्माण झाल्यानंतर कठोर व्हावे लागले असे दिसते.

५. सावत्र आई 'राणी सोयराबाई' यांच्या महत्वाकांक्षेला संयमाने सामोरे गेले. हे असतांनाही राजारामबद्दलची आपली जबाबदारी व कर्तृत्व विसरले नाहीत. हे त्यांच्या व्यक्तिमत्वाचा महत्वाचा पैलू आहे.

६. परकीय सत्तेशी संबंध अथवा राजनीती ठरवित असताना सिद्दी असणाऱ्या राजकीय धोरणाचा विचार करता अरबांना बरोबर घेणे योग्य असले तरी गोव्याच्या पोर्तुगीजांना दुखविणे योग्य नव्हते. त्यामुळे आपल्याशी प्रामाणिकपणे हात मिळवणी करणाऱ्या मित्राला संभाजीराजे मुकले असे दिसते.

७. संभाजीराजांच्या राजनितिक नैतिकतेबाबत इंग्रज, पोर्तुगीज, डच, अरब यांना पूर्णतः खात्री होती. ते विश्वासू असल्याचा सातत्याने निर्वाळा देतात. या दृष्टीने अनेक संबंध त्यांनी महाराजांशी प्रस्थापित केले होते. सिद्धीने मात्र शिवाजी महाराज यांच्या काळापासून शत्रुत्व स्वीकारले. ते सांजी महाराजांच्या मृत्युनंतरही पुढे तसेच चालू राहिले. त्यांना मोडून काढण्यात संभाजीराजांनाही यश आले नाही.

८. औरंगजेबासारख्या महासम्राटाला संभाजीराजांनी आपल्या पराक्रमाने राजनैतिक डावपेचाने अस्वस्थ केले होते. शेवटी संभाजीराजांच्या अस्तासाठी स्वतः प्रतिज्ञा करावी लागली. हा नैतिकदृष्ट्या एवढा सम्राटचा पराभव म्हणावा लागेल. यातून संभाजीराजांचे राजा म्हणून असणारे मोठेपण सिद्ध होते.

९. स्वराज्य निर्मितीचा हेतू सर्वसामान्यांचे राज्यव्यवस्था आणि शेतकऱ्यांच्या जीवित्वाची हमी, स्वातंत्र्यांचा विचार वा लोक कल्याणकारी राज्याची निर्मिती असे होते.

१०. स्वराज्याच्या राजकीय प्रणालीचे सामाजिक दृष्टीकोनातील आजच्या काळात उपयोजन होणे गरजेचे आहे. यामुळे समाजाचा सर्वांगिण विकास साधण्याच्या दृष्टीने हिताचे होईल.

११. स्वराज्याला धर्मतत्त्वांशी वा वैदिक तत्वज्ञानाशी जोडणे सर्वथा अहिताचे असून यातून समाजाचे वर्णीय विभाजनच होईल. स्वराज्याच्या तत्त्वज्ञानासंबंधी कृषीश्रम संस्कृतीच्या शिवमहादेव यांच्या तत्त्वज्ञानाशी आहे. तो 'हरहर महादेव' या प्रेरणा स्मरणातून व्यक्त होतो हे ही लक्षात घ्यावे.

१२. भारतीय राष्ट्रीय एकात्मता साधण्याच्या दृष्टीने सामाजिक, सांस्कृतिक व राजकीय तत्वज्ञान म्हणून स्वराज्याच्या तत्त्वमूल्यांचा विचार झाल्यास सर्वेसर्वा समाजाची उन्नती होण्यास मदत होईल.

१३. समाजजीवनाशी एकरूप झालेले संभाजीराजे लोककल्याणकारक राज्याचे स्वप्न सत्यात आणण्याचा प्रयत्न आयुष्यभर करत होते. त्यांच्या राजसत्तेच्या केंद्रस्थानी शेतकरी-श्रमजीवी माणसे दिसतात. याचा विचार करता संभाजीराजे लोकोध्दारक भूमिपुत्र होते याची प्रचिती येते.

१४. सर्वांना आपलेसे करणारा सर्वांच्यावर जीव ओवाळून टाकणारा स्त्री-पुरूषांच्या, सर्वसामान्यांच्या हिताचे रक्षण करणारा राजा म्हणून संभाजी श्रेष्ठ वा महान होतेच. अशा राजपुत्राला आजही माणसे काळजात जपून ठेवतात. हा त्यांच्या चारित्र्याचा आणि कार्याचा गौरव आहे.

१५. संभाजीराजे यांच्या कार्यातून अन् समाज प्रबोधनातून महाराष्ट्र जनतेने आपले वैचारिक नेत्र प्रफुल्लित करावीत असेच कार्य त्यांचे आहे.

प्रस्तुत प्रकरणात स्वराज्याच्या रक्षणासाठी, उभारणीसाठी आणि विस्तारासाठी संभाजीराजांचे योगदान इत्यादी बाबींचा विस्तृत विचार चिकित्सात्मक स्वरूपात मांडण्याचा प्रयत्न केलेला आहे. पुढील प्रकरणात संभाजीराजांचा राज्यकारभार आणि मुत्सद्यांची कटकारस्थाने यांचा चिकित्सक, विश्लेषणात्मक अभ्यास करावयाचा आहे.

**संदर्भ सूची :**


१. दिवेकर, सदाशिव महादेव (संपा.), परमानंद स्वामीकृत शिवभारत, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे शके १८४९ पृ. ७८.

२. दिवेकर, सदाशिव महादेव (संपा.), परमानंद स्वामीकृत शिवभारत, कित्ता पृ. ८८

३. गोखले, कमल : शिवपुत्र संभाजी कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे २०१४ पृ. १९.

४. गोखले, कमलः शिवपुत्र संभाजी कित्ता पृ. १९.

५. होळकर, सरकारः पुस्तकमाला १४ वेः शिवकालीन पत्र सारसंग्रह त्रिशत सांवत्सारिक शिवस्मारक ग्रंथावली शके १८५१ पृ. ३२२

६. राजवाडे, वि.का. : मराठ्यांच्या इतिहासाची साधने (खंड-१८), भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे १९१४ पृ. ८०

७. Narrative Austin's : English Records on Shivaji (१६५९ to १६८२) Shivaji tercentenary memorial series, vol VI, Shiv charitrs Karyalana, Poona, १९३१, p. ७०.

८. राजवाडे, वि.का. (संपा.) शिवचरित्र साहित्य (मराठी) भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे १९२५ पृ. ४

९. राजवाडे, वि.का. (संपा.) शिवचरित्र साहितय कित्ता : पृ. ४

१०. Fryer John and Roe Thomas : Travels in India in the seventeenth century trubnet and co. London : १९७३, letter No.४, P. ३९६

११. होळकर, सरकार : शिवकालीन पत्रसार संग्रह, त्रिशत सांवत्सारिक शिवस्तारक ग्रंथावली पुणे शके १८५१ पत्र क्र. १७४३.

१२. होळकर, सरकार : शिवकालीन पत्रसारसंग्रह, कित्ता १७४६-१७५३

१३. गोखले, कमल : शिवपुत्र संभाजी उनि. पृ. १९

१४. होळकर, सरकार : शिवकालीन पत्रसार संग्रह, उनि. १९०९

१५. Joseph Orleans father Pierre (translation) : History of Shivaji and his Successor-Recent conqueroes in India Published in English Records on shivaji १९०७ no. १९८, p.१०४

१६. बेंद्रे, वा.सी. : श्री. छत्रपती संभाजी महाराज, पार्श्व पब्लिकेशन्स, कोल्हापुर २०१३ पृ. १५५

१७. होळकर, सरकारः शिवकालीन पत्रसारसंग्रह, उनि. पृ. २२६५

१८. पवार, जससिंगराव : छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ, मेहता पब्लिशिंग हाऊस, कोल्हापूर, १९९० परिशिष्ट क्र. ५ पत्र क्र. ६

१९. पवार, जयसिंगरावः छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ : कित्ता : पृ. २६७

२०. पवार, जयसिंगराव : छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथः परिशिष्ट ५, पत्र क्र. १०

२१. पवार, जयसिंगराव : छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथ कित्ताः पत्र क्र. १२.

२२. पवार, जयसिंगराव : छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथः कित्ता पत्र क्र. ७

२३. पवार, जयसिंगराव : छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथः कित्ता पत्र क्र. ८

२४. पवार, जयसिंगराव : छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथः कित्ता परिशिष्ट क्र. ५

२५. पवार, जयसिंगराव : छत्रपती संभाजी स्मारक ग्रंथः कित्ता पृ. २२९.

२६. कोलाश्कर, श.गो. जदुनाथ सरकारकृतः औरंगजेब डायमंड पब्लिकेशन्स, पुणे २००६ पृ. २९६.

२७. गोखले, कमलः शिवपुत्र संभाजी उनि. पृ. १२३

२८. होळकर, सरकार: शिवकालीन पत्रसार संग्रह, उनि. पत्र क्र. २२६३

२९. Father Pierre Joseph D' Orleans (translation) : rajapur tu Sut १०.६, १६८० No. ५०९, P. ३१३

३०. Father Pierre Joseph D' कित्ता : Rajapur to Bom २२.०६.१६८० Raja to Sur २६.०६.१६८० bom to Raja १५ ७.१६८०, P. ३२३

३१. गोखले, कमल: शिवपुत्र संभाजी उनि.: पृ. ११६

३२. Father Pierre Joseph D' : कित्ता : Bom to Sht १८.०८.१६८० Sur Vol-१०८ P.११६

३३. मोडक, ज.बा. (संपा.) : मराठी साम्राज्याची छोटी बखर (मराठी) काव्येतिहास संग्रह. भा.इ.सं.मंडळ पुणे क्रमांक २९ पृ. ५१

३४. ढेरे, रा.चिं. (संपा.) आज्ञापत्र पदमगंधा प्रकाशन, पुणे जुलै २०१४ पृ. २५

३५. Pissurlenkar, Pandurang : Portuguese- E Marathas-II Sambhaji Nava-Goa १९२८, P-२

३६. Pissurlenkar, Pandurang : Portuguese-E कित्ता P-२

३७. गोखले, कमल : शिवपुत्र संभाजी उनि. पृ. १६५

३८. कीर, धनंजय : 'कृतज्ञ मी कृतार्थ मी' पॉप्युलर प्रकाशन, मुंबई प्रथमावृत्ती १९८७ पृ. २३४.

*****

# प्रकरण तिसरे

# संभाजीराजे : प्रशासन व्यवस्था आणि मुत्सद्यांची कटकारस्थाने

---

**३.१ न्याय व्यवस्था आणि प्रशासन व्यवस्थेचे महत्त्व**

**३.२ संभाजीची राजमुद्रा : उन्नत समाजाचे स्वप्न**

**३.३ संभाजीराजांच्या प्रशासन व्यवस्थेबाबत : पूर्वग्रह**

३.३.१ मल्हार रामराव चिटणीस : बखर आणि प्रशासनावर भाष्य

३.३.२ सरदेसाई गो.स. व डॉ. सेन : संभाजीराजांविषयी मते

३.३.३ गरीब-संकटग्रस्त लोकांना दिलासा देणारी राज्यव्यवस्था - वा.सी.बेंद्रे

**३.४ शिवाजी महाराजांनुसार संभाजीराजांचे राजमंडळ**

**३.५ संभाजीचे अष्टप्रधान मंडळ व त्याची कामे**

३.५.१ पेशवा

३.५.२ मुजुमदार किंवा अमात्य

३.५.३ सचिव-चिटणीस

३.५.४ डबीर सुमंत

३.५.५ सरनोबत : सरसेनापती

३.५.६ पंडितराव किंवा दानाध्यक्ष

३.५.७ वाकनिस

३.५.८ मुख्य न्यायाधीश

३.५.९ छंदोगामात्य :कविकलश

**३.६ परशुराम चरित्रात कविकलशाचा विकृत उल्लेख**

**३.७ वारसा कलहाच्या दरम्यान कविकलशाचा राज्यकारभारात प्रवेश**

**३.८ कलशच्या नावाचा शिक्का**

**३.९ स्वराज्याच्या हिताला साजेसे कविकलशाचे पत्र**

**३.१० स्वराज्यात एकजुटीचा प्रयत्न : संभाजीराजे व कविकलश**

**३.११ कविकलशावर फितूरीचे आरोप**

**३.१२ कविकलश फितूर नव्हता : कमल गोखले**

**३.१३ मुलकी खाते**

३.१३.१ महल

३.१३.२ सुभा

३.१३.३ सरसुभेदार

**३.१४ राज्यव्यवस्थेसाठी राज्याची विभागणी**

**३.१५ शिस्तीच्या काही घटना**

**३.१६ देशमुखीचे महत्त्व**

**३.१७ आर्थिक व्यवस्था**

**३.१८ जमाबंदी काठीने**

**३.१९ उत्पन्नाच्या ३३ टक्के सारा**

**३.२० इतर उत्पन्न साधने**

**३.२१ आयात-निर्यातीवर कर**

**३.२२ परकियांच्या पकडलेल्या मालाबाबत संभाजीराजांचे धोरण**

**३.२३ गुलामांवरील कर**

**३.२४ खंडणी व चौथाई**

**३.२५ अंतर्गत कारभार**

**३.२६ प्रजाहितदक्षता**

**३.२७ शेतीच्या करात सवलत**

**३.२८ संभाजीराजांचे स्वराज्यनिष्ठ सेवक**

**३.२९ संभाजीराजांची न्यायव्यवस्था व कायदा**

३.२९.१ प्रांतिक न्यायपध्दती

३.२९.२ वतनाची खरेदी विक्री

**३.३० संभाजीराजांची सैनिकी व्यवस्था**

३.३०.१ स्वराज्यातील गडाची व्यवस्था : अमात्य

३.३०.२ संभाजीराजांच्या युद्ध आघाड्या

३.३०.३ संभाजीराजांची सैनिक अधिकारी व्यवस्था

३.३०.४ संभाजीराजांच्या काळातील सैन्यबळ

३.३०.५ नाविक दल

३.३०.६ संभाजीराजांच्या काळातील दारूगोळा व शस्त्रास्त्रे

**३.३१ संभाजीराजे : मुत्सद्यांची कट कारस्थाने**

**३.३२ जेधे शकावलीतील नोंद**

# प्रकरण तिसरे

# संभाजीराजे : प्रशासन व्यवस्था आणि मुत्सद्यांची कटकारस्थाने

स्वराज्याच्या केंद्रस्थानी लोककल्याणकारी राज्यव्यवस्था हा विचार असल्यामुळे प्रशासन व्यवस्थेमध्ये याच विचारांचे प्रतिबिंब पाहवयास मिळते. शिवाजी महाराजां-च्यापासून न्यायावर आधारित प्रशासन व्यवस्था चालविली जात होती. सामान्य जनतेच्या न्याय, हक्कांबाबत, संरक्षणाबाबत शिवाजी महाराज आणि त्यांच्यानंतर संभाजीराजे अत्यंत दक्ष असत. मंत्र्याने वा अधिकारी वर्गाने याबाबत हलगर्जीपणा केल्यास त्याला समज वा शासन केल्याची अनेक उदाहरणे उपलब्ध आहेत. यावरून त्या दोहोंची प्रशासनदक्षता स्पष्ट होण्यास मदत होते.

स्वराज्याचा राजा म्हणून राजाचा एक राजधर्म असतो. या राजधर्मानुसार राजाने प्रजारक्षण, धर्मरक्षण, चोख न्यायव्यवस्था, प्रजाहितदक्षता, प्रजेचे अभय, रयतेची तळमळ इत्यादी विविध कर्तव्ये राज्यधर्मात समाविष्ट असतात. प्रजारक्षणाबाबत 'संभाजीराजांचे स्वराज्य निर्मितीतील योगदान' या प्रकरणात विस्ताराने मांडणी केलेली आहे. प्रस्तुत प्रकरणामध्ये त्यांची प्रशासन व्यवस्था याबाबत सविस्तर विवेचन अभिप्रेत आहे. संभाजीराजांच्या राज्यकारभाराविषयी कमल गोखले, वा.सी.बेंद्रे आणि जयसिंगराव पवार इत्यादी अभ्यासकांचा अपवाद वगळता फारशी माहिती कोणी नोंदविलेली नाही. कागदपत्रांच्या आधारे माहिती नोंदविण्याचा प्रयत्न केल्यास संभाजीराजांच्या राज्यकार-भारावर अधिक प्रकाश टाकण्यासाठी उपयोग होईल. संभाजी राजांनी राज्यकारभाराकडे दुर्लक्ष केले, त्यांच्या कारकिर्दीत अनागोंदी माजून सर्वत्र विस्कळीत आणि मनमानी कारभार होता असा सर्वसामान्यांचा समज करून दिला.

संभाजीराजांची प्रशासन व्यवस्था कोणत्याही धर्मग्रंथानुसार पुरस्कृत नव्हती. धार्मिक न्याय निवाडे त्या-त्या धर्मग्रंथानुसार होत असत. प्रशासनातील कायदे स्वराज्यातील नीतीनुसार निर्माण करण्यात आलेले होते असे, असतांनाही स्वराज्याचे

प्रशासन हिंदू धर्मशास्त्रांनुसार होत असल्याचे खोडसाळ मत 'सदाशिव शिवदे' यांनी मांडले. उदाहरण म्हणून त्यांचे मत नोंदवितो. ते असे, "बहुत सायास करून राज्य निर्माण होणे गरजेचे आहे. शिवाजी राजांनी आपले शासन आपल्या जाणत्या सहकाऱ्यांकरवी नियमबद्ध केले. त्यासाठी शिवाजीराजांनी स्वराज्याच्या नियंत्रणासाठी मनु, याज्ञवल्क्य स्मृति, शुक्रादी नीतिग्रंथांतील राजनीतीचा अवलंब करून अष्टप्रधान ही संस्था बनविली. (महाराष्ट्र धर्म) तीच संस्था संभाजीराजांनी पुढे चालू ठेवली."[१] स्वराज्याची प्रशासन व्यवस्था मनुस्मृती, याज्ञवल्क्य इत्यादी धर्मशास्त्र ग्रंथाशी जोडण्याचा श्री शिवदेचा हेतू निराळाच आहे. विषमतावादी, समाज शोषणाचे नियम असणाऱ्या धर्मग्रंथांनुसार राज्यव्यवस्था चालत होती असे म्हणणे म्हणजे, स्वराज्यावर धर्मव्यवस्थेचा अंकुश निर्माण करण्याचा त्यांचा प्रयत्न आहे. यातून त्यांची वैदिक व्यवस्थेबद्दलची आस्था स्पष्ट होते. स्वराज्याच्या राज्यव्यवस्थेचा म. फुले, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, कर्मवीर भाऊराव पाटील, संत गाडगेबाबा यांच्याकडून गौरव झालेला आहे. हेही विसरता कामा नये. त्याचबरोबर परदेशातही लोककल्याणकारी व्यवस्था म्हणून गौरविण्यात येत असतांना ज्या ग्रंथांना नाकारण्यात आले त्याच ग्रंथांचा उल्लेख करण्यामागील त्यांचा शिवाजी महाराजांच्या विचारांना प्रक्षिप्त करण्याचा हेतू स्पष्ट होतो.

स्वराज्य अथवा इतिहासातील महान वारशांना प्रक्षिप्तपणाचे ग्रहण वैदिक व्यवस्थेच्या विचारवंताकडून सातत्याने लागलेले आहे. यामागे वर्णाभिमान आणि सत्ता आपल्या हातात ठेवण्यासाठीची धडपड यासाठी हा सर्रास प्रयत्न चालू असतो. पण भारतीय सामाजिक संस्कृतीचा महान वारसा छिन्न-विछिन्न होतो आहे. सत्यावर संस्कृतीकरणाची पुढे चढविली जाऊ नयेत.

### **३.१ न्याय व्यवस्था आणि प्रशासन व्यवस्थेचे महत्त्व**

समाज व्यवस्था सुनियंत्रित आणि उन्नत स्वरूपात घेऊन जाण्यासाठी प्रशासन व्यवस्था महत्त्वाची असते. समाजातील समूह आणि मानवी मूल्यांना प्रगती करण्यासाठी

प्रशासन व्यवस्थामूल्य महत्त्वाची असतात. जगभरातील समाज व्यवस्था कोणत्या ना कोणत्या राजकीय प्रशासन व्यवस्थेचा स्वीकार करत असते. मुघलांची प्रशासन व्यवस्था साम्राज्य विस्तारात प्राधान्य देणारी होती, तर स्वराज्यातील प्रशासन व्यवस्था लोक कल्याणावर आधारित आहे. यामुळेच महाराष्ट्राच्या समाज जीवनावर मानवतावादी, समाजवादी विचारांचा प्रभाव पडलेला आहे. यातून प्रशासनाचे मानवी जीवनातील महत्त्व स्पष्ट होते.

## ३.२ संभाजीची राजमुद्रा : उन्नत समाजाचे स्वप्न

शिवाजी महाराजाप्रमाणे संभाजी राजांचीही राजमुद्रा होती. राज्यकारभार हाती घेतल्यानंतर त्यांनी ती तयार केली. या राजमुद्रेवरील लेख पाहिल्यास त्यांचे स्वराज्याचे स्वप्न स्पष्ट होते. पिंपळपानी आकाराची १६ बुरजी होती. दि. ६ मे १६८० रोजी रूद्राप्पा देसाई, मुरगुड यास लिहिलेल्या पत्रावर त्यांची राजमुद्रा प्रथम आढळते. ती पुढीलप्रमाणे :[२]

श्री. शंभो : शिवजातस्य मुद्रा धौरिव राजते |

यंद्कसेविनी लेखा वर्तते कस्य नोपरि ||

**भाषांतर :**

संभाजीची ही मुद्रा सूर्यप्रथेप्रमाणे शोभते व ज्या मुद्रेचा आशय करणारी लेखासुद्धा कोणावर सत्ता चालविते, ती ही शिवाजीपुत्र, शंभूची-संभाजीची मुद्रा प्रकाशित होत आहे.

शिवाजी महाराजांच्या मुद्रेचे प्रतिबिंब याही मुद्रेवर स्पष्टपणाने पडलेले आहे. लोककल्याणाचा विचार स्पष्टपणे नोंदविला आहे. कोणत्याही धर्मनियमानुसार सत्ताप्रस्थापित करत असल्याचा उल्लेख नाही. हे ही आवर्जुन लक्षात घ्यावे लागेल. स्वराज्याला धर्मसत्तेशी जोडताना या गोष्टीचा विचार आग्रहाने होणे गरजेचे आहे.

## ३.३ संभाजीराजांच्या प्रशासन व्यवस्थेबाबत : पूर्वग्रह

संभाजीराजांच्या राज्यकारभाराबाबत विविध साधनांमध्ये मते व्यक्त करण्यात आलेली आहेत. खास करून त्यांच्या प्रशासनामध्ये अराजकता असल्याचीच मते

मांडण्यात आलेली आहेत. अशा पूर्वग्रह हेतूने मांडणी करण्यात आलेल्या मताचा आढावा प्रस्तुत ठिकाणी घ्यावयाचा आहे.

### ३.३.१ मल्हार रामराव चिटणीस : बखर आणि प्रशासनावर भाष्य

संभाजीराजांच्या प्रशासनावर समकालीन साधनांमध्ये मल्हार रामरावाची बखर सर्वात प्रथम भाष्य करते. या बखरीमध्ये नोंदविलेला वृत्तांत पुढील प्रमाणे, "दिवसेंदिवस कबजीचे स्वाधीन अधिकच होत चालले. इतबार मनसबा सर्व त्याचेच स्वाधीन कोणीही पुरातन राज्यातील इतबारी त्यांची प्रतिष्ठा ठेवावी अथवा मसलतीत घ्यावा हे गोष्ट राहिली. उग्रपणे शासन कोण्ही वर्णविचार न करिता शिरच्छेद करावा. ऐसे करीत चालले. कबजीचे सहवास त्याचे वाममार्ग कर्म तेणे करून फारच विचार राहिला नाही. माणूस मात्र फारच त्रास पावते जाले. सर्व प्रजेचीही क्षोभता जाली. न्यायाची सोत राहिली नाही. देवब्राह्मणांचे ठायीही निष्ठा राहिली नाही. असे आचरण धरिले एक कबजी सांगतील ते प्रमाण. दैवयोग करून होणार काल प्राप्त झाला... मातबर व बुदिधवंत व शूर होते ते हतवीर्य झाले. महाराजांनी नूतन पराक्रम करावा. नवे राज्यसाधन करावे. हे राहिले नाही. सुभेदार प्रांतातील वगैरे तसेच गड किल्ले यांचे कारभारी, यांजवरी हा कारभार खातो म्हणून मुगली करितांच त्याचा विचार न करिता त्यास आणावा, मारावा, नागवावा. अंतरच असलिया शिरच्छेद करावा. या भयेकरून मातबर चार होते ते कोण्ही जवळ बोलन पावन. त्यास आपलीच अबरू प्रतिष्ठा जतन होणे हेच येउन पडले. कबजीचे सांगणे मात्र प्रमाण. त्या नादे महाराज चालणार. त्यासच अनुमोदन देणे. मग विचार काय राहिला ? तमकरे घ्यावे. (लुच्चेगिरीने दुसऱ्याचे वित्त हरण करणे), घरे बुडवावी, नागवावे. माणुस राज्यात वाढेत ते काही परराज्यातून आणून वाढविले ऐसे घडत नाही."[३]

बखरीतील मांडणीचा विचार करता काही बाबी स्पष्ट होतात. याचे संक्षिप्त विवेचन जुन्या जाणत्या अधिकाऱ्यांना मानसन्मान राहिला नाही असे चिटणीस म्हणतात यात तथ्य नाही. सरसेनापती हंबीरराव मोहिते यासारख्या इतर अधिकाऱ्यांना पूर्वीसारखाच मान

सन्मान होता. याबाबतचे विवेचन अष्टप्रधान मंडळाच्या विवेचनात अधिक विस्ताराने येईल. आण्णाजी दत्तोला झालेल्या शासनाबाबत बखरकार म्हणतो. त्यांचा वर्णविचार होणे गरजेचे होते. म्हणजे ब्राह्मण वर्णातील व्यक्तिचा गुन्हा पाहू नये तर त्यांचा वर्ण पहावा आणि न्याय द्यावा. ही न्यायाची कोणती पद्धत आहे. यापेक्षा माणसाचा वर्ण न पाहता गुन्हा पाहून संभाजीराजांनी केलेली शिक्षा योग्यच आहे. कबजीच्या (कलश) यांच्या सहवासाने संभाजीराजे बिघडले असे बखरकार म्हणतो हे योग्य नाही. संभाजी राजांना आपल्या जबाबदारीची योग्य जाणीव होती. त्यांना स्वराज्याचे नेतृत्त्व करत असल्याचे भान होते. संभाजी राजपुत्र होते. त्यांना स्वतःची विचार क्षमता होती. या बाबी बखरकार दृष्टीआड करतात. मन मानेल त्याला शिक्षा करावी, त्यांचा शिरच्छेद करावा. असे शासन असल्याचे बखरकाराचे विधान धादान्त खोटे आहे. संभाजीराजे अत्यंत विवेकाने राज्यकारभार करत होते. बखर कारांनी नोंदविलेल्या बाबीचा विचार करता त्याला झालेले दुःख वर्णाभिमानाच्या अपमानाचे असल्याचे स्पष्ट आहे.

### ३.३.२ सरदेसाई गो.स. व डॉ. सेन : संभाजीराजांविषयी मते

इतिहास लेखनासाठी पुरेशी अस्सल साधने उपलब्ध नसल्यामुळे इतिहासकारांनी संभाजीराजांच्या राज्यकारभारावर बखरकारांच्याच मताची री ओढली आहे. या दृष्टीने गो.स. सरदेसाई आपल्या 'उग्र प्रवृत्ती संभाजी' या ग्रंथात म्हणतात "संभाजींचा राज्यकारभार मराठी राज्याला हितकारक नव्हता."[४] याच स्वरूपाचे आपले मत डॉ. सेन आपल्या 'Administrative system of the Marathas' या पुस्तकात नोंदविताना म्हणतात, "Sambhaji had subverted his father system of administration and he had no mind to improve it."[५] बखरकारांच्या नोंदीवरून मते बनविलेली असल्यामुळे सत्याच्या अधिक जवळ जाता आले नाही, असेच म्हणावे लागेल. यामुळे स्वराज्याच्या महान राजांच्या राज्यकारभाराला कारण नसताना दोष लावल्याचा अपराध झाला, असे म्हणावे लागेल.

ललित साहित्यामध्ये बखरीतील नोंदीचा आधार घेऊन कथानके, नाटके रचली. यामध्ये संभाजीराजांच्या राज्यकारभारावर आरोप करण्यात आले आहेत. 'राजसंन्यास' या नाटकात 'राम गणेश गडकरी' पुढील प्रमाणे म्हणतात, "पिढ्यान् पिढ्या पसरलेल्या पारतंत्र्याची अंधारी रात्र ओसरून नुकता कुठे मराठ्यांचा स्वातंत्र्यसूर्य उगवला नाही, तोच बेबंदशाहीने ग्रासले. या बेबंदशाहीत केव्हा काय घडेल याचा भरवसा राहिलेला नाही. "[६] स्वराज्याच्या शोकांतिका मांडणारे राम गणेश गडकरी बखरीतील नोंदीवर विसंबून संभाजीराजासारख्या न्यायप्रिय व राज्यव्यवस्थादक्ष राजाला दोष देतात. ही घटना साहित्याच्या क्षेत्रातील खूप मोठी शोकांतिका आहे.

### ३.३.३ गरीब-संकटग्रस्त लोकांना दिलासा देणारी राज्यव्यवस्था - वा.सी.बेंद्रे

पूर्व इतिहासकाराच्या मताचा विचार करता संभाजीराजांच्या न्यायव्यवस्थेचा, प्रशासन व्यवस्थेचा योग्य आढावा घेता आला नाही असेच म्हणावे लागेल. या पार्श्वभूमीवर वा.सी. बेंद्रे यांनी 'श्री. छत्रपती संभाजी महाराज' या ग्रंथात नोंदविलेले मत पुढीलप्रमाणे, "कारकून सुभे आदि नोकरांविरूद्ध तक्रारी करण्यास गरीबांपासून ते थेट श्रीमंतांपर्यंत सर्वांनाच मुभा होती व संभाजी राजांचा गरीब व संकटग्रस्त लोकांना आधार देणे हा एक विशेष होता. परगणे, सुभे यांचे हिशोब वगैरेंचे काम चोख करण्यास अधिकउणा खर्च लागला तर तोही दिला जात असे. संभाजीकालीन पत्रलेखनाचा, वाङ्मय ह्याचा विचार केला तर त्यातील भाषा अधिक प्रगल्भ झाल्याचे व त्यातील मजकुरात राष्ट्रीय बाण्याची व कार्यकर्तृत्वाची छाप अधिकाधिक पडत असल्याचे दिसून येते. शिवकालीन आण्णाजी दत्तो वगैरे मंडळींच्या विरूद्ध जशा सारख्या तक्रारी होत होत्या तशा त्याच लोकांनीही संभाजीराजांच्या कारकिर्दीतील मंत्री व कारकू न-एक प्रल्हाद निराजी बाबत खासगी तक्रार सोडली तर त्यांच्या विरूद्ध तक्रारी केलेल्या नाहीत. उलट या अधिकाऱ्यांच्या सडेतोड वागण्यामुळे परदेशियांना अधिक काळजी घेण्याची जरूर भासली

होती. सारांश संभाजी राजांचा अंतर्गत राज्यकारभार येसुबाईंच्याकरवी अनेक अडचणींतही योग्य प्रकारे चालत असल्याचे कागदपत्रांवरून दिसून येते."[७] संभाजीराजांच्या प्रशासन व्यवस्थेचे अचूक, योग्य आणि विश्लेषणात्मक नोंद बेंद्रे यांनी नोंदविलेली आहे. काही अंशी संभाजीराजांच्या प्रशासन व्यवस्थेवरील अन्याय दूर करण्याचा प्रयत्न झालेला दिसतो.

स्वराज्याच्या प्रशासनाच्या केंद्रस्थानी शिवाजी महाराज होते. ते सार्वभौम अधिकारी होते. ते न्यायाच्या आधारे राज्यकारभार चालवत असत. आपल्या राज्यकारभारासाठी तज्ज्ञांची व अधिकाऱ्यांची मते व मदत घेत असत. असाच परंपरात्मक राज्यकारभार व प्रशासक व्यवस्था काही अंशी बदल करून संभाजीराजांनी चालविला होता. संभाजीराजे शास्त्रांचे, न्यायविद्येचे, विद्वान जाणकार होते. तत्कालीन लोक न्यायाधिकाऱ्यांच्या न्यायापेक्षा संभाजीराजांच्या न्यायाची अपेक्षा करत असत यावरून त्यांची न्यायनिष्ठूरता स्पष्ट होते. त्यांनी आपल्या राज्यकारभारात अनेक खटल्याचे न्यायनिवाडे केले. याबाबत 'कमल गोखले' आपल्या 'शिवपुत्र संभाजी' या ग्रंथात म्हणतात, "संभाजी राजेही शासनाचे मध्यबिंदू होते. ते शास्त्राच्या आधाराने कायदेकानून करणारे, न्यायदानाचे प्रमुख आणि सेनाप्रमुख होते. ते ही विविध धर्माच्या प्रजेच्या स्वास्थ्याची आणि शौर्याची हमी देत असत."[८] प्रस्तुतचे मत पाहिले तरी संभाजीराजाच्या प्रशासनाची अचूक कल्पना येते. त्यांना प्रजेची असणारी आस्था त्यांच्या न्याय, प्रशासन व्यवस्थेतून स्पष्ट होते.

ता. ५ मे १६८० साली शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर पोर्तुगीज व्हॉइसरायशी केलेल्या पत्रव्यवहारात आपण राजा झाल्याचे जाहीर करून सत्ता हातात घेण्याचे प्रयत्न सुरू केले होते. राजकीयदृष्ट्या ही घटना योग्य होती. त्यांनी उचललेली पावले व्यापक राज्यकारभाराच्या दिशेने जाणारी होती. शिवाजी महाराजांप्रमाणे संभाजीराजे सत्तास्थानी सर्वेसर्वा होते. सर्व अधिकार आपल्याकडे घेतलेले असल्यामुळे अंमलबजावणी करण्याचा

प्रसंग त्यांच्या कारकिर्दीच्या पहिल्या दीड वर्षातच आला. "त्यांच्याविरूद्ध झालेल्या दोन कटामुळे मे १६८० च्या दुसऱ्या आठवड्यात रायगडावर काही लोकांना आणि मोरोपंत प्रधान, अण्णाजीपंत-सचिव आणि न्यायाधीश प्रल्हादपंत यांस कैद केले. परंतु चार महिन्यांनीच त्यांना मुक्त केलेले दिसते. "[९] संभाजीराजांची स्वतंत्र न्याय वृत्ती यातून दिसून येते. त्याचबरोबर संकटकाळी निर्णय घेण्याची क्षमता प्रचंड असल्याचा प्रत्यय येतो. १६८१ सालच्या जानेवारी महिन्यात संभाजीराजांचा राज्याभिषेक झाला. परंतु १६८१ च्या ऑगस्ट महिन्यात विषप्रयोगांच्या कटातील आवजी चिटणीस, सोमाजी दत्तो, हिरोजी फर्जंद आणि इतर वीस-पंचवीस लोकांना देहदंडाची शिक्षा दिली.

## ३.४ शिवाजी महाराजांनुसार संभाजीराजांचे राजमंडळ

संभाजीराजांचे अष्टप्रधान मंडळ होते. त्यातील नऊ व स्वतः 'राजा' म्हणजे संभाजीराजे होते ते पढीलप्रमाणे, " १) स्वारी राजश्री स्वामी २) स्वामी अष्टप्रधान ३) सुभे लष्कर ४) सरदेशमुखी (राजाचे खाजगी वतन) ५) किल्लेदार ६) हाशमराव ७) सुभे मामलेदार ८) वतनदार "[१०]

अशा स्वरूपात संभाजी राजांचे राजमंडळ होते. " राजाचे दरकदार हे पुष्कळ वेळा राजमंडळाचे मंत्री म्हणून काम करत. ते पुष्कळ वेळा निर्णय देण्यासाठी असलेल्या मजलीसमध्ये (A Court of assembly in general; a Royal Court) भाग घेत. मजलीसमध्ये राजमंडळातील इतर सभासद असत. " संभाजींच्या कारकीर्दीत राजमंडळाचा उल्लेख आढळतो.[११]

संभाजीराजांच्या राज्यमंडळातील उच्च अधिकाऱ्याची नियुक्ती स्वतः राजा करत असे. राजमंडळ हे 'कारभारी मंडळ' आणि 'न्यायमंडळ' अशा दुहेरी कक्षेत काम पाहत असे. राजमंडळातील राजांच्या मंत्र्यांना व दरकदार यांना राज्यात काढलेल्या हुकुमांवर तो बरोबर असल्याची अधिसूचना द्यावी लागे. यातून राजमंडळाचा अधिकार स्पष्ट होतो.

## ३.५ संभाजीचे अष्टप्रधान मंडळ व त्याची कामे

संभाजीराजांनी शिवाजी महाराजांची पूर्वीची अष्टप्रधानांची पध्दत पुढे चालू ठेवलेली होती. पण त्यातील मंत्री बदलण्यात आलेले होते. ती पुढे नमूद केल्याप्रमाणे होती :

### ३.५.१ पेशवा

शिवाजी महाराजांच्या अष्टप्रधान मंडळातील मोरोपंत पिंगळे हा पेशवा होता. संभाजी राजांना पकडण्याच्या कटात त्यांचा हात असल्यामुळे काही दिवसातच त्यांना पदावरून दूर करण्यात आले. मे-जूनमध्ये त्यांना कैद केले. ते रायगडी २९ सप्टेंबर ते १२ ऑक्टोबर १६८० च्या दरम्यान निधन पावले. यानंतर "दि. २८-८-१६८० च्या महाराजांच्या पत्रावर प्रल्हाद निराजीची मुद्रा आहे."[१२] त्यावरून त्यांचे कार्यक्षेत्र ज्ञात होत नाही. "मोरोपंताबरोबर त्याचा मुलगा निळो मोरेश्वरही कैदेत होता. दि. २९ सप्टेबर ते १२ ऑक्टोबर १६८० च्या दरम्यान निळोपंतांना मुक्त करून पेशवाई दिली."[१३] संभाजीराजांच्या कारकीर्दीत शेवटपर्यंत निळोपंत हाच पेशवा होता. इ.स. १६८१ पासून दि. ९.१२.१६८८ पर्यंतच्या काळात निळोपंत यांची सुमारे २०-२१ पत्रे उपलब्ध आहेत. महत्त्वाच्या कागदपत्रावर 'श्री शंभुभुज नोटकंठ मोरेश्वर सुत निलकंठ' असा त्याचा शिक्का आहे.

### ३.५.२ मुजुमदार किंवा अमात्य

अण्णाजी दत्तो अटकेत असताना संभाजी महाराजांच्या कारकीर्दीच्या सुरूवातीस रघुनाथ नारायण अमात्य होता. संभाजी राजांच्या दानपत्रावर (सन १६८०) ला रघुनाथ नारायण याचा अमात्य म्हणून शिक्का आहे. "अण्णाजी दत्तोला दि. २९ सप्टेंबर ते १२ ऑक्टोबर १६८० च्या दरम्यान अटकेतून मुक्त करून त्याला मुजुमदार केले." त्यानंतर दि. १२.१२.१६८० ते ९.१.१६८१ च्या दरम्यान रघुनाथ नारायण हणमंते यास चंदी येथे कैद केले."[१४]

या कैदीची सर्व सुत्रे अमात्य म्हणून अण्णाजी दत्तो यांच्याकडे होती. "अण्णाजी दत्तोकडे मुजुमदारीचा कारभार १६८१ च्या ऑगस्ट पर्यंत होता. विषप्रयोगाच्या कटात

त्यांचा हात होता म्हणून त्यांना मारले तेव्हा सारा कारभार खंडेराव पानसंबळ यांजकडे दिला होता."[१५] पुढे कैदेत असलेले रघुनाथ हणमंते १६८२ च्या डिसेंबर महिन्याच्या सुमारास मुक्त झाले. कर्नाटकातून येऊन संभाजीराजांना भेटले. जानेवारी १६८३ च्या सुमारास या उभयतांची भेट झाल्याची नोंद 'शिवचरित्र मुद्रीत' मध्ये नोंदविलेली आहे. ती पुढीलप्रमाणे, "कैदेत असलेल्या रघुनाथ नारायण हणमंते यांस १६८२ च्या डिसेंबर महिन्यापूर्वी केव्हा तरी मुक्त केले. त्यानंतर ते कर्नाटकातून येऊन संभाजीला भेटले. डिसेंबर १६८२ ते जानेवारी १६८३ या काळात (पौष १६०४) संभाजीराजे आणि त्यांची भेट झाली. त्यानंतर राजांनी रघुनाथ नारायण हणमंते यास मुजुमदार केले. मुजुमदार पद मिळाल्यापासून चार-पाच महिन्यातच म्हणजे दि. ४ मे १६८३ रोजी ते वलणी येथे मृत्यु पावले."[१६] रघुनाथ हणमंते यांच्या अकाली निधनानंतर हे पद त्यांच्या पुत्राला दिल्याची नोंद पुढील प्रमाणे उपलब्ध आहे ती अशी : "त्यांचा मुलगा नारायण रघुनाथ याला अमात्यपद दिले. दि. १९.९.१६८५ व दि. १६.३.१६८६ ची त्यांची दोन पत्रे उपलब्ध आहेत. रघुनाथ नारायणाचा दुसरा मुलगा तिमाजी याला कर्नाटकात मुजुमदार म्हणून नेमले होते."[१७] संभाजीराजांच्या काळात मुजुमदार वा अमात्य या पदाच्या नियुक्तीत झालेले बदल होते.

### ३.५.३ सचिव-चिटणीस

शिवाजी महाराजांच्या काळात हे पद अण्णाजी दत्तोकडे होते. पुढे ते संभाजी राजांच्या काळातही त्यांच्याकडे राहिले. संभाजीराजांना मारण्याच्या कटात त्याचा हात असल्याचे स्पष्ट झाल्यानंतर मे-जून १६८० मध्ये त्यांना अटक करण्यात आल्यानंतर काहीकाळ हे पद आबाजी सोनदेव यांच्याकडे देण्यात आले. या बाबतची नोंद 'The Indicial system of the Marathas' या रिपोर्ट मध्ये सापडते ती पुढीलप्रमाणे, "१६८० च्या ऑगस्ट महिन्यात राजांनी केलेल्या दानपत्रावर आबाजी सोनदेव यांचा सचिव म्हणून शिक्का आहे. आबाजी सोनदेव मरण पावल्यावर हे सचिवपद रामचंद्र निलकंठ भादणेकर यांना दिले. कुडाळपासून तुंगभद्रेपर्यंतचा प्रांत त्यांच्या ताब्यात होता. त्याने १६८३ मध्ये

पोर्तुगीजांशी पत्रव्यवहार केला होता. त्यांची पत्रे उपलब्ध आहेत."[१८] सुमारे १६८५ सालापर्यंत सचिवपद त्यांच्याकडे होते. मे १६८५ मध्ये ते शंकराजी नारायण गोंडेकर याला दिले. हे पद त्याच्याकडे संभाजीराजांच्या अखेरपर्यंत राहिले. "त्यांच्याकडे मावळ व उत्तर कोकण सुभा सोपविला होता. शंकराजीची चार पत्रे उपलबध आहेत."[१९] सचिव म्हणून नियुक्त होण्यापूर्वी शंकराजी नारायण संभाजी राजांच्या कारभारात अधिकारी असल्याची नोंद मिळते. संभाजीराजांनी माणसांची गुणवत्ता पाहून त्यांना वरच्या वा उच्चपदस्थ अधिकाराच्या जागा दिल्या.

### ३.५.४ डबीर सुमंत

शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेकाच्या वेळी जनार्दन नारायण हणमंते याची नियुक्ती सुमंत पदावर केलेली होती. त्याच्या मृत्यूपर्यंत म्हणजे दि. २७.०६.१६८३ पर्यंत ते या पदावर होते. त्यांच्याकडे महाराजांनी पन्हाळयाच्या सुभ्याची जबाबदारी दिलेली होती. त्यांचे दि. २८.७.१६८० रोजी सोम नाईकास लिहिलेले पत्र उपलब्ध आहे. संभाजीराजांनी रामसिंगाला लिहिलेल्या पत्रात जनार्दन पंडिताचा उल्लेख आहे. पुढे मात्र डबीरी वासुदेव जनार्दनकडे चालू राहिली असावी. त्यानंतर बाळकृष्ण वासुदेव याजकडे ती गेली. पुढे वासुदेव जनार्दन यांनी संभाजीराजाच्या पदरी नोकरी केली. अशी माहिती सातारच्या कागदपत्रात मिळते.

### ३.५.५ सरनोबत : सरसेनापती

हंबीरराव मोहिते हे शिवाजी महाराजांच्या वेळेपासून सेनापती होते. " संभाजींच्या कारकीर्दीत ते त्यांच्या मृत्युपर्यंत त्याच पदावर होते. एका साक्ष पत्रावर हंबीररावाचा शिक्का आहे. हा शिक्का असा : 'श्री मंछि व माहानुभाव सेनाधीश हंबीरराव'"[२०] हंबीरराव मोहिते युद्धकलेत तरबेज असून त्यांनी अनेक रणांगणे गाजवलेली होती. विशेषतः मुघलाच्या विरोधामध्ये उत्कृष्ट कामगिरी बजावली आहे.

दि. २० डिसेंबर १६८६ च्या सुमाराचे हंबीरराव मोहित्यांचे एक पत्र उपलब्ध आहे. या पत्रात कोल्हापूर पन्हाळा भागात झालेल्या मुघलांच्या हल्ल्याला केलेल्या प्रतिकाराचे

वर्णन आहे. यावरून शिवाजी महाराजांबरोबर कामगिरी केलेल्या लोकांचा युद्ध अनुभव उच्च दर्जाचा असल्याचा प्रत्यय येतो. १६८७ मध्ये मुघलांनी वाईपर्यंत धडक मारलेली होती. या आघाडीवर गोळा लागून हंबीरराव ठार झाले. त्यांच्या मृत्यूनंतर मालोजी घोरपडे सेनापती झाला. तो ही फेब्रुवारी १६८९ मध्ये झालेल्या लढाईत मरण पावला.

### ३.५.६ पंडितराव किंवा दानाध्यक्ष

१६७३ सालापासून मोरेश्वर पंडितरावाकडे दानाध्यक्षाची कामगिरी होती. संभाजीराजांच्या कारकीर्दीतसुद्धा हे पद त्यांच्याकडेच चालू होते. "१६८१-१६८६ सालातील त्यांची पंडितराव म्हणून ८-९ पत्रे उपलब्ध आहेत. "[२१]

अणुपुराणात केशव पंडित पंडितराव असल्याचा उल्लेख असून त्यांच्या कारकीर्दीतील पत्रे उपलब्ध होत नाहीत. लहानपणी यांनी संभाजीराजांच्या शिक्षणाची जबाबदारी पार पाडल्याची माहिती यापूर्वी घेतली आहे.

### ३.५.७ वाकनिस

शिवाजी महाराजांच्या कार्यकाळात दत्ताजी त्रिमल यांच्याकडे वाकनिसाचे काम होते. त्याच्या ताब्यात कर्नाटक होता. "वरघाट वाईपासून कोपल तुंगभद्रेपावितो देश नेमून दत्ताजी वाकनीस याचे स्वाधीन केला. त्याच्या मृत्यूनंतर त्याचा मुलगा रामचंद्र मुतालिक होता"[२२]

### ३.५.८ मुख्य न्यायाधीश

शिवाजी महाराजांच्या काळापासून प्रल्हाद निराजी हा न्यायाधीश होता. संभाजी राजांच्या कारकीर्दीत नोव्हेंबर १६८८ सालापर्यंत तोच न्यायाधीश होता. "१६८० च्या ऑगस्टमध्ये काही काळ तो मुख्य प्रधान असावा. त्यांच्या नावाची पत्रे उपलब्ध आहेत. त्याने इंग्रजांशी पत्रव्यवहार केला होता. "[२३]

न्यायदानाच्या बाबतीत सर्व अधिकार प्रल्हाद निराजीकडे होते. त्याने दिलेल्या निर्णयाची कविकलश अंमलबजावणी करत असत. त्यांचा शिक्काही उपलब्ध आहे तो असा.[२४]

लक्ष्मीनृसिंभ |क्तश्रीनीररायाब्धि|सन्मणेः ||

प्रल्हाद|वर्धिनी मुद्रा| प्रल्हादस्य | विजयते ||

### ३.५.९ छंदोगामात्य :कविकलश

संभाजीराजांच्या कारकीर्दीत छंदोगामात्य या पदाची निर्मिती झाली असे वाटत असले तरी हे सत्य नाही. शिवाजी महाराजांच्या राज्याभिषेक प्रसंगी हे पद असल्याची नोंद उपलब्ध होते. " उत्तरेस छंदोगामात्य प्रधान रघुनाथ पंडितराव सुवर्ण कलश मधुपूर्ण घेऊन उभे राहिले"[२५] असा स्पष्ट उल्लेख सापडतो. यावरून हे पद संभाजीराजे यांच्या काळातील नसून ते शिवाजी महाराजांच्या काळापासून असल्याचे स्पष्ट होते.

संभाजीराजांविषयी असंख्य लोक एकनिष्ठ होते. यामध्ये अशाच स्वरूपाची स्वामीनिष्ठा कविकलशाची होती. कविकलशाबाबत असंख्य गैरसमजूती लोकरूढ आहेत. काव्यातून, बखरीतून त्यांच्याविषयी गैरसमज पसरविण्यात आलेला दिसतो. कविकलशाला कलुशाकबजी व बजीबाबा असाही उल्लेख करत असत. कलीया अवतार म्हणून त्याला स्वराज्यबुडव्या असेही संबोधले आहे. काही जुन्या इतिहास अभ्यासकाचा रोख तो औरंगजेबाकडून स्वराज्य बुडविण्यासाठी पाठविण्यात आला होता. या विषयीची माहिती मल्हार रामराव चिटणीस यांच्या बखरीत पुढीलप्रमाणे येते ती अशी : "कवि कलुषा कबजी म्हणोन ब्राह्मण बहुत विद्वान, मंत्रशास्त्र विद्या आगम त्यास बहुत गम्य असे होते. त्यांची स्त्रीही चतुर होती. त्यांनी महाराज वश करावे म्हणून वशीकरण मंत्रप्रयोग करून महाराजांची बहुत जवळीक व कृपा संपादून अगोदर समीप सन्याभिषिकापूर्वी होतेय. वशीकरण मार्गाविशी अनुष्ठाने प्रयोगसंपत्ती करणे व राज्यवृद्धी होणे, यश येणे असे

समजावून प्रयोग अनुष्ठान करविले. पुढे दिवसेंदिवस बुध्दीस भ्रंश पडून त्या मार्गात अनुसरावे असे केले. रेडे मारून त्यांचे ओले कातड्यावर अनुष्ठाने व मद्यमांस पशुवधाची बहुत करू लागले. ब्राह्मणापासून प्रयोग करविणे यांत महाराजांचे अंतःकरण बहुत व्याप्त जाहले. कोणी हे करणे युक्त नव्हे असे बहुत सांगून कळविले असता त्यातच दरबार मना करून कैद करावे, असे होऊ लागले"[२६] या बखरीप्रमाणे इतर बखरीमध्ये, काव्यामध्ये आणि नाटकामध्येही कविकलशाबाबत असेच लिहिण्यात आले. कविकलशाने संभाजीराजांना व्यसनाच्या आणि 'तुळसा' या स्त्रीच्या नादी लावणारा खलनायक यादृष्टीने त्यांना रंगविण्यात आले. इतकेच नाही तर रॉबर्ट ऑर्म सारखा समकालीन लेखक सुद्धा कविकलशाने फितुरी केली असा आरोप करतात. यावरून कलशाला बदनाम केल्याचे स्पष्ट होते.

## ३.६ परशुराम चरित्रात कविकलशाचा विकृत उल्लेख

परशुराम चरित्रात कविकलश यांचा विकृत स्वरूपाचा उल्लेख करण्यात आलेला आहे तो असा :

"पाछा पासोनी मंत्रशास्त्री कबजी आला नृपा आश्रये |
संभाजीवर मोहोमंत्र पडता दुर्बुद्धी झाला वस्ये |
मंत्री मुख्य करूनि तोचि कबजी होणार इच्छा हरी|"[२७]

आश्रयास आलेला कविकलश लाचार वा गुलाम नव्हता अथवा तो कोणास कपटाने फसवीतही नव्हता. त्यांच्याकडे गुणवत्ता, न्यायवृत्ती, स्वामिनिष्ठा होती. या बाबी विचारात घेतल्यास कविचे मत विपर्यस्त असल्याचे स्पष्ट होते. आतापर्यंत निर्माण करण्यात आलेल्या कविकलशांच्या वर्णनापेक्षा त्याचे व्यक्तिमत्व वेगळ्या स्वरूपाचे असल्याचा प्रत्यय तत्कालीन कागदपत्रे पाहिल्यानंतर स्पष्ट होते. संभाजीराजांच्या राज्यकारभारापासून तो आलेला नसून त्यापूर्वी म्हणजे संभाजीराजे लहान असल्यापासून त्यांचा संबंध संभाजीराजांच्या जीवनाशी आहे. आग्रा भेटीतून परतीच्या प्रवासाचे एक वर्णन

उपलब्ध आहे. शिवाजी महाराज आगऱ्याहून सुटून आले तेव्हा त्यांनी कविकलश नावाच्या भोसल्यांच्या कुलोपाध्यायास काही पैसे व रत्ने देऊन संभाजी याला बनारस येथे त्याच्या स्वाधीन केले. महाराजांनी त्यास सांगितले की, "मी सुखरूप पोहचल्याचे तुला पत्र लिहिले की सांगितलेल्या मार्गाने त्याला परत आणावे"[२८] असे खाफीखान नोंदवितो. खाफीखानाची माहिती विश्वसनीय असल्यास संभाजीराजाचा कविकलशाबरोबरचा संबंध लहानपणापासून असल्याचे स्पष्ट होते. संभाजीराजे आणि कविकलश याचा संबंध केव्हा आला याबाबत कागदोपत्री पुरावा उपलब्ध नाही. पण संभाजी राजे गादीवर बसल्यानंतर अधिक संबंधाची माहिती मिळते.

### ३.७ वारसा कलहाच्या दरम्यान कविकलशाचा राज्यकारभारात प्रवेश

इ.स. १६८० च्या दरम्यान शिवाजी महाराजांचा मृत्यू झाला. यानंतर अष्टप्रधान मंडळात दोन गट पडले. सोयराबाई यांच्या पक्षाचे काही मंत्री होते तर संभाजीराजे यांच्या बाजूचे काही मंत्री. अशा नाजूक परिस्थितीच्या वेळी जवळचा, विश्वासू कुणीतरी असावा असे मानसिकदृष्ट्या वाटत असते. यादृष्टीने कविकलशावर संभाजीराजांचा विश्वास बसला. यातून त्यांचा राजकारणात प्रवेश झाला. 'अजितादेय' नामक संस्कृत ग्रंथाप्रमाणे संभाजीराजे आणि कविकलश यांचा संबंध औरंगजेबाचा मुलगा सुलतान अकबर हा आश्रयास येण्यापूर्वी व नंतर यांचा संबंध आला असावा. साधारण मे-जून १६८१ च्या दरम्यान अशी एक शक्यता वाटते. पण याबाबतचे पुरावे उपलब्ध होत नाही.

कविकलशाचा राज्यकारभारातील प्रवेश १६८१ च्या ऑगस्ट-सप्टेबर महिन्यामध्ये झालेला आहे. संभाजीराजांनी कविकलशाला विश्वासात घेऊन त्यांच्या सल्ल्यानुसार काही राजकीय निर्णय घेतले होते. स्वतःच्या विरूद्ध झालेल्या विषप्रयोगाच्या कटाचा निर्णय कविकलशाच्या सांगण्यावरून घेतला असून अण्णाजी दत्तो सचिव यांना शिक्षा दिली. या संबंधीची नोंद 'शिवचरित्र प्रदीप' मध्ये आलेली आहे ती अशी : "१६८१ च्या ऑगस्ट-सप्टेबरपासून संभाजीने कलशाला विश्वासात घेऊन त्याच्या सल्ल्यानुसार काही राजकीय

निर्णय घेतले होते. स्वत:विरूद्ध झालेल्या विषप्रयोगाच्या कटानंतर संभाजी राजांनी कविकलशाच्या बोले (सांगण्यावरून) मागती अण्णाजी दत्तो सचिव याजवर इतराजी करून मार लिहा. त्या माराने राजश्री अण्णाजी पंत व बाळ प्रभु व सोमाजी दत्तो व हिरोजी फर्जन परळी खाले कैद करून मारिले"[२९] जेधे शतकावलीतील आणि मराठी साधनातील पहिला हाच उल्लेख आहे. यापूर्वीचा उल्लेख उपलब्ध होत नाही.

### ३.८ कलशच्या नावाचा शिक्का

अष्टप्रधान मंडळाच्या नियुक्तीच्या दरम्यान कविकलशाकडे काही कामे सोपविली होती. संभाजीराजे व रामसिंग यांनी औरंगजेबाची सत्ता उलथून टाकण्याचा एक कट रचला होता. तेव्हा रामसिंगाला लिहिलेल्या पत्रात कविकलशाचा उल्लेख संभाजी राजांनी केलेला (१६८२) आढळतो. "१६८३ च्या डिसेंबर महिन्यात कलशास 'कारभाराचे अध्यक्ष' किंवा 'कुलयेख्तीयार' म्हणून निमलेले दिसते. "[३०] हाअधिकार पोर्तुगीजांशी तह करण्यासाठी दिलेला दिसतो. कलशांच्या नावाचा शिक्का दि. २३.३.१६८५ च्या पत्रात प्रथम आढळतो. तो शिक्का असा आहे.[३१]

विधिरार्थिमनीषाणामवधिर्नयवर्त्मनां

शेवधि:कार्यसिध्दीनां मुद्रा कलशहस्तगा

**भाषांतर :**

म्हणजेच सर्व याचक लोकांची इच्छा पूर्ण करणारी, राज्यव्यवहाराचे नियंत्रण करणारी आणि कार्यसिध्दीचा निधी असलेली अशी मुद्राकलशाच्या हातात आहे.

### ३.९ स्वराज्याच्या हिताला साजेसे कविकलशाचे पत्र

कविकलशाचा राज्यव्यवहारातील वावर आणि न्याय, विवेकी विचार पद्धती महत्त्वपूर्ण होती. यादृष्टीने त्याचे न्यायनिवाड्याचे एक पत्र उपलब्ध असून त्या पत्राचा

आशय स्वराज्याच्या हिताच्या दृष्टीने आणि लोककल्याणाच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे. ते पत्र पुढीलप्रमाणे,

"सोमनायक नरनायक हा सैतवडे येथे देशमुख होता. सोमाजीने सरकारी वसुलाची अफरातफर केली आहे. अशी तक्रार संभाजी महाराजांच्या कानावर घालण्यात आली. कविकलशाने या गोष्टीची शहानिशा करून सोमाजीस लिहिले की, 'तुझ्याकडे चोरीमारीचे लिगाड नाही कोणे गोष्टीचा चिंता न करता आपले गावात येऊन राहणे"[३२] या वरून कविकलश यांचे स्वराज्यावरती असणारे लक्ष स्पष्ट होते. त्यांच्या न्यायवृत्तीचा प्रत्यय यातून येताना दिसतो.

### ३.१० स्वराज्यात एकजुटीचा प्रयत्न : संभाजीराजे व कविकलश

संभाजीराजे व कविकलश स्वराज्यामध्ये एकजुटीचे व लोकांची मने वळविण्यासाठी सातत्याने प्रयत्न करत असल्याचे जाणवते. इ.स. १६८३ साली संभाजी राजांनी बकाजी नावडकर यास कानखोऱ्याच्या देशमुखाकडे काही मुद्यांची चर्चा करण्यासाठी पाठविले होते. काही गोष्टी देशमुखांच्या मनासारख्या न झाल्यामुळे ते नाराज झाले होते. म्हणून कलशाने छत्रपतींना विनंती करून त्यांना राजांच्या भेटीस बोलाविले होते. दि. ३.८.१६८४ रोजी कलशाने देशमुखाला लिहिले की, "...त्यावरून आम्ही रा.छत्रपतीस्वामींस विनंती करून तुम्हास भेटीस यावयाची आज्ञा केली आहे. येणे मदा मनास आणून तद्नुसार पारपत्य करून देऊ. या प्रसंगी अवघे वतनदार एकमते राहोन गनिमास सजा द्यावी. आपली सरफराजी करून द्यावी."[३३] स्वराज्याच्या दृष्टीने व ऐतिहासिक दृष्ट्या कविकलशाला समजून घ्यावयाच्या दृष्टीने हे पत्र फार महत्त्वाचे आहे. कलशांना स्वराज्याच्या एकजुटीचे महत्त्व समजलेले होते. त्यादृष्टीने ते वतनदारांना एकत्र करून शत्रूला रोखण्याचा विचार करतात. यासाठी नाराज झालेल्या वतनदाराचे मन

वळविण्याचा प्रयत्न करतात. यावरून कविकलश औरंगजेबाचा हस्तक असल्याची कोणतीही गोष्ट स्पष्ट होण्यास जागा नाही, असे दिसते.

कविकलश पंतप्रधान किंवा न्यायाधीशाने दिलेल्या हुकुमाचे अंमलबजावणी आपल्या प्रांतातील अधिकाऱ्याकडून करवून घेत असे. या दृष्टीने त्यांच्याकडे राजापूरच्या प्रांतातील रागदे प्रभू व चांद प्रभू, देशमुख याचे वारसदार गोविंद प्रभू यांच्याकडील देशमुखीचा वाद निवाड्यासाठी न्यायाधीशाकडे आलेला होता. त्या वादाचा निकाल लागल्यानंतर त्यांच्या अंमलबजावणीसाठी कविकलशाने अधिकाऱ्यांना सूचना दिल्याची माहिती उपलब्ध होते.

वरील बाबींचा विचार करता कविकलश पंतप्रधान वा न्यायाधीश नसून न्यायाची वा निकालांची अंमलबजावणी करत असे. त्यांची अंमलबजावणी काटेकोरपणे असे.

### ३.११ कविकलशावर फितूरीचे आरोप

कविकलशावर फितूरीचे आरोप शेवटी-शेवटी खूप झाले. यामुळे त्यांच्या जीवनावर, कारकीर्दीवर वाईट परिणाम सुद्धा झाला. याचे वर्णन 'ईश्वरदास नागरने' आपल्या 'फुतहाने आलगिरी' या ग्रंथात फितुरीसंबंधी वर्णन केले आहे ते असे, "कविकलश हा संभाजीचा मंत्री होता. राज्यव्यवस्था उत्तम ठेवणे आणि किल्यांची निगा राखणे इ. कामे तो झटून करित असल्यामुळे संभाजीची त्याच्यावर कमालीची मर्जी बसली होती. संभाजीच्या कारभारापैकी काहींना कवि कलशाच्या उत्कर्षासंबंधी मत्सर वाटला. त्याला त्याच्या हुद्यावरून खाली आणावे आणि त्याच्या जागी दुसऱ्याची स्थापना करावी असे त्यांनी ठरविले. या उद्देशाने ते रात्रंदिवस त्याच्या मागे लागले. त्याच्या चांगल्या कामाचाही विपर्यास करून त्यांनी त्याला बदनाम केले. शेवटी त्यांनी त्याला हुद्यावरून खाली ओढले. कवि कलश हा फजीत पावून खेळण्याच्या किल्ल्यात जाऊन बसला. "[३४] या विवेचनात ऐतिहासिक दृष्ट्या सत्यता आहे. मराठा सरदारांना कविकलशाचा मत्सर

वाटण्याला प्रगतिच्या दृष्टीने विविध कारणे होती. त्यांचा हा मत्सर मराठी स्वराज्याच्या दृष्टीने हानीकारक होता. याचा परिणाम स्वराज्यावर होताना आपणास जाणवतो.

कविकलशाच्या बाबत ईश्वरदास नागरने नोंदविलेले पुढील मत ऐतिहासिकदृष्ट्या सत्याला धरून नाही. ते कविकलशाचा मत्सर करणारे आहे ते असे : "कविकलशाचे खोळण्याच्या आश्रयाने जाऊन बसणेही त्याच्या विरोधकांना आवडले नाही. त्याचा सर्वनाश करावा म्हणून ते झटू लागले. खेळण्याच्या किल्यातही आपल्याला सुरक्षितता नाही असे कवि कलशाला वाटू लागले. संभाजीचे काही सरदार संभाजीवर चिडले होते. कविकलश आणि वरील सरदार सेवेत हजर झाले. बादशहाकडून त्यांचा योग्य तो मानसन्मान करण्यात येऊन त्यांना मन्सबी देण्यात आल्या. ...कविकलश आणि त्याच्याबरोबर गेलेले सरदार यांचे बादशहापाशी अर्जित होत असलेले पाहून संभाजीचे इतर सरदारही बादशहाच्या सेवेत हजर होऊन त्याची चाकरी करू लागले."[३५] कविकलशाच्या बाबतीत सरदाराचे वर्तन दुराग्रही आणि मत्सराने भरलेले दिसते. त्यांच्याबाबत संभाजीराजांचेही मत दुषित करण्याचा प्रयत्न केला.

मुघलांना मिळालेल्या कलशाला संभाजीराजांनी पत्र लिहून बोलावून घेतले. नंतर त्यांनी संभाजीराजांकडे येऊन, राजांना मुघलाच्या हाती पकडून दिले. हे मत ईश्वरदास नागर मांडतात ते ऐतिहासिक सत्यावर टिकणार नाही.

### ३.१२ कविकलश फितूर नव्हता : कमल गोखले

कमल गोखले यांनी नोंदविलेला कविकलशाबाबतचा अभिप्राय योग्य आणि ऐतिहासिक सत्यावर आधारित आहे. ते म्हणतात, "१६८८ सालापासून तो कवि कलशाने संभाजी राजांप्रमाणेच हालहाल होऊन शेवट होईपर्यंतची हकीकत नुसार, त्यातही कोठेच कलशाचे गैरवर्तन किंवा फितुरी दिसत नाही. राजारामच्या काळात कविकलशाच्या बायकोचे व मुलांचे खूप हाल झाले. शेवटी कंटाळून ही मंडळी मारवाडात निघून गेली.

अशा तऱ्हेने संभाजीशी आठ-नऊ वर्षे एकनिष्ठ राहिलेल्या कलशाचा व त्यांच्या कुटुंबियांचा शेवट झाला."[३६] कमल गोखल्यांचा भावसंपन्न निष्कर्ष मराठा इतिहासातील काळाकुट्ट वास्तव नोंदवितांना दिसतो. प्रगतिच्या इर्षेने अंध झालेल्या माणसाची विचार क्षमता नाहीशी होते. याचे उत्तम उदाहरण आहे.

## ३.१३ मुलकी खाते

### ३.१३.१ महाल

महल हा सर्वात लहान राजकीय विभाग होय. हे विविध देशमुखांच्या परगण्यावर ठरविलेले असत. त्यामुळे परगणे व महाल यांची नावे एकच असतात. "परगण्याप्रमाणे महाल लहान-मोठे असत. 'हवालदार' हा महालावरचा अधिकारी असे. दिवाणी मुजूमदार हवालदार व कारकून-मुजूमदार या जोड नावाने व्यवहार केला जात असे. " राजकीय उलाढाली यावर लक्ष ठेवणे "महालाच्या व्यवस्थेकरिता हवालदाराच्या हाताखाली शिपायांची तुकडी असे. या तुकडीचे अंमलदार नाइकवाडी या नावाने ओळखली जात. "[३७] गाव वतनदार व परगने वतनदार याच्या कामावर देखरेख ठेवण्यासाठी हवालदार असे.

### ३.१३.२ सुभा

अनेक हवालदार व परगणे वतनदार यावरील सुभेदार हा वरिष्ठ अंमलदार होय. याची कचेरी तो सुभा. सुभेदार म्हणजे देशाधिकारी. सुभेदाराला मुजुमदार, निधावन असून त्यांच्याजवळ शिबंदीही असे. त्यास चिटणीस, दस्तरदार, पोतनीस, सभासद वगैरे हिशोबी कामाकरिता कारकून असत. "सुभेदार व कारकून किंवा देशाधिकारी व देशलेखक सुभेदार व देशाधिकारी हाच मुख्य व त्यासच संभाजीराजाच्या काळात अनेक पत्रे लिहिलेली आढळतात."[३८] संभाजी राजे सुभेदार वारंवार बदलीत असे सुभेदाराने हलगर्जीपणा केल्यास त्याला जरबेचे पत्र पाठविले जात असे.

### ३.१३.३ सरसुभेदार

सुभेदाराच्या वरचा अधिकारी सरसुभेदार आणि त्यांचा देशी प्रतिशब्द 'मुख्य देशाधिकारी' या सुभेदारांच्या जोडीला 'कारकून' असे. ही सर सुभेदारी दर्शविण्यासाठी 'महालनिहाय' अनेक परगणे सूचित करत. मुख्य देशाधिकारी व देशलेखक या नावाने पत्रव्यवहार चाले. पुण्याचा नागोजी बल्लाळ, दामाजी रघुनाथ, कुडाळचा धर्माजी नागनाथ, येऊलचा तुळजोजी गे, कऱ्हाडचा वेकाजी रूद्र असे पाच सुभेदार होते.

## ३.१४ राज्यव्यवस्थेसाठी राज्याची विभागणी

राज्याच्या व्यवस्थेसाठी पूर्वी प्रमाणे राज्याची व्यवस्था असताना दिसते. ती संभाजी महाराजांच्या काळात चालू होती. दाभोळ, कोपल, कुडाळ, कल्याण, इंद्रापूर, सुपे, माडुली, सातारा, वाई, कऱ्हाड, मलकापूर, राजापूर, पुणे, मावळ इत्यादी प्रांतामध्ये केलेले दिसून येते. यांच्यातील पत्रव्यवहार पुढीलप्रमाणे चाले.

१. महाराज व सुभेदार
२. मुख्य देशाधिकारी व सुभेदार
३. अष्टप्रधान व सुभेदार

यावरून संभाजीराजांचे स्वराज्यावर बारीक लक्ष असल्याचे स्पष्ट होते. त्याचप्रमाणे अन्य अधिकारीही स्वतः बारकाईने स्वराज्यात लक्ष घालत असत इत्यादी बाबी स्पष्ट होतात. संभाजीराजांना स्वराज्याबाबत पुढील बाबी खपत नसत.

१. राज्यातील गैरकारभार खपत नसे.
२. अफरातफर केलेली खपत नसे.
३. कोणावरही अन्याय झालेला चालत नसे.

इत्यादी बाबींचा संभाजीराजांच्या पत्र व्यवहारावरून बोध होतो. अष्टप्रधान मंडळ व संभाजीराजे जनतेची निवेदने, सूचना ऐकून घेत आणि त्यावर कारवाई, अंमलबजावणी करत.

## ३.१५ शिस्तीच्या काही घटना

राज्यात गैरवर्तन करणाऱ्यास संभाजीराजे शासन करत असत. पुढील उदाहरणावरून बोध होतो. "१६८१ च्या सुमारास परगणे शिराळे येथील तुलाजी देसाई निकम याच्याकडे देशमुखीच्या बिलासी तर्फेचा बारा गावांचा भोगवाटा चालत असता सोमाजी बांदल याने बळेच वारणेचे देशमुखीकडे ते कामाविशीस लावले होते. १६८१ साली मे-जुनच्या सुमारास संभाजी महाराज पन्हाळ्याहून शिराळेच्या बाजुस गेले होते. त्यावेळी तुलाजी देसायाने त्याच्यावर झालेल्या अन्यायाचे वर्तमान राजांना विदित केले. तेव्हा त्यांनी वारणेचे देशमुखीकडे ओळत असलेले बारा गाव शिराळेकडे लावून देशमुखीचा कारभार तुलाजीच्या हातून भोगवट्याप्रमाणे घेत जावा. म्हणून कृष्णाजी भास्कर या सुभेदारास आज्ञा केली. संभाजी बांदल याने हरामखोरी केली म्हणून स्वामींनी त्याला शिक्षा केली. खंडेराव पानसंबळ यांनी तुलाजी कडूला कमविशेस पाठविले होते. तो त्या बारा गावासंबंधी भांडत राहिला. त्यासंबंधी स्वामींना पारपत्य करावे म्हणून तुलाजी देसायाने त्यांना कित्येक तपशिलाच्या गोष्टी सांगितल्या. तेव्हा महाराजांनी दि. १२.६.१६८१ रोजी मलकापूरच्या राजश्री बापूजी त्रिंबक देशाधिकारी व लेखक यास राजाज्ञा देऊन कळविले की, तुलाजी कडू यासी कथला करावया काय गरज या उपरी रोखा देखताच बिलासी तर्फेचे बारा गावीचे देशमुखी तुलाजी निकम देशमुखीचा कारभार याचे हाते (घेत जाणे) दिरंग व उजून न करणे. सदरहू बारा गाव बिलासी तर्फेच सिरालियाखाले दिधले आहे ती तरी प||म|| कडे बारा गाव देऊन तेथील देशमुखीचे कार्ये तुलजी निकम देशमुख याचे हाते घेत जाणे उजूर न करणे"[३९] या पत्रावरून गैरकारभार गोष्टी घडल्या असल्यास संभाजी राजे त्यांची कसून चौकशी करत व सदरचा अन्याय दूर करण्याचा प्रयत्न करत असत. याचा प्रत्यय येतो. अशी खूप उदाहरणे संभाजी राजांच्या राज्यकारभाराची आहेत.

### ३.१६ देशमुखीचे महत्त्व

रयतेचा विश्वास देशमुखांच्यावर असतो. हे संभाजी राजांनी जाणले होते. म्हणून त्यांनी देशमुखाशी सलोख्याचे घेतले होते. त्यांच्याशी चांगले संबंध ठेवले होते. मुघलांच्या आक्रमणांच्या संकटात आणि राज्यात निर्माण झालेल्या अंतर्गत संघर्षादरम्यान देशमुखांना सांभाळण्याचा प्रयत्न केला. या दृष्टीने 'मराठ्यांच्या इतिहासाची साधने' या ग्रंथातील एक उदाहरण पुढीलप्रमाणे, " दि. २१.११.१६८५ रोजी वाईचा देशाधिकारी अंताजी सबदेव यास जो तहव करणे तो देशमुखाच्या मताने करीत जावे. गैरफायद्याची गोष्ट करू नये म्हणून लिहिले होते. देशमुखांना नावज करावयाचे नसले तरी त्याचबरोबर शेतीचे कोणत्याही प्रकारे नुकसान होऊ नये म्हणून संभाजीराजे काळजी घेताना दिसतात."[४०]

देशमुखांना सहकारी सांभाळताना शेतकरी व जनतेला त्रास होणार नाही याची काळजी संभाजी राजांनी घेतली. यातून त्यांची राज्यव्यवस्था आणि प्रशासन समजण्यास मदत होते. यावरून त्यांच्या राज्यात गोंधळ होता असे म्हणण्यास जागा नाही.

### ३.१७ आर्थिक व्यवस्था

संभाजी राजांच्या राज्यव्यवस्थेची आर्थिक व्यवस्था भक्कम वा सक्षम होती. तत्कालीन काळात शेतीप्रधान अर्थव्यवस्था होती. शेती हेच उत्पन्नाचे प्रमुख साधन होते. दक्षिणेत असणाऱ्या मलीक अंबरच्या जमीन महसुलीत शिवाजी महाराजांनी खूप मोठ्या प्रमाणावर सुधारणा केल्या. राज्यातील जमीनीची पाहणी व मोजणी करण्याचे प्रमाण निश्चित केले. याबाबतीत अण्णाजी दत्तो सचिवाने प्रांताची पाहणी करून मोजणी करून सारा आकारणी केली. त्यांनी नापीक जमीनी, पिकाऊ केल्या. उच्च प्रतीची, मध्यम प्रतीची व माळरान अशी जमीनीची प्रतवारी केली. जमीनीचे पिकांचे व गावाच्या रक्षणाची जबाबदारी घेतली. पडिक जमीन वा 'वाहात कास' जमीन म्हणजे लागोपाठ पिके देणारी यांचा विचार जमाबंदीचे पाहणीपत्रक तयार केले. आण्णाजी दत्तो जमीनीची विभागणी,

निमताना व प्रतबंदी ठरवून सरकारी साऱ्याचा आकार ठरविताना त्या कामाचे तीन प्रकारात विभागणी केली होती.

१. चावराणा, बिघावणी, चकबंदी मिळून एक भाग

२. अवल, दुम, सीमा किंवा चारदम म्हणजे प्रतबंदी दुसरा भाग.

३. लाणी, बी, खरीप, एकपिकी, दुपिकी, कोरडवाहु म्हणजे जिराईत, बागाईत, मोटस्थळ व पाटथळ, बागमळा, राई इत्यादी तिसरा भाग.

## ३.१८ जमाबंदी काठीने

जमाबंदी पाहणी दोरीच्या ऐवजी काठीचे माप ठरविलेले असे. ही मोजणी पुढील प्रमाणे करत. ही मोजणी अण्णाजी दत्तोने रत्नागिरी जिल्ह्यातील पोलादपूर भागात केले होते. ही उदाहरणादाखल नोंदवित आहे. शिवाजी महाराजांच्या काळात सुरू करण्यात आलेली मोजणी पद्धत संभाजीराजांच्याही काळात तीच वापरण्यात आली. सरकारी सारा आकारणे आणि तो कायम करणे याबाबत अत्यंत काळजी घेतली जात.

१. काठी, पाच जणांचे पाच हात व पाच धोंडामुठी लांबीची काठी चौऱ्यांशी तसूची करून जमाबंदी केली.

हे जमीन मोजण्यासाठी मोजणीकाठी असे. भात जमीनीची मोजणी केली त्या काठ्या लांबी तुलाच्या वीस व रूंदी आजीच्या वीस झाल्या. म्हणजे एक बिघा जमीन होत असे. याप्रमाणे मोजणी केली. चालती काठी टाकावी. त्याचा मान पाडीव काठ्या साडेबावीस भरत. तलवटी, वरकसी, डोंगरी गावचे पिकाचा मान पाहून दर बिघा ठरवून दिला, भात दस्त केली.[४१] गोखले कमल मोजणीची माहिती नोंदवितात.

- मौजे कापडे बु|| व पोलादपुर या हरकु गावी दोन शिरस्ते.
- प्रा. शिरस्ता दर बिघा (खंडी) ||प्रा ?

- प्रा| खराब जिमिनीस राज्यपाल दरबिघा.| प्रा २ ?
- वरकड गावी सिरस्ता दर बिघा.|प्रा ?
- वरकसी तेनास नजरमापक पाच जणांनी जमीन तपासून आजमास करून
- नागरीचे सेतासधारा
- आवट जमीनीस खंडीचे पिकास ६ कैली
- डोंगरी जमीनीस खंडीचे पिकास ६|| कैली ?
- १ वरीचे संतार धारा दर खंडीचे पिकास
- १ आवट जमीनीस आडीच मण प्रा ?
- १ डोंगरी जमीनीस दोन मण प्रा?
- १ हरीक सेत खडीचे पिकास धारा कैली ०=||प्रा ?
- १ तील, उडीद,तुरी या सेतास मण दोन मणाचे येके नजरेस आल्यास घ्यावयाचा सिरस्ता ठरवून वहिवाट करीत.

**३.१९ उत्पन्नाच्या ३३ टक्के सारा**

सुरूवातीला सरासरी उत्पन्नाच्या ३३ टक्के कर ठरविलेला होता. पुढे जादा कर रद्द केल्यानंतर ४० टक्के सारा आकारणी ठरविली होती. हिच पाहणीची व मोजणीची पद्धत संभाजी राजांच्याही काळात उपयोगात होती. याबाबतचे 'येल' येथील एक उदाहरण पाहणे महत्त्वाचे ठरेल ते असे : "येऊल येथे जिरायेताचे तर्सेराचा (९) तह राजश्री किसोपंतानी करून दर खंडीस लाटी (सुमारे तीन आण्याइतकी किंमतीचे जुने नाणे) बसरी ४०७ प्रमाणे नख्त घेण्याचे ठरवून जागजागी दिवाण दर खंडीत ४०७ लारीप्रमाणे घेत होते. परंतु १६८३ सालापासून दर खंडीस लाटी ४५ प्रमाणे वसूल घेण्यास सुरूवात केली होती."[४२] यावरून

स्पष्ट होते त्याच सालातील उत्पन्नाचा कर आकारला जाई. कर उत्पन्नाच्या ३५ ते ४० टक्के असे. ही गोष्ट स्पष्ट होते.

## ३.२० इतर उत्पन्न साधने

शेतीचे उत्पन्न हे सारासाठी प्रमुख उत्पन्नापैकी एक होते. तरीही अन्य उत्पन्नाच्या माध्यमातून सारा जमत असे. यामध्ये सुपारी, नारळ, भात यावरही कर आकारला जात. "१६८५ पुर्वी १०० नारळामागे ५||९ व सुपारीवर दर मणास ९७ कर घेतला जाई. १६८७ मध्ये नारळावरील कराचा दर ६|| टक्के आणि सुपारीवर दर मणास १०|| असा तह करून जमाबंदी केली होती. होरवाड खाजगी व मामले यांच्या शाकारणीसाठी माडाच्या मालकाला दर माडामागे २ झाप द्यावे लागत. याशिवाय घरावर, मिठावर कर असे. शहरात व्यापार करणाऱ्या व्यापाऱ्यांवरही काही कर बसविला होता."[४३]

वरील कर विवेचन पाहता संभाजीराजांची कर आकारणी न्यायप्रिय असून शेतकऱ्यांच्या हिताचा विचार करणारी आहे. त्यांनी याबाबतचा वारसा शिवाजी महाराजांचा स्वीकारला आहे. ज्या इतिहास लेखकांनी व बखरकारांनी संभाजीराजांच्या राज्य व व्यवस्थेत अनागोंद असल्याचे चित्र रेखाटले आहे त्यांनी या बाबी पाहिल्यास त्यांचा समज बदलण्यास मदत होईल. पूर्वग्रह मत बदलण्यास खुपशी मदत होईल.

## ३.२१ आयात-निर्यातीवर कर

शिवाजी महाराजांच्या राज्यकारभारापासून चालू असणारा आयात-निर्यात कर संभाजी राजांनी आपल्या राज्यपद्धतीत चालू ठेवला याबाबतची तपशिलवार माहिती संभाजीराजे आणि इंग्रज यांच्यात १६८४ साली झालेल्या तहात आढळते. या तहातील अटी व नियम पुढीलप्रमाणे :

१. इंग्रज व त्यांच्या व्यापाऱ्यांना माझ्या राज्यात येण्याची मुभा असावी. मालाची आयात व निर्यात ठरलेला जकात कर भरून करावी. जकातीवरील अधिकाऱ्यांना

कारण नसताना त्रास देऊ नये. यास्वरूपाची सवलत माझ्या व्यापाऱ्यांना व प्रजेला इंग्रजांच्या बंदरात मिळेल.

२. इंग्रजांचे जहाजे, मुरावे किंवा होड्या व्यापारी मालास वादळात सापडून भरकटून दुसऱ्या बंदरात शिरल्यास त्यांना विनात्रास जकात न घेता पाठवावे. पण वादळात सापडून दुसऱ्या बंदरावर माल उतरल्यास जकात भरावी. माझ्या वडिलांचे वेळी जो शिरस्ता होता तोच मी पाळीन व इतर ख्रिश्चन व्यापारांना ज्या सवलती मिळतात त्या माझ्या बंदरात मिळतील.

३. इंग्रज आयात करतील त्या मालावर २ १/२ टक्के जकात देतील व निर्यात करतील त्या मालावर जकात नाही.

४. इंग्रजांनी सुचविले की राजापुराहून कालाघाटाकडे जाणाऱ्या त्यांच्या मालावर आदिलशाहीत घेतली जाणारी जकात होती तशीच घ्यावी.

५. इंग्रज व्यापाऱ्यांचा माल माझ्या व्यापाऱ्यांना व रहिवाशांना न्याय्य किंमतीत वाटेत तो विकत घेण्याची मुभा असावी. सुभेदार किंवा अधिकाऱ्यांनी कायदेशीर जकात घ्यावी.

६. मुंबई बेटावर जळणाची वाण असल्याने इतर ठिकाणावरून विना जकात आणण्याची परवानगी आहे. मागील रिवाज चालू राहील. मागे जकात घेतली जात होती तशी घेतली जाईल.

७. इंग्रजांनी नागोठाणे-पेण येथे वखारी काढाव्यात पण त्यांना घाटावर आयात-निर्यात करताना राजापूरला जशी जकात आहे तशी द्यावी लागेल. अन्य त्रास होणार नाही.

८. इंग्रजांनी टाकसाळीतच नाणी पाडण्यासाठी सोने व चांदी आणावी इतरत्र नाही. अशा सोन्या-चांदीवर नेहमीच व्याज द्यावे लागेल.

९. इंग्रजांनी माल घेताना जकात द्यावी लागेल. निर्यात करताना नाही. माझ्या वडिलापासून जो रिवाज आहे तो पुढे तसाच चालेल.

## ३.२२ परकियांच्या पकडलेल्या मालाबाबत संभाजीराजांचे धोरण

इंग्रज अथवा अन्य परकीय सत्ताधिशाचा माल मराठा अधिकाऱ्यांनी पकडला असल्यास तो परत पाठविला जात असे किंवा विकला असल्यास त्याची किंमत परत केली जात असे. याबाबत उल्लेख एका पत्रातून मिळतो. तो असा, "घाटात निरनिराळ्या ठिकाणी सर्व किरकोळ माल २५९० पातशाही पागोडे किंमतीचा गोपाळरावाने पकडून नेलेला परत करण्यासाठी इंग्रजांची मागणी आहे. त्यांच्याशी मैत्री झालेली आहे. तरी पत्रात दिलेला तपशील आपल्या जमावहीत शोधून तपासून घ्या. जो माल नोंदला असून तुमच्या खजिन्यात आहे तो द्या. परंतु विकला गेला असेल त्याचा व रोखीचा हिशेब आमचेकडे पाठवा. नंतर अंतिम निर्णय घेऊन कळवू. "[४४] संभाजीराजांना कोल्हापुरच्या सुभेदार व मुजुमदार गोपाळ परशराम यास इंग्रजांच्या पकडलेल्या मालाबाबत आदेश दिलेले आहे. यावरून हिशोबाच्या बाबतीत महाराज स्वतः लक्ष घालत असत.

संभाजीराजे आयात-निर्यात व्यापारी कर इत्यादी विषयांचे धोरण चोख आणि सहकार्याचे ठेवत होते. शिवाजी राजांच्या धोरणांचा विचार करून संभाजीराजे आपले धोरण ठरवितांना दिसतात.

## ३.२३ गुलामांवरील कर

इंग्रज वखारवाले भारतातून गुलामांची खरेदी करत असत यावर शिवाजी महाराजानी प्रत्येकी गुलामावर दोन-तीन पागोडे कर आकारला होता. संभाजीराजांनी हाच कर १२ पागोड्यांपर्यंत वाढविला. याचा परिणाम स्वराज्यांच्या उत्पन्नात वाढ झाली. त्याचबरोबर गुलामांच्या व्यापाराला आळा बसला.

संभाजीराजांच्या या कर धोरणांचा परिणाम गुलामांच्या खरेदी-विक्रीवर झाला. यामुळे गुलाम खरेदीस आळा बसला. या मागील त्यांचा हाच हेतू असल्याचे स्पष्ट होते.

## ३.२४ खंडणी व चौथाई

उत्पन्नाच्या दृष्टीने संभाजी राजांनी खंडणी व चौथाईचा अवलंब केल्याचे उदाहरणे आहे. शिवाजी महाराजांनी सुद्धा या प्रकारचा अवलंब केलेला होता. या दृष्टीने 'शिवचरित्र साधन' मधील नोंद महत्त्वपूर्ण आहे ती अशी, "१६८० सालापूर्वी शिवाजी महाराजांनी मुरगोड्या देसाई रूद्राप्पा याच्याकडून १०००० होन खंडणी घेण्याचे ठरविले होते. महाराजांच्या निधनानंतर या देसाईविषयी कटोरगडचा हवालदार देवजी श्रीखंडे याने संभाजी राजाकडे विनंती केली की शिवाजी महाराजांनी पूर्वी बांधून दिलेल्या खंडणीप्रमाणेच संभाजीराजांनी खंडणी घ्यावी. या विनंतीनुसार दि. ७ मे १६८० रोजी संभाजी राजांनी पूर्वीप्रमाणे खंडणी घेतली जाईल असे रूद्राप्पा देसायाला कळवून अभयपत्र दिले होते."[४५] शिवाजी महाराजांच्या निधनानंतर राज्यकारभाराची सुत्रे हातात घेतल्यानंतर त्यांनी खंडणीबाबतचा निर्णय दिलेला होता. हा निर्णय अत्यंत स्पष्ट स्वरूपाचा आहे. यावरून त्यांचे व्यवहार पूर्वीपासून पारदर्शक असल्याची जाणीव होते.

पत्रव्यवहारावरून त्यांचा परदेशातही व्यापारी संबंध असल्याचा बोध होतो. ते पत्र पुढीलप्रमाणे, " कापड घेऊन एक मराठ्याचे जहाज पोर्टो नोव्हा येथून १६८१ च्या ऑक्टोबर महिन्यात मलाक्काला (हे आजच्या मलायाच्या संघात आहे.) गेले. तेथे जहाजातील सर्व माल विकण्यात आला. कोरोमॅंडलचा गव्हर्नर पिट याच्या विनंतीमुळे या जहाजाच्या नावाड्यास (Nakhuda) सर्व प्रकारचे सहाय्य देण्यात आले. "[४६]

या पत्रावरून परकियांच्या मदतीने संभाजीराजांचा परराष्ट्राशी व्यापारी संबंध असल्याचे स्पष्ट होते. त्यांनी काही लोकांना या दृष्टीने सांभाळल्याचे जाणवते. मराठ्यांच्या आरमाराचा व बंदरांचा वापर स्वरक्षणाबरोबर स्वपरराष्ट्र व्यापारासाठी संभाजीराजांनी प्रथम केला. यावरून त्यांची दूरदृष्टी समजण्यास मदत होते.

## ३.२५ अंतर्गत कारभार

स्वराज्याचे आर्थिक अंतर्गत व्यवहार सुस्थितीत व योग्य असल्याचे काही उदाहरणे या ठिकाणी पाहिल्यास अधिक स्पष्ट होईल. या दृष्टीने 'मराठ्याच्या इतिहासाची साधने' या ग्रंथात नोंदविलेले व्यवहार पाहता स्वराज्याची अंतर्गत व्यवस्था स्पष्ट होईल. ती अशी, " हिरोजी इंदुलकर हा रायगडावर बांधकामे करीत असे. दि. २७.९.१६८३ व १६८६ मध्ये त्याच्या नावाने कर्जव्यवहार असल्याची नोंद होती. या कर्जाची गोपाळसेट सेटीया याने हमी घेतली होती. या कर्जापैकी कोंडाजी दामोदर सबनीस बीन फुटनाईक याला महिन्याच्या पगाराचे १७ होन दिले. दि. २८.९.१६८५ रोजी निळकंठ मोरेश्वरने दत्तसेट याला लिहिले की, तुजकडे हरकी ब|| इमारती किले पुरंदर ब|| सेरणी बाकी ओढत आहे. त्यापैकी मुशाहरा बदल देणे शामजी केशव दफ्तरदार किल्ले अहिवंतगड५|| होन २० अदा करणे. पालियाचा कागद घेणे"[४७]

स्वराज्याच्या कारभारासाठी कर्जाची आवश्यकता भासत असे. शिवाजी महाराजांनी असे कर्ज घेतलेले आहे. आणि फेडण्याचा पूर्णतः प्रयत्न केलेला आहे. यावरून स्वराज्याची अंतर्गत आर्थिक व्यवस्था अत्यंत सुस्थितीत व स्वच्छ चालू होती याबाबी स्पष्ट होतात. यावरून संभाजी राजांच्या राज्यकारभारात गोंधळ असल्याचा जो आरोप केला जातो त्या गोष्टींना आधार मिळत नाही. त्यामुळे त्या आकस व अज्ञानावर आधारित आहेत.

## ३.२६ प्रजाहितदक्षता

संभाजीराजांना स्वराज्याच्या राज्यकारभारात प्रवेश करताना अंतर्गत व परकीय सत्ताच्या संघर्षांना सामोरे जावे लागले. त्यामुळे त्यांची श्रमशक्ती खूपच खर्च झाली. आणीबाणीचे प्रसंग खूप ओढले. स्वराज्य सर्वबाजुंनी अडचणीत आलेले होते. अशा परिस्थितीला सामोरे जातानाही संभाजीराजांनी प्रजेच्या हिताकडे दुर्लक्ष केले नाही. याही

परिस्थितीत प्रजेच्या हिताचे अधिक रक्षण करण्याचा प्रयत्न केला. दुष्काळ पडल्यास सारा माफ केला. वा आपत्तीच्या वेळी मदत आणि सारा माफ केला जात असे. ज्या शेतकऱ्याचे सारा भरण्याचे थकले असेल अशी कुटुंबे गाव सोडून जात. त्यांना दिलासा देऊन बोलविले जात असे. शेतकऱ्याचे नुकसान होणार नाही याची काळजी घेतली जात असे. स्वराज्यातील प्रजेच्या हिताचे विचार शिवाजी महाराज- संभाजी महाराज यांनी सातत्याने केला. स्वराज्याचे हित शिवाजी महाराज-संभाजी महाराज यांनी पाहिले. यादृष्टीने जावळीच्या मोरेच्या स्वारीबाबतचा उल्लेख महत्त्वाचा आहे. चंद्रराव मोरेवर स्वारी केली असता तीत बाजीने भाग घेतला नव्हता. त्यावेळी दिपाईने आपला मुलगा सरनौबताबरोबर पाठविला होता. कदाचित नातू पाठविला असावा. त्याबद्दल दिपाईला शिवाजी महाराजांनी साडी-चोळीसाठी मौजे पऱ्हेद खुर्द येथे इनाम दिले होते. या इनामानुसार अधिकारी वागत नसल्याची तक्रार घेऊन दिपाईचा नातू शंकरजी रायाजीचा लेक संभाजीराजांना भेटला त्याने सर्व वृत्तांत सांगितला.

संभाजीराजांनी दि. १८.११.१६८१ ला मावळ प्रांताच्या गोपाळ सयाजीला पत्र लिहिले ते पुढीलप्रमाणे, "(राज्याभिषेक शके दुर्मतीनाम संवत्सरे कार्तिक बहुल तृतीया मृगूवासरे) मावळ प्रांताच्या गोपाळ रायाजीला लिहिले की, कैलासवासी स्वामीने सन इहिदे खमसेनान दिपाई| स बांदल (लास) साडी-चोळी म्हणून इनाम मौजे पऱ्हेर... चालत आले आहे. हाली तुम्ही स्वामीचे सनतेची उजूर करिता म्हणऊन दिपाईचा नातू शंकरजी, सयाजीचा लेक हुजूर येऊन विदीत केले व कैलासवासी स्वामींची पत्रे दाखविली. त्यावरून कळो आले ऐसियाची मौजे पऱ्हेर बांदल साडी चोळी महणून दिपाईस इनाम दिल्ले. अवलात अफवाद चालवित जाणे ताजे सनदेची उजूर करीत न जाणे"[४८]

या दृष्टीने दुसरे एक उदाहरण महत्त्वाचे आहे. यातून संभाजीराजांची प्रजाहितदक्षता स्पष्ट होते. ती पुढीलप्रमाणे, " येऊलचा बाळाजी कुलकर्णी याच्याकडे बाकी थकलेली होती. त्या धास्तीने तो येऊल सोडून खेंदडा येथे राहावयास गेला. दि.

२४.२.१६८२ रोजी येऊलचा सुभेदार राघो विश्वनाथ सुभेदार याने त्याला पत्र लिहून बाकीच्या धास्तीने खेदंड्यास जाऊन राहावयाचे कारण नाही असे कळविले. बाकी संबंधी विल्हे करून देऊ. आपल्या गावी येऊन सुखे राहणे. कोणत्याही तऱ्हेची तजवीज लागणार नाही म्हणून त्याला कौलपत्र दिले."[४९] या पत्रावरून संभाजी राजांच्या राज्यकारभारात प्रजेच्या हिताला अधिक महत्त्व असून त्याच्या अडचणीचा विचार केला जात होता. शेतसारा थकला म्हणून गाव सोडणाऱ्या कुलकर्णी यांना भिण्याचे कारण नाही. आपण पुन्हा गावात या आपणास शेतसारा माफ झाला असा निर्वाळा दिलेला आहे. यावरून संभाजीराजे लोकराजा असल्याचे स्पष्ट होते. या बाबी पाहता त्यांच्या राज्यात सावळा गोंधळ असल्याचा आरोप स्पष्टपणे खोटा असल्याचे दिसून येते.

संभाजीराजांच्या राज्यकारभारावर प्रजाहितदक्षतेच्यादृष्टीने प्रकाश टाकणारी अनेक पत्रे, इनाम आणि वृत्तांत उपलब्ध आहेत. यातून त्यांच्या राज्यकार-भारातील प्रजाहितदक्षता, समाजाचा कळवळा आणि लोककल्याणांचा विचार स्पष्ट होतो.

### ३.२७ शेतीच्या करात सवलत

शेती हा मावळ्यांच्या उत्पन्नाचा व स्वराज्याच्या कराचे साधन होते. शेतीवर संकट आल्यावर शेतकऱ्यांच्या विनंतीवरून शेतीच्या करात सवलत देण्याचा निर्णय घेतला आहे. १६८५ च्या एप्रिलमध्ये 'येऊल' गावावर संकट आल्यावर या गावाचा कर घेण्यास नकार दिला. रयतेच्या अडचणीचा व शेतकऱ्यांच्या संकटाचा विचार करता आणि प्रजेच्या संकटाला स्वराज्याचा आधार असायचा, संभाजीराजांना स्वराज्याची खूप काळजी होती. ते स्वतः त्यांच्या प्रदेशामध्ये जाऊन पाहणी करत. यावरूनही त्यांचे प्रजाहिताचे व्यवस्थापन दिसून येते.

## ३.२८ संभाजीराजांचे स्वराज्यनिष्ठ सेवक

शिवाजी महाराजांच्या बरोबर स्वराज्य उभारणीसाठी ज्यांनी आयुष्य-कुटुंबाचा विचार केला नाही. स्वराज्य हाच ध्यास उराशी बाळगला यांच्याबद्दल शिवाजी महाराज-संभाजीराजे नेहमीच भावनाविवश होते. त्यांच्या मनात या मावळ्यांच्याबद्दल खुप-खुप प्रेम होते. काही मावळे जहागिरीच्या वा मनसबीच्या लालचीने खुपशी मंडळी फितूर झाली. पण ज्यांनी शिवाजी महाराज-संभाजीराजे आणि स्वराज्य महत्त्वाचे वाटले या माणसांना मावळ्यांना भोसले घराण्याने जीव लावला आणि जीवास-जीव दिला. वेळप्रसंगी या मावळ्यांची मुले युद्धात 'भोसले' कुटुंब आघाडीवर असायचे. यामुळे मावळ्यांनी रक्त सांडताना जिवाची पर्वा केली नाही. यामध्ये कंक कृष्णाजी, केशव त्रिमळ, खंडो बल्लाळ, कविकलश, हंबीरराव मोहिते, मालोजी घोरपडे, अर्जोजी व गिरजाजी यादव, येसाजी कंक, निळो मोरेश्वर, प्रल्हाद निराजी, हरजी महाडिक, रूपाजी भोसले इत्यादी सरदाराप्रमाणेच अधिकारी वर्ग एकनिष्ठ राहिले. याशिवाय पुढील एकनिष्ठ मावळ्यांचा उल्लेख करणे महत्त्वाचे आहे.[५०]

१. बाजी मुरार शिवाजी महाराजांच्या पाशी मावळ्यांच्या जमावाची त्यांचा मुलगा महादजी बाजीही मावळ्यांच्या जमावाचा सरदारी करून संभाजीराजांपाशी चाकरी करीत होता. संभाजी राजांनी त्याला पोतनीस केले.

२. शिवाजी महाराजांचा सरनोबत नेताजी पालकर संभाजी राजांचाही सरनोबत म्हणून सेवा केली.

३. संभाजीराजांनी जिंतीकर भोसले यास सेनासाहेब सुभा यांची वस्त्रे दिली.

४. जोत्याचे केसकर संभाजीराजांचा स्वामिभक्त सेवक होता. तो राजांच्या नेहमी जवळ राहात असे. स्वारी-शिकारीत, लढाईत त्याने कधी धन्याची पाठ सोडली नाही. राजांच्या मृत्यूनंतर येसुबाई जवळ विश्वासू मनुष्य होता.

५. पंताजी गोपीनाथ बोकील यांचा पुतण्या महादजी यमाजी संभाजीराजांच्या वाकनिसाच्या मुतालिकीचे काम करीत असे तो व त्याचा पुतण्या भगवंत गंगाधर हे येसूबाई आणि शाहू बरोबर पकडले जाऊन मुघलांच्या कैदेत होते.

वरील यादीवर नजर टाकल्यास स्वराज्यांच्या मावळयांची आणि पराक्रमाची कल्पना येते. शिवाजी महाराजांप्रमाणे संभाजीराजांनी मावळ्यांना जीव लावला आणि मावळ्यांनी त्यांना जीव लावला. ज्या इतिहासकारांनी संभाजीराजांच्या राज्यकारभारामध्ये सरदार-मावळे मुघलाच्या मन्सबीत धन्यता मानायला लागले त्यांच्या मताचा फोलपणाा वरील सरदारांच्या यादीने होतो. स्वार्थाने स्वराज्यात आलेले लोक शत्रूला मिळाले. पण स्वराज्यांवर प्रेम करणारे अखेरपर्यंत स्वराज्यात राहिले हेच इतिहासावरुन स्पष्ट होते.

### ३.२९ संभाजीराजांची न्यायव्यवस्था व कायदा

शिवाजी महाराजांच्या राज्यव्यवस्थेत जी न्यायव्यवस्था होती, ते स्वरुप संभाजीराजांच्या राज्यव्यवस्थेत कायम राहिलेले आहे. स्वराज्याच्या राज्यव्यवस्थेमध्ये न्यायव्यवस्था दुहेरी स्वरुपाची होती.

१. केंद्रीय न्यायव्यवस्था

२. स्थानिक न्यायव्यवस्था

केंद्रीय न्याय व्यवस्थेमध्ये राजा आणि हुजूर मजलीस किंवा धर्मसभा असे दोन

विभाग होते. राज्याभिषेकानंतर तेच न्यायदानाचे कार्य करत असत. न्यायदानाचे कार्य पार पाडण्यासाठी अष्टप्रधानमंडळात न्यायाधीश जो जमीन व अन्य तंटे याबाबतचा न्याय देत असे, तर पंडितराव धर्मादायाचा मुख्य न्यायाधिश होता. धार्मिक क्षेत्रातील न्यायनिवाडे त्यांच्या मार्फत चालत. शिवाजी महाराज न्यायसंस्थेचे प्रमुख होते. मात्र धर्मक्षेत्रातील न्याय देताना परंपरेनुसार हुजून - हाजीर मजलीस यांच्या सहकार्याने न्याय देत. मजलीस आणि स्थानिक कारभारी यांच्या चौकशीने न्याय देण्याची पध्दत स्वराज्यात सुरु

झाली. यापूर्वी कोणत्याही राज्याच्या राज्यव्यवस्थेत ही व्यवस्था नव्हती. न्यायाधीश पंडितराव यांची नियुक्ती राजा स्वतः करत असे. ते राजाला जबाबदार असत. न्यायाधीशाचे अधिकार मुलकी स्वरुपाचे असत. पण महाराजांनी निराजी रावजी, प्रल्हाद निराजी, होनाजी अनंत यांना सेनापतीची कामे करावी लागत होती. एक हजार होन हा न्यायाधीशाचा वार्षिक पगार असे.

### ३.२९.१ प्रांतिक न्यायपध्दती

शिवाजी महाराजांनी खटल्यांची सुनावणी स्थानिक पातळीवर करण्याची पध्दत प्रथम रुढ केली. विभागाचे हवालदार, सरसुभेदार, या अधिकाऱ्यांनी गोत आणि फिर्यादी यांच्यात मध्यस्त करुन काम करत. तीन विभागाच्या अधिकाऱ्यांना न्यायाधिशाचे काम करावे लागे. त्यांचे अधिकार कनिष्ठ व वरिष्ठ न्यायालयाचे असत. दिवान वा सुभ्यात सुभेदार व सभासद हे न्यायाच्या बाबतीत महत्वाचे अधिकारी असत. कनिष्ठ न्यायालयातून दावा वरिष्ठ न्यायालयात गेला तर वरिष्ठ न्यायालयाने दिलेला निकाल कनिष्ठ न्यायालयाने अंमलात आणावा. स्वराज्याची न्याय व्यवस्था पाहता सर्वसामान्यांना योग्य न्याय मिळवण्याच्या दृष्टीने अनुकूल व्यवस्था असून ही व्यवस्था काटेकोरपणे पाळली जात असे.

संभाजीराजांच्या काळात न्यायव्यवस्था राहिली नाही. विचार न करता शिरच्छेद केला जात असे. गडकऱ्यांवर चुगली होताच विचार नव्हता त्यांस शिक्षा दिली जात असे. इत्यादी बखरीतील आरोप खोटे असून त्या काळातील न्यायव्यवस्था शिवाजी महाराजांची न्याय पध्दती केंद्रापासून सूभ्या पर्यंत चालत असे. यादृष्टीने मराठा इतिहास साधनात नोंदविलेला एक खटला व त्यांचा निकाल पाहिल्यास सत्यता स्पष्ट होईल ती अशीः "दि. ०३.१२.१६८० ला तर्फ वेलवंड खोऱ्यात कसबे हरणस येथे हजीर मजलसीत लिहून दिले. या मजलीसीत वेदमूर्ती हरभर मोरेश्वर जोशाी, मल्हार, दत्ताजी कुलकर्णी , कृष्णाजी

नाईक देशमुख व इतर देशमुख होते. त्याप्रमाणे उभयतांनी तकरिरा लिहून दिल्या. समस्त गोतयाले ब्राम्हण मिळोन श्रींच्या देवळात बसोन शेतात निवाडा करुन दिला. आपाजी बीन मलजी नाईक निगडे याचेच वडीलघर असून विठोजी बीन गोरखजी याचे धाकटे घर असून त्यांनी वडीलपणाचा कारभार केला. तरी वडीलपण कोणी घेणार नाही. दोन्हीकडील देशमुखांनी त्यास मानपान, विडा दिला. ते सिका नांगर व वडीलपणा जमीन एक यावर व पाच होन आहेत. त्यानेच वडीलपणाचा कारभार करावा. विठोजी बीन गोरखजी निगडे याचा वडीलपणाचा व कारभाराचा संबंध नाही. जो खोटा उरेल त्याने दिवाणात ५०० होन द्यावेत. "[५१]

स्वराज्याच्या राज्यकारभारातील संभाजीराजांच्या मार्गदर्शनाखाली आलेल्या न्यायव्यवस्थेतील सुरुवातीला सात आठ महिन्यात तर्फ वेलवंड खोऱ्यात व्यवस्थितपणे न्याय दिला जात असल्याचे स्पष्ट होते. हे न्याय व्यवस्थेचे उत्तम उदाहरण आहे.

### ३.२९.२ वतनाची खरेदी विक्री

संभाजीराजांच्या काळात पुणे प्रांतात माणकोजी बीन नावजी पाटील चिंचवडे व केरोजी बीन साहसी चिंचवडे यांच्यात मौजे चिंचवडच्या मोकादमी संबंधी वाद निर्माण झाला. या वादाचाही निर्णय गावातील बलुतेदार, अलुतेदार, गाव कामगार, मोकादम, जोशी, कुलकर्णी यांना बोलावून ग्रामदैवताचा बेलभंडारा उचलून तंटा सोडविल्याच्या नोंदी आहेत. न्याय दोन्ही पक्षांना समाधानकारक देण्यात आला. यावरुन न्यायव्यवस्थेची नियमबध्दता पाळून रयतेचे न्यायनिवाडे योग्य पध्दतीने होत असल्याचे दिसते.

पाटीलकीच्या तकसीम विकण्याची वेळ, संभाजी बीन भिवजी चव्हाण याची दुष्काळामुळे हलाखीची स्थिती झाली होती. हा मौजे कोणेगाऊचा पाटील होता. त्यांच्या पाटीलकीच्या विक्रीबाबत. पाटीलकी विकणारा व घेणारा यांना एकत्रित घेऊन न्यायनिवाडा करण्यात आला. हा न्याय निवाडा उच्च अधिकारी यांच्या मार्गदर्शनाने पार पडला.

संभाजीराजांच्या कारकीर्दीत न्याय निवाडा योग्य असल्याचा विस्तारित आढावा घेतल्यानंतर तत्कालीन काळात चोरीमारीचे प्रकरणही घडत असे. तर्क उमरज कसबे मसूर येथील महादजी जगदाळा व मौजे सिवडे व मौजे वराडे येथील संताजी घाडगा त्याच्याकडे सितोजी आणि सटवोजी भोसले यांनी चोरी केली होती. चोरीस काय गेले व शेतातून काय नेले यासंबंधी विस्तृत माहिती निवाड्यात दिलेली आहे. या चोरीची कसून चौकशी करून दोषीला शिक्षा करण्यात आली यावरून स्वराज्याचा न्यायनिवाडा समजतो.

### ३.३० संभाजीराजांची सैनिकी व्यवस्था

स्वराज्याच्या निर्मितीकाळात गरजा आणि साधन सामुग्री लक्षात घेऊन शिवाजी महाराजांनी जी सैनिक व्यवस्था निर्माण केलेली होती. तिच सैनिकी व्यवस्था संभाजीराजांच्याही काळात चालू होती. स्वराज्याचा प्रारंभ प्रथम पुण्यासारख्या लहानशा जहागिरीतून केला. अन्य साम्राज्याच्या तुलनेत स्वराज्य फारच लहान होते. शिवाजी महाराज स्वराज्याच्या प्रारंभकाळी मुघलाचे मनसबदार म्हणून पुण्याचा कारभार पाहत होते. अफाट सैन्यांशी लढण्याचे यशस्वी युद्धतंत्र विकसित केले. या तंत्राला गनिमी कावा असे संबोधत. या तंत्राचे वैशिष्ट्य म्हणजे संख्यने कमी असणारे सैन्य अफाट सैन्यांचा पराभव करत. त्याचबरोबर डोंगर-दऱ्यात अवघड ठिकाणी युद्ध करण्याचे सामर्थ्य या युद्धतंत्रात होते. या तंत्राचा वापर स्वराज्य उभारणीसाठी शिवाजी महाराज-संभाजीराजे यांनी पुरेपुर करून घेतला.

#### ३.३०.१ स्वराज्यातील गडाची व्यवस्था : अमात्य

स्वराज्यातील गडकोटांची उत्तम व्यवस्था शिवाजी महाराजांनी ठेवल्याचे वर्णन अमात्यांनी 'राजनीती' या ग्रंथात नोंदविलेले आहे. ती पुढील : " संपूर्ण राज्याचे सार ते दुर्ग. दुर्ग नसता मोकळा देश परचक्र येताच निराश्रय, प्रजा भग्न होऊन देश उध्वस्त होतो. देश उध्वस्त झाल्यावरी राज्य असे कोणास म्हणावे ? याकरिता पूर्वी जे जे राजे झाले त्यांनी

आधी देशामध्ये दुर्ग बांधून तो तो देश शाश्वत करून घेतला आणि आपले परचक्रसंकट दुर्गाश्रयी परिहार केला. हे राज्य तर तीर्थरूप थोरले कैलासवासी स्वामींनी गडावरून निर्माण केले. जो जो देश स्वशासनवश न होय त्या त्या देशी स्थलविशेष पाहून गड बांधले, तसेच जलदुर्ग बांधिले, त्यावरून आक्रमण करीत करीत सालिरी अहिवंतापासून कावेरीतीरापर्यंत निष्कलंक राज्य संपादिले. औरंगजेबासारख्या महाशत्रू चालून येऊन विजापूर भागानगरांसारखी महासंख्याने आक्रमिली, संपूर्ण तीस बत्तीस वर्षे पर्यंत या राज्यांशी क्रांतीक्रम केला. त्याचे प्रत्यक्ष असाध्य काम होते परंतु राज्यात किल्ले होते म्हणून अवशिष्ट तरी राज्य राहिले. पुढे पूर्ववत करावयास आवकाश जाल्ला"[५२]

शिवाजी महाराजांच्या आज्ञापत्रातील गडकिल्ल्यांच्या संदर्भातील विचार मौलिक असून राज्याचे, राजाचे आणि प्रजेच्या रक्षणाचे अभेद्य साधन म्हणजे गडकोट असतात. ते नसतील तर राज्यउभारणी, संरक्षण आणि युद्ध करता येणार नाही. शत्रूशी सामना करता न आल्यामुळे राजांची आणि राज्यांची वृद्धी होणार नाही असा स्पष्ट शब्दांत संदेश दिलेला आहे. यावरून स्वराज्यातील गडकिल्ल्यांचे महत्त्व स्पष्ट होते.

स्वराज्याचे मावळे अत्यंत साधे असत. अंगात फक्त लंगोटी आणि एक घोंगडे असे. कमरेला तलवार व हातात भाला असला की घोडेस्वार युद्धासाठी तयार असे. डोंगरदऱ्यातील मावळे अंगाने काटक व निसर्गाशी एकरूप पावलेले होते. चटणी-भाकरीवर पोसलेली शरीरयष्टी, शिवाजी महाराजांच्या विचारासाठी- आदेशासाठी स्वतःच्या प्राणांचीही पर्वा करत नसत. अशाच माणसांच्या सर्वांगीण उन्नतीसाठी, विकासासाठी स्वराज्यनिर्मिती, उभारणी शिवाजी महाराज यांनी केली.

तत्कालीन काळात यशस्वी स्वराज्यनिर्मितीसाठी व युद्ध विजयासाठी हवी असणारी साधन सामुग्री शिवाजी महाराजांच्या जवळ विपूल होती. त्यांच्याजवळ घोडदळ, पायदळ, आरमार आणि तोफखाना इत्यादी सामुग्री होती. घोडदळात पागा व शिलेदार असे विभाग

असत. पागेत दर घोड्यास एक बारगीर व पंचवीस बारगीरांस एक 'मराठाधिकारी' असे पाच हवालदारावर एक 'जुमला', दहा जुमल्याचा अधिकारी तो 'हजारी' पाच हजाऱ्यांवरचा 'अंमलदार' तो पंचहजारी होय. पंचहजाऱ्यावरचा 'सरनोबत' म्हणजे लष्करी सुभेदार होय. त्याचं सारखा 'सातहजारी' तो लवकरी सर सुभेदार. हजारी, पंच हजारी, सरनोबत याजवळ वाकनिस कारकून, हरकारे व जासूद असत. गुप्त हेरांचा प्रमुख नाईक बहीरजी जाधव होता.

संभाजीराजांच्या राज्यकारभारात हिच सैनिकाची व्यवस्था स्वीकारलेली होती. शिवाजी महाराजांच्या युद्धनितीमध्ये वाढलेले संभाजीराजे त्यांच्या युद्धनीतीचा पुरेपुर उपयोग करून घेतात. त्यांच्या सैनिकव्यवस्थेच्या पूर्वी त्यांच्या काळातील युद्ध मोहिमेचा तपशिल अभ्यासणे संयुक्तिक होईल.

### ३.३०.२ संभाजीराजांच्या युदध आघाड्या

संभाजीराजांनी आपल्या कारकीर्दीत काही मोहिमा आखल्या आणि त्या योजनेनुसार यूद्ध केली. याचा विचार तपशिलानुसार केल्यास सैन्य सामर्थ्य समजण्यास मदत होईल.

१. फोडा, रामसेन, त्रिंबकगड, पटागड, कल्याण-भिवंडी, रायगड, रोहिडा, पुरंदर, कोल्हापूर, पन्हाळा इत्यादी ठिकाणी शत्रूंनी वेढा घातला होता तो वेढा मोडून काढला.

२. सिद्दीचा दंडाराजपुरी, येऊल, उंदेरी, सांतु इस्तेव्हंब, तिवीम, अहमदनगर, सोलापूर, कव्हेरी इत्यादी शत्रूच्या किल्याला मराठ्यांनी वेढा घातला.

३. औरंगाबाद, बऱ्हाणपूर, परिंडा, चांदा, मलकापूर,जालना, सोलापूर, नळदुर्ग, एलिफंटा, करंजा, तारापूर, असेरी, सालसंत, बारदेश, म्हैसूर, मदुरा, बाणावर, मददूर त्रियनापल्ली, फोर्ट सेंट जॉर्ज इत्यादी ठिकाणी मराठ्यांना यशस्वी आणि

धाडसी आक्रमणे केली. १६८२ नंतर मुघलांनी मराठ्यांच्या ठिकाणावरती हल्ले सुरू केले याचा परिणाम मराठ्यांना स्वसंरक्षणातच अडकून पडावे लागल्यामुळे बाहेर फारशी आक्रमणे करता आली नाहीत. इत्यादी बाबींचा विचार करता संभाजीराजांची सैनिकी व्यवस्था यशस्वी आणि सुस्थितीत होती याचाच प्रत्यय येतो.

### ३.३०.३ संभाजीराजांची सैनिक अधिकारी व्यवस्था

संभाजीराजे स्वतः आघाडीवर जात. शिवाजी महाराजांपासून हा रिवाज स्वराज्यामध्ये होता. तोच त्यांनी प्राणपणाने पाळला. स्वतः संभाजीराजे जंजिरा, येऊल, तारापूर फोंडा, सोतु, इस्तेव्हेव, खेळणा, बाणावर व श्रीरंगपट्टण इत्यादी आघाड्यांवर गेले होते. १६८८ साली संगमेश्वराला शिर्क्यांच्या बरोबर झालेल्या युद्धात स्वतः हजर होते. स्वराज्याची सैनिकी व्यवस्था विविध आघाडीवरील वर्णनावरून व कमल गोखले आणि वा.सी. बेंद्रे यांनाही मान्य असलेले आहे.

१. हंबीरराव मोहिते : सरनोबत असून त्यांना सर्व आघाड्यावर लक्ष ठेवावे लागत असे. कल्याण-भिवंडी, कोल्हापूर, रायगड व पन्हाळा इत्यादी आघाडीवर संभाळल्या. १६८५ साली निळोपंतांच्या बरोबर कल्याण, भिवंडी, येऊल या आघारीवर चार सेनापती होते. त्यातील पुरंदर किल्याचा सरदार राणा जयसिंग तो मरण पावला व सुजाणराव ११ डिसें. १६८५ च्या लाढाईत मरण पावला अन्य सेनापतींची नावे उपलब्ध नाहीत.

२. सरनोबत येसाजी कंक आणि कृष्णाजी कंक फोंड्याची आघाडी.

३. संभाजीराजांना गोव्याच्या आघाडीवर खंडोबल्लाळानी साहय केले.

४. रायगड, पन्हाळा आणि गोवा आघाड्या व संगमेश्वरच्या आघाडीवर बाण लागून कविकलश जखमी झाला.

५. सर्जेराव जेधे वाईची आघाडी सांभाळली. कोथळागडावर लढत असलेला नारूजी त्रिंबक मारला गेला.

६. सरदार भीमराव सातारा आघाडी : नोव्हेंबर १६८४ नारूजी भोसले यांच्या नेतृत्त्वाखाली २००० घोडेस्वार होते.

७. बारदरमल सरदार पुणे.

८. यमाजी भोसले यांनी कल्याण, रामसेन, भिवंडी रायगड आणि संगमेश्वर इत्यादी ठिकाणी पराक्रम गाजविला.

९. कृष्णाजी दादाजी सरस प्रभू संगमेश्वर, दंडाराजपुरी, शिरवळ, मावळ आघाडी राखली.

१०. मलीक बेग १६८४ मध्ये मराठ्याचा अधिकारी होता. १००० मुस्लीम घोडेस्वार, त्याला वर्षासाठी १५०० होन पगार होता. त्याचा सहाय्यक शेख हुसेन ५०० होन पगार.

११. रामसंजळे किल्याचा वेढा रूपा मोजदाने उठविला.

१२. मानाजी मोरे आणि संताजी जगताप हे रूपाजी मोजदास मदतनिस.

१३. तुकोजी सरदार कल्याण -भिवंडी आघाडी.

१४. जानराव जानोजी विजापूर आघाडी.

१५. हिंमतराव संगमेश्वर आघाडी.

१६. हंबीररावाच्या निधनानंतर मालोजी घोरपडे सरनोबत, संताजी आणि विठोजी चव्हाण यांनी संगमेश्वर आघाडी सांभाळली.

१७. गौडा देसाई, हुक्केरीचा देसाई यांनी कोपळ, कोल्हापूर, भुजबळगड या ठिकाणची आघाडी सांभाळली.

१८. हरजीराजे महाडीक यांनी कर्नाटकातील आघाडी सांभाळली.

१९. केशव प्रियल कल्याण-भिवंडी, रामसंजची आघाडी सांभाळली.

### ३.३०.४ संभाजीराजांच्या काळातील सैन्यबळ

स्वराज्यामध्ये पूर्वीपासून एकूण किती सैन्य होते याबाबत खात्रीशीर माहिती उपलब्ध नाही. यामुळे संभाजीराजांच्या राज्यकारभारातील सैन्याचा आकडा समजणे अवघड आहे. मराठ्यांच्या एकूण सैन्य संख्येचा आकडा उपलब्ध होत नाही. तरीही निरनिराळ्या आघाडीवर लढलेल्या सैनिकांची माहिती बखर, कागदपत्रे, तहनामा आणि युद्ध प्रसंग यातून उपलब्ध होतात. सदाशिव शिवदे, वा.सी.बेंद्रे आणि कमल गोखले, शुभा साठी यांनी ग्राह्य म्हणून स्वीकारलेली सैन्यसंख्याचा तपशिल आपण स्वीकारला आहे. संभाजीराजे (१६८०) पन्हाळगडावर २०,००० सैन्य होते. निरनिराळ्या युद्ध आघाडीवरील सैन्य संख्या :

१. ३०००० सैन्य बऱ्हाणपूर छावणी घेण्यासाठी तैनात.

२. १२००० सैन्याने कांसा येथे मुघलाशी लढाई तेव्हा संभाजीराजे २०००० सैन्यानिशी घाटात तयार होते.

३. रामसेज  हल्ला एक तुकडी ७००० सैन्याची व दुसरी १००० ची कुमक.

४. १०००० सैन्य मुघल हद्दीत भीमानदी ओलांडून प्रवेश करते.

५. ६००० सैन्य सोलापूर लुटण्यासाठी संभाजीराजे पाठवितात.

६. ५००० सैन्याचा अहमदनगरवर हल्ला.

७. १००० घोडदळ व २००० पायदळ संभाजीराजे तारापूरवर हल्ला केला.

८. २०००० खनासपूर येथे सैन्य तळ.

९. ६००० पायदळ व २००० घोडदळ येऊलवर हल्ला.

१०. १५००० सैन्य व ५००० घोडदळ फोंडा किल्यावर गोव्यातील मराठा सैनिक २०००० असावे ६०० बंदुकधारी, २०० लोक डोंगरात लपून.

११. ७०० बंदुकधारी, ३०० पायदळ, ४० तोफांनी सांतु हस्तेव्हंवर हल्ला.

१२. १००० घोडदळ व ३००० पायदळाने १६८३ मध्ये सालसत्तेमध्ये प्रवेश.

१३. ७००० घोडदळ ८००० पायदळ कल्याण-भिवंडी जवळ गेले.

१४. २०००० घोडदळ हंबीरराव कोल्हापूर जवळ.

१५. बारलाल ५००० घोडदळ नळदुर्ग येथे गेले.

१६. १८००० सैन्य घेऊन जानराव जागोजी विजापूर बाजूस.

१७. १५०० सैन्य घोडदळ हिंमतराव संगमेश्वरच्या दिशेला.

१८. लोहगड, विसापूर १२००० घोडदळ हजर.

१९. ३०० लोक मुंबईच्या जवळ संभाजीराजे बरोबर

२०. ७००० फौज घेऊन निळोपंत पेशव्याने बऱ्हाणपूर वर छापा.

२१. ८००० सैन्य हरजीराजे यांच्याबरोबर कर्नाटकात.

२२. १२०० घोडदळ केशव प्रिमल जिंजीवर स्वारी.

२३. २००० घोडदळ ५००० पायदळ हरजीराजांच्या हाताखाली (गोवळकोंडा)

२४. २००० घोडदळ, ५००० पायदळ फोर्टसेंट जॉर्जला वेढा.

वरील सैन्याची आकडेवारी पाहिल्यास मराठ्यांच्या सैनिकी सामर्थ्याची कल्पना येते. मराठे सामर्थ्य संख्येने कमी असले तरी युध्दनिति आणि रणनीती संभाजीराजांच्या नेतृत्वाखाली भक्कम असे. साधारणपणे २ लाखाच्या आसपास मराठ्यांचे सैन्य असू

शकते. एकाच आघाडीवरील लोक दुसऱ्या आघाडीवर जात असत. त्यामुळे सैन्याची संख्या निश्चित नोंदविणे अवघड आहे.

### ३.३०.५ नाविक दल

स्वराज्याचे नाविक दल शिवाजी राजांच्यापासून सक्षम आणि मजबूत होते. संभाजीराजांनी नाविक दलाचा विस्तार केला. ते अधिक शक्तीशाली बनविण्याचा प्रयत्न केला. आरमारावरील पूर्ववत साधन सामुग्रीत वाढत केली. याबाबींचा विचार करता मराठ्याच्या आरमारांची कल्पना येण्यास मदत होईल. नाविक दलातील सैनिकाची संख्या निश्चित करणे कठीणच आहे. तरी उपलब्ध माहितीवरून ती संख्या पुढीलप्रमाणे आहे.

१. राजापूर - ५००० सैन्य ६० गलबते आणि गुराबे

२. पेण - ३००० नाविक फौज.

३. सुंदरजी बाजी यांच्याजवळ - ३००० खडी फौज, २२ गुराबे.

४. मुंबई - ५००० सैन्य ८५ गलबते.

५. उंदेरी - ४५ गलबते.

६. थल - ५००० सैनिक (नाविक)

७. दंडाराजापूरी - ४००० लोक

८. सिद्दीमिस्त्री-३० गलबते दौलतखान - ८० गलबते.

९. खंदेरी-३० नायगाव-३५ गलबते.

१०. मुंबई (संभाजीराजे) - १०० गलबते २००० सैनिक.

११. नायगाव नदी-७६ लढाऊ गलबते.

१२. संभाजीराजे ५० लढावू गलबते, १० पाल, ३०० पेक्षा अधिक तोफा.

१३.  कोर्ले, नागोठाणे आणि येऊल-१५००० लोक, १२० गलबते, १५ गुराबे तयार होते.

मराठ्यांच्या आरमारात गोविंद आंग्रे, गोविंददास जाधव, दौलतखान, दादाजी प्रभू देशपांडे, भैया नाईक भंडारी हे नाविक दलाचे अधिकारी होते. कान्होजी आंग्रे यांचे आरमार दल फिरते असे ते सर्व आरमारावर लक्ष ठेवीत.

### ३.३०.६ संभाजीराजांच्या काळातील दारूगोळा व शस्त्रास्त्रे

मराठ्यांच्या रणनीतीचा विचार करता त्यांना अनेक आघाड्यांवर एकाच वेळी लढावे लागत असल्यामुळे खूप दारूगोळा लागत असे यामुळे त्यांना सतत चणचण भासत असे. संभाजीराजे राज्यकारभार पाहण्यास लागल्यानंतर त्यांनी इंग्रजाकडे दारूगोळा आणि तोफांची मागणी केली होती. इ.स. १६८१ ला इंग्रजांनी या मागणीचा पुरवठा मराठ्यांना केला.

इ.स. १६८२ साली संभाजी राजांनी 'कुडाळ' व 'डिचोली' येथे दारूगोळ्यांचे दोन कारखाने काढण्यासाठी लागणारे गंधक, सोरा इत्यादी साहित्य कर्नाटक व मलबार येथून समुद्रमार्गे आणताना पोर्तुगीजांनी विरोध केला. त्यामुळे हे काम पुर्णत्वाला जाऊ शकले नाही.

संभाजी राजांचा राज्यकारभार व प्रशासन व्यवस्था पाहता शिवाजी महाराजांच्या राज्यपद्धतीचे अनुकरण केलेले आहे. त्यांनी घालून दिलेल्या तत्त्वांनुसार राज्यकारभार चालविण्याचे धोरण राबविलेले आहे. सततची ८-९ वर्षे, संघर्ष, लढाया, कौटुंबिक पेच प्रसंग, निकटवर्तीयांची कटकारस्थाने इत्यादी समस्यांना सामारे  जाण्यात संभाजीराजांची सर्व शक्ती व्यथित झाली आहे. त्यातूनही संभाजीराजे स्वराज्य उभारणीसाठी, विस्तारासाठी रात्रंदिवस संघर्ष करताना दिसतात. उत्तम प्रशासन व्यवस्था निर्माण केले. असे असतानाही त्यांना बेबंदशाहीचा जनक म्हणणे उचित नाही. त्यांच्या प्रशासन व्यवस्थेमुळे राजाराम महाराजांना राज्यकारभार करणे सोपे आणि सोयीचे गेले.

### ३.३१ संभाजीराजे : मुत्सद्यांची कट कारस्थाने

शिवाजी महाराजांच्या मृत्यूपुर्वीच अष्टप्रधान मंडळातील स्वार्थी मंडळींनी संभाजीराजा विरोधात कटकारस्थानांना सुरूवात केलेली होती. याचाच भाग म्हणजे संभाजीराजे दिलेरखानास जाऊन मिळतात. यातूनच त्यांच्या बाबतचा मंत्र्यांचा रोष अधिकच वाढतो. मुघलाकडे गेलेल्या राजपुत्राला राजा म्हणून स्वीकारण्यास मंत्री तयार नव्हते. यामागे त्यांचा दुसराच हेतू होता असे दिसते. वयाने लहान असणारा संभाजी कारभारात आल्यानंतर त्याचे आदेश मानावे लागतील. आपल्या कारभारातील उणिवा, भ्रष्टाचार उघडकिस येईल याची त्यांना भिती वाटत होती. यातूनच संभाजी राजाबाबत कारस्थाने सुरू झाली. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर ती अधिक खालच्या स्तराला गेली.

शिवाजी महाराजांनी आपल्या मृत्यूपूर्वी आपल्या राज्यांची भावी व्यवस्था करून ठेवली होती असे वाटत नाही. पण शेजवलकरांनी असा तर्क केला आहे. याबाबत त्यांचे मत 'श्री शिव छत्रपती' या ग्रंथात नोंदविलेले आहे ते असे, "राज्याच्या व सोयराबाई-राजाराम यांच्या हिताच्या दृष्टीने महाराजांनी महाराष्ट्राचे राज्य प्रधानांच्या हाती सोपवून कर्नाटक राज्यावर संभाजी राजाला पाठविण्याचा बेत केला असावा व त्यासाठी त्यांनी मृत्यूपूर्व 'एक अधिकृत कागद' प्रधानांसाठी मागे ठेवला असावा"[५३] शेजवलकरांच्या या नोंदीचा आधार आहे '९१ कलमी बखरीचा' या बखरीतील नोंद वाचल्यास त्यांचा उलगडा होईल. ती नोंद अशी, "राजे स्वामीस वेथा नवज्वर जाला... शके १६०२ रौद्र नाम संवत्सरे चैत्री पौर्णिमा दो प्रहरा राजे स्वामीस कैलासवास जाला... अंतकालसमई मोरोपंत पेशवा व अण्णाजी दत्तो सुरनिवीस व प्रभु चिटणीस होते. तहपत्रे देऊन सावधपणे देह ठेवला"[५४]

या बखरीच्या सत्यतेशी इतिहासकाराचे एकमत नाही. बखरीमध्ये प्रक्षिप्तता अधिक असून मूळात बखरीचा खुलासा भाग असत्य गोष्टींवर आधारित आहे. कारण ज्या मोरोपंत व अण्णाजी दत्तो यांना तहपत्रे दिली ती मंडळी रायगडावर महाराजांच्या मृत्यू समयी नव्हती. यावरून ही गोष्ट सत्य आहे.

## ३.३२ जेधे शकावलीतील नोंद

महाराजांच्या मृत्यू वेळी अण्णाजी दत्तो, मोरोपंत पेशवे हे मुख्य प्रधान रायगडावर नसले, तरी लवकर ते बातमी समजताच आले. अण्णाजी दत्तो प्रथम आला व त्याने पुढे होऊन राजाराम महाराजांचे मंचकारोहण घडवून आणले. एवढ्यात मोहिमेवर असलेला मोरोपंत पेशवेही आला. त्या दोघांनी सोयराबाईशी सल्लामसलत करून संभाजीराजास कैद करण्याची योजना आखली अशी नोंद जेधे शकावलीत आहे. ती पुढीलप्रमाणे, "वैशाख शुद्ध ३ त्रितीयेस राजारामास अनाजीपंत सुरणीस यांनी मंचकी बैसविले. संभाजी राजे यास कैद करू यैसा तह करून मोरोपंत व आपण पनालिवर चालोन गेले"[५५] या नोंदीवरून अधिक स्पष्ट होते. संभाजी राजांच्या 'राजा' होण्यास मंत्र्यांचा विरोध होता. याबाबत जयसिंगराव पवाराचे मत अधिक समतोल आणि वस्तुस्थितीला धरून आहे ते असे, "एकट्या अण्णाजीची ही मसलत होती असे वाटत नाही. तसे त्यास एकट्याने धाडस होणे शक्य नव्हते. सोयराबाईची आपल्या पुत्रासंबंधीची राज्यलालसा होणेही स्वाभाविक होते. मोरोपंत, राहुजी, सोमनाथ, प्रल्हाद निराजी, बाळाजी आवजी इ. गडावरील राजकारणी मंडळी कमी-अधिक प्रमाणात संभाजीराजांच्या विरोधातच होती. अनुपुराणकर्ता तर या प्रकरणी 'मयुरादि कुमंत्री' म्हणून मोरोपंताचाच अनेक प्रसंगी उल्लेख करतो. "[५६] पवारांच्या मतातून मंत्री व सोयराबाई यांच्या संभाजीराजा विषयीच्या कटकारस्थानाची राजकीयदृष्ट्या योग्य बोध होतो. हे कारस्थान राजकीयदृष्ट्या कमकुवत होते. कारण सेनाप्रमुखाशिवाय अशा बाबी यशस्वी होत नाहीत. हंबीरराव मोहिते, संभाजी व हे मिळाल्यामुळे कटकारस्थान फसले. यामुळे महाराष्ट्राला व स्वराज्याला संभाजीराजांसारखा पराक्रमी राजा मिळाला.

या प्रकरणांच्या चर्चेवरून हाती आलेला निष्कर्ष पुढीलप्रमाणे नोंदविता येतील.

१. संभाजीराजांचा एकूण राज्यकारभार पाहता त्यांच्या राज्यकारभारात अंधाधुंदी व गैरकारभार होता. या रूढ मतांना आधार राहत नाही. त्यांची राज्यव्यवस्था पूर्वी प्रमाणेच कार्यरत होती.

२. स्वराज्याची शिवाजी महाराज निर्मित अष्टप्रधान मंडळाची व्यवस्था, पूर्वी प्रमाणेच कार्यरत होती त्यामध्ये संभाजीराजांनी कोणताही बदल केला नाही. 'छंदोगामात्य' हे पद शिवाजी महाराजांच्या पासून होते. संभाजीने निर्माण केले नाही.

३. संभाजीराजांनी स्वराज्यातील महत्त्वाचे निर्णय मंत्रीमंडळ व सरकारकून यांच्या सल्ल्यानेच घेण्यात आलेले आहेत.

४. निळो मोरेश्वर हे प्रमुख प्रधान होते. न्यायनिवाड्याचे सर्व अधिकार प्रल्हाद निराजीकडै होते. यावरून स्वराज्याची जबाबदारी स्वकेंद्रीत नसून विकेंद्रीत होती. संभाजीराजे या सर्वांवर लक्ष ठेवीत पण हस्तक्षेप करत नसत.

५. दानाध्यक्षाचे कार्य प्रारंभी संभाजीराजांनी स्वतःकडे घेतले होते. पण राज्याभिषेकानंतर हे काम मोरेश्वर पंडितराव यांच्याकडे दिले आहे.

६. रायगड राजधानीपासून प्रांत, सुभा, तर्फ व मौजेपर्यंत राज्यकारभार केंद्रापासून अगदी लहान गावापर्यंत व्यवस्थितपणे चालू होता. राजाला प्रधानाला वा मंत्र्याला रयत भेटेल तिथे आपली गाऱ्हाणे सांगत. दुर्गोजी, अर्जोजी यादव, संकराजी सयाजी बांदल इत्यादींच्या तक्रारीवरून हे स्पष्ट होते.

७. शिवाजी महाराजांच्या काळात स्वराज्यातील जमीनीची प्रतवार केली होती. त्याच प्रतिबंदीची अंमलबजावणी संभाजीराजांनी आपल्या राज्यकारभारासाठी स्वीकारली.

८. शिवाजी महाराजांनी इंग्रज, पोर्तुगीज, डच, इत्यादींना ज्या सवलती दिल्या आणि परकीय धोरण स्वीकारले त्या धोरणाचे स्मरण संभाजी राजांनी नेहमी परकियांना करून दिले आणि त्यानुसार आपले धोरण राबविले.

९. इंग्रजांकडून शस्त्रास्त्रे, दारूगोळा इत्यादी युद्ध सामग्री मागविली आणि स्वराज्यांची संरक्षण व्यवस्था अधिक भक्कम केली. इतकेच नव्हे तर स्वत: शस्त्राचे कारखाने काढण्याचा प्रयत्न केला.

१०. वतन ही विक्री करण्याचे साधन नाही हा संभाजी राजाचा विचार शिवाजी महाराजांप्रमाणे होता. शत्रुला मिळालेल्या लोकांची कडक शब्दात हजेरी घेण्यात येईल आणि शरण आल्यास प्रेमाने वागवत.

११. सर्व बाजूने युद्धजन्य परिस्थिती असतानाही देण्या-घेण्याचे व्यवहार व्यवस्थितपणे पाळले जात असत. यावरून संभाजी राजांची राज्यव्यवस्था समजण्यास मदत होते.

१२. संभाजीराजानी आपल्या राज्यकारभारांच्या नऊ वर्षाच्या कारकीर्दीत लढाई, दुष्काळ, राजकीय कलह यासारख्या आपत्ती येऊनही, राज्यकारभार सुरळीत, व्यवस्थित व शिस्तबद्ध चालू ठेवला.

१३. स्वराज्यातील मंत्र्यांनी शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर राजारामास मंचक रोहन केले आणि संभाजी राजांचा राजेपदाचा नैसर्गिक हक्क डावलण्याचा प्रयत्न केला. संभाजी राजांनी अत्यंत कौशल्याने तो पुन्हा प्राप्त केला.

१४. स्वराज्यावर शिवाजी महाराजाप्रमाणे मनस्वी प्रेम संभाजी राजांनी केले.

राज्यकारभाराच्या आढाव्यानंतर पुढील प्रकरणात संभाजीराजाचे धर्मविषयक विचार व स्वराज्य रक्षण आणि एकाकी झुंज या बाबींचा विचार करण्यात येणार आहे.

**संदर्भ सूची :**


१) शिवदे, सदाशिव : ज्वलज्वलनतेजस संभाजीराजा. डायमंड पब्लिकेशन्स पुणे २००१ पृष्ठ : ४१३

२) जोशी, शं.ना. : अर्वाचीन महाराष्ट्रेतिहास कालातील राज्यकारभाराचा अभ्यास (भाग १) पुष्प : ३रे, पुणे विद्यापीठ प्रकाशन, पुणे, १९६८ पृ. २२२

३) साने, का.ना.(संपा) (चिटणीस, मल्हार रा): विरचित श्रीमंत छत्रपती संभाजी महाराज यांचे चरित्र (आ. ३री) भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे १९१५ पृ. १९

४) सरदेसाई, गो.स. : उग्रप्रकृती संभाजी, ऐतिहासिक संकीर्ण साहित्य, खंड-१, ५ वा व ८ वा (मराठी), १७ भा. इ.सं.मं.क्र. ८५ पुणे १९३० पृ. १०३.

५) Sen, Surendra Nath, Administrative system of the Marathas : Publishers, University of Calcutta : १९२३ P. ५५

६) गडकरी, राम गणेश : राजसंन्यास, राजहंस प्रकाशन, मुंबई १९६०, पृ. ४२.

७) बेंद्रे, वा.सी. : श्री. छत्रपती संभाजी महाराज, पार्श्व पब्लिकेशन्स, कोल्हापूर २०१३, पृ. ७३५-७३६

८) गोखले, कमल : शिवपुत्र संभाजी, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे २०१४, पृ. २२२

९) राजवाडे, वि.का. : शिवचरित्र साहित्य (मराठी) खंड = १३, भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे १९१९ पृ. ५५

१०) Trimbak, Vithal : The Judicial system of the Marathas, Pune-Deccan College, Dissertation series-१२, १९५३ Poona P. २१२

११) The Judicial : कित्ता : पृ. २२०

१२) राजवाडे, वि.का. शिवचरित्र साहित्य (मराठी) उ.नि. : खंड- पृ. ३९९

१३) राजवाडे, वि.का. शिवचरित्र साहित्य (खंड १२) कित्ता पृ. ५५

१४) आपटे, द.वि. व दिवेकर स.म.(संपा) : शिवचरित्र प्रदीप (मराठी) ग्रं.मा. ४, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे १९२५ पृ. ३०

१५) आपटे, द.वि. व दिवेकर स.म.(संपा) : शिवचरित्र प्रदीप कित्ता पृ. ३०

१६) राजवाडे, वि.का. (संपा) : भारत इतिहास संशोधन मंडळ त्रैमासिक, आश्विन पौष, शके १८४४ आणि चैत्र शके १८४५ वर्ष ३, अंक २-३-४ पृ. ६२

१७) आपटे, द.वि व दिवेकर, स.म. शिवचरित्र प्रदीप, उनि. पृ. ३२.

१८) राजवाडे, वि.का. (संपा) : श्री समर्थ सांप्रदायाची कागदपत्रे, रामदास आणि रामदासी ग्रंथमालेचे भाग ( पुणे) लेख ५९ मइसा खंड ८ लेख ४० पृ. ४४२.

१९) The tradicial system of the उनि.पृ. २७०.

२०) राजवाडे, वि. का. (संपा): मराठ्यांच्या इतिहासाची साधने (खंड १७) भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे, १९२३ पृ. १४०.

२१) राजवाडे, वि.का. (संपा): मराठा इतिहासाची साधने (खंड १५) कित्ता पृ. ३९.

२२) राजवाडे, वि.का. (संपा) संभाजीकालीन पत्रसार संग्रह (मराठी) भारत इ.सं.मं.स्वीय ग्रंथमाला क्र. ७५ पुणे १९४९ पृ. ४९.

२३) देशपांडे, अ.ना. : ऐतिहासिक संकीर्ण साहित्य (खंउ-५) लेख -२५ भा.इ.सं. मंडळ स्वीय ग्रंथमाला ३५ पुणे १९३०

२४) Factory Records, East India Compay's Records, India office, London (Manuscript : UNP) P-२९३

२५) पारसनीस, द.ब. इतिहास संग्रह (मराठी) मासिक पुस्तक २ अंक ०३ जुलै-ऑगस्ट १९०९ पृ. ०९.

२६) पारसनीस, द.ब. इतिहास संग्रह (मराठी) अंण्ड -३ कित्ता पृष्ठ :२२

२७) साने, का.ना.(संपा) चिटनीस, मल्हार रामराव उनिः पृष्ठ ९

२८) पवार, अप्पासाहेब (संपा) : ताराबाई कालीन कागदपत्रे (खंड -१)

२९) होळकर, सरकार : शिवकालीन पत्रसारसंग्रह सावत्सरिक शिवस्मारक ग्रंथावली शके १८५१ पृष्ठ :३

३०) कुलकर्णी, अ.रा. जेधे शकावली - करीना डायमंड पब्लिकेशन्स, पुणे २००७ पृष्ठ :३१

३१) सरदेसाई, गो.स.:मावळेकर सरदेसाई घराण्याचा इतिहास पार्श्व पब्लिकेशन्स, कोल्हापूर १९३०

३२) राजवाडे, वि.का. : शिवचरित्र साहित्य (मराठी) खंड -५ भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे १९२३ पृष्ठ :८७२

३३) पगडी, सेतूमाधव : मोगल मराठा संघर्ष, चित्रशाळा प्रेस प्रकाशन, पुणे १९६४ पृष्ठ :२८

३४) पगडी, सेतूमाधव : मोगल मराठा संघर्ष, चित्रशाळा प्रेस प्रकाशन, पुणे १९६४ पृष्ठ :२८

३५) गोखले, कमल : शिवपुत्र संभाजी उनि.: पृष्ठः३५४-३५५

३६) राजवाडे, वि.का. : शिवचरित्र साहित्य कित्ता पृष्ठः१३७

३७) राजवाडे, वि.का. : शिवचरित्र साहित्य कित्ता पृष्ठः३९

३८) राजवाडे, वि.का. : संभाजीकालीन पत्रसार संग्रह :उनि. पृष्ठः१५

३९) राजवाडे, वि.का. : शिवचरित्र साहित्य उनि. (खंड -६) लेख -१११

४०) राजवाडे, वि.का. : शिवचरित्र साहित्य उनि. (खंड -२) पृष्ठ:२६८

४१) गोखले, कमल : शिवपुत्र संभाजी उनि.: पृष्ठ:३६०-३६१

४२) राजवाडे, वि.का. : शिवचरित्र साहित्य उनि. (खंड -९) लेख -६३ पृष्ठ:६४

४३) राजवाडे, वि.का. : शिवचरित्र साहित्य कित्ता (खंड -२०) लेख -२७३ पृष्ठ:३९५

४४) राजवाडे, वि.का. (संपा) : भारत इतिहास संशोधन मंडळ त्रैमासिक, आश्विन पौष, शके १८४४ आणि चैत्र शक १८४४ vol.II P-२७-३७

४५) राजवाडे, वि.का. : शिवचरित्र साहित्य उनि. (खंड -१८) पृष्ठ:५४

४६) Dutc Records, Dagh Register : English Records on Shivaji (१६५९ to १६८२) Vol-vi Shiv Charitra Karyalaya poona :१९३१ P-६४१

४७) राजवाडे, वि.का. (संपा): मराठा इतिहासाची साधने (खंड १८) कित्ता पृ. ८१-८२

४८) राजवाडे, वि.का. : भारत इतिहास सं.मंडळ,पुणे उनि (खंड १०) पृ. र२

४९) देव, शं.श्री. रामदास आणि रामदासी (ग्रंथावली भा.०३) जेधे देशमुख भाग ९ राजवाडे सं.मं.धुळे १९६०पृ.४२

५०) वाड, ग.चि., मावजी, पु.वि. आणि पारससि, स.ब. (संपा) दक्षिणेतील सरदारांच्या कैफियती, यादी वगै भा.इ.सं.मंडळ, पूणे:१९२३ पृष्ठ: १०५

५१) राजवाडे, वि.का(संपा) : मराठयांच्या इतिहासाची साधने, उनि.:पृष्ठ :९४

५२) ढेरे, रा.चि.(संपा): आज्ञापत्र पद्मग्रंथा प्रकाशन, पुणे पुनर्मुद्रण

५३) शेजवलकर, त्र्यं.शं. श्रीशिवछत्रपती-संकल्प , शिवचरित्र मराठा मंदीर प्रकाशन, मुंबई :१९६७ पृष्ठ :१५४

५४) वाकसकर, वि.स. : श्री शिवछत्रपतीची ९१ककलमी बखर, डायमंड पब्लिकेशन्स, पुणे २०१२ पृष्ठ:५५

५५) कुलकर्णी, अ.रा. : जेधे शकावली -करीना डायमंड पब्लिकेशन्स, पुणे २००७ पृष्ठः९९-१००

५६) पवार, जयसिंगराव : छत्रपती संभाजी : एक चिकित्सा मेहता, पब्लिशिंग हाऊस, कोल्हापूर २००५ पृ.:७१

*****

# प्रकरण चौथे

# संभाजीराजे : धर्मविचार, स्वराज्यरक्षण आणि एकाकी झुंज

---

**४.१** **तत्कालीन महाराष्ट्र वर्णन : महाराष्ट्र धर्म स्थापना**

**४.२** **बखरीतील धर्मविचार आणि संभाजीराजे**

**४.३** **संभाजीराजांचे दानपत्र**

**४.४** **साधूसंत आणि संभाजी महाराज**

४.४.१ संत तुकाराम महाराजांच्या मुलास वर्षासन

४.४.२ संभाजीराजांना मौनीबाबाच्या धर्मकार्याबाबत आदर

४.४.३ जिवाश्रीतांना साह्य

४.४.४. पुण्यातील गोसाव्यास जमीन दान

४.४.५ कराडच्या गोसाव्यांना वर्षासन

४.४.६ गणपतीपुळे येथील वतन

४.४.७ मोरगाव-मोरेश्वर गोसावी सनद

**४.५** **शहाजीराजे-शिवाजीमहाराज यांच्यापासूनच इनाम**

**४.६** **रामदास स्वामी आणि चापळ**

**४.७** **पंढरपुरच्या वारीला व चापळ यात्रेला संरक्षण**

**४.८** **नवलगुंदच्या दिवाणाने मोकादनामा**

**४.९** **धर्मांतरे रोखण्याचा प्रयत्न**

**४.१०** **येऊलची नि-वारस जमीन देवस्थानाला**

**४.११ संभाजीराजांनी धर्म नाकारलाही, स्वीकारलाही !**

**४.१२ औरंगजेबाचा संभाजीविरूद्ध संघर्ष 'जिहाद' शिवदे म्हणतात**

**४.१३ 'बुधभूषण' वाङ्मयीन श्रेष्ठ रचनानिर्मिती**

४.१३.१ बुधभूषण ग्रंथाची रचना

४.१३.२ मैत्रिभाव जपण्याचा संदेश : बुधभूषण

**४.१४ स्वराज्य रक्षण : संभाजी राजे**

**४.१५ अकल्पित शिवाजी महाराजांचा मृत्यू**

**४.१६ संभाजीराजांना मारण्याचा कट**

**४.१७ महंमद अकबर : स्वराज्यावरील संकट**

**४.१८ सिद्धीची स्वराज्यावरील आक्रमणे**

**४.१९ स्वराज्य आणि शिर्क्याचा कुटील डाव**

**४.२० स्वराज्य आणि हरजीराजे महाडिक**

**४.२१ वर्णव्यवस्थेतील श्रेष्ठ-कनिष्ठत्वाचा संघर्ष**

**४.२२ इ.स. १६८९ : एकाकी झुंज**

**४.२३ मातबरखानाच्या स्वाऱ्या आणि मराठा सरदाराचे अमिषाला बळी पडणे**

**४.२४ रायगडची मेणाची प्रतिकृती**

**४.२५ मुकर्रबखानाची संभाजीराजांवर स्वारीची तयारी**

# प्रकरण चौथे

# संभाजीराजे : धर्मविचार, स्वराज्यरक्षण आणि एकाकी झुंज

स्वराज्याचा विचार करता, संभाजीराजे स्वराज्याचे सर्वेसर्वा होते. राजा होते. प्रजेचे पालनकर्ते होते. त्यांच्या जीवनातील विचारांना, कृतीला अनन्यसाधारण महत्त्व होते. यादृष्टीने विचार करता ते धार्मिक वृत्तीचे होते असा निष्कर्ष काढतांना त्यांना 'धर्मवीर' ही पदवी जोडण्यात आली. याचा सरळ-सरळ अर्थ असा होतो, संभाजीराजे धर्मव्यवस्थेच्या रक्षणासाठीच लढत होते. त्यांचे राज्य धर्मव्यवस्थेच्याच उद्देशाने वाढविले होते. तत्कालीन काळातील हिंदूधर्म व्यवस्था वैदिक पंडितांच्या हातात होती. असा धर्म म्हणजे 'वैदिक धर्म' रक्षणासाठी राजांचे सर्व प्रयत्न चालले होते. संभाजीराजांच्या राज्यव्यवस्थेचा विचार करता असे दिसत नाही. त्यांची राज्यव्यवस्था मानवजातीच्या उद्धारासाठी, कल्याणासाठी प्रयत्नशील होती.

संभाजीराजांनी देवालयांना, मठांना आणि साधू-संतांना पत्रव्यवहार, दान आणि भेटी दिलेल्या आहेत. याबाबीचा अर्थ धर्मव्यवस्थेशी लावणे ऐतिहासिकदृष्ट्या योग्य होणार नाही. त्या-त्या गोष्टींचा, घटनांचा आणि कृतीचा तपशीलात जाऊन, शोध घेऊन अर्थविश्लेषण करणे योग्य होईल. या दृष्टीने या प्रकरणात संभाजीराजांच्या धर्मविचारांचा आढावा घ्यावयाचा आहे.

### ४.१ तत्कालीन महाराष्ट्र वर्णन : महाराष्ट्र धर्म स्थापना

तत्कालीन महाराष्ट्राची सामाजिक, राजकीय परिस्थिती अस्थिर, सत्ता, वतन, जहागिरी इत्यादी लालसेने सरदार सत्तासंघर्ष, अनिष्ठा दाखवत असत. महाराष्ट्रापेक्षा सरदारांच्या मनात स्वतःचा स्वार्थ अधिक होता. अशा स्वार्थी सरदारांना आपल्या काव्यातून महाराष्ट्र धर्माच्या रक्षणाबाबत रामदास स्वामी म्हणतात,

"मराठा तितुका मेळवावा | महाराष्ट्र धर्म वाढवावा ||
ये विषयी न करता तकवा | पूर्वज हासती ||
मरण हाक तो चुकेना | देह वाचविता वाचेना ||
विवेकी होऊनि समजाना | काय करावे ||
देवद्रोही तितुके कुत्ते | मारूनी घालावे परते ||
देवदास पावती फत्ते | यदर्थी संदेह नाही ||
देव मस्तकी धरावा | अवघा हलकल्लोळ करावा ||
मुलुख बुडवा की बडवावा | धर्मस्थापनेसाठी ||"[१]

वाढविण्याचा विचार आणि त्यासाठी सर्वांनी एकत्र येऊन प्रयत्न करावे. हा विचारही महाराष्ट्राच्या प्रगतीच्या दृष्टीने येताना दिसतो. पण समाजसमतेच्या, समाज प्रगतीच्या बाबत या विचाराला मर्यादा आहेत, हे अधिक विचारपूर्वक पाहिल्यास स्पष्ट होते. महाराष्ट्रातील सर्व समाजाच्या रक्षणाची जबाबदारी महाराष्ट्र धर्मातून सूचित होत नाही तर देवद्रोही लोकांना नाहीसे करावे आणि देवधर्माचे रक्षण करावे हा मर्यादित विचार व्यक्त झाला आहे. वेद, स्मृती, पुराण इत्यादींनी ब्राह्मण वर्णास भूमिवरील 'देव' संबोधले आहे. या बाबींचा विचार करता महाराष्ट्र धर्माचे स्वरूप स्पष्ट होण्यास मदत होते. दासबोधातील अन्य श्लोक पाहिल्यास काही बाबी स्पष्ट होतात. 'किती झाला भ्रष्ट, तरी ब्राह्मण तीन्ही लोकी श्रेष्ठ' हा श्लोक पाहिल्यास अधिक स्पष्टीकरण द्यावयाची आवश्यकता वाटत नाही. ब्राह्मण वर्णाचा असल्यास सर्व गुन्हे माफ अशी भूमिका घेणारे समर्थ. सर्व साम्राज्याच्या कल्याणाची भूमिका ते घेत नाहीत हे मात्र स्पष्ट आहे.

दासबोधामध्ये तत्कालीन काळातील सामाजिक, राजकीय आणि धार्मिक क्षेत्रातील मार्मिक विवेचन वर्णन आलेले आहे. या दृष्टीने ऐतिहासिक स्थिती समजण्याच्या दृष्टीने हा ग्रंथ महत्त्वाचा आहे.

## ४.२ बखरीतील धर्मविचार आणि संभाजीराजे

तत्कालीन काळातील बखरीतील संभाजीराजाबाबत आलेले धर्मविचार समतोल, सर्व -समावेशक आलेले नाहीत, तत्कालीन काळातील वैदिक धर्म विचारांचा प्रभाव वैदिक व शाक्त पंथातील छुपा उघड असणारा संघर्ष स्पष्ट झालेला आहे. हा संघर्ष संभाजीराजांच्या काळातच निर्माण झाला होता. असे नसून तो शिवाजी महाराजांच्याही काळात असताना दिसतो. दोन्ही राज्याभिषेक पाहता संघर्ष अधिक स्पष्ट होतो. 'नवभारत' मधील विवेचनात नोंदविलेली नोंद पुढीलप्रमाणे, "...त्यावेळी पुरोहित वर्गात दोन प्रतिस्पर्धी तट होते. एक वैदिक सांप्रदायिक व दुसरा तांत्रिक शाक्त संप्रदायांचा. पहिल्या राज्याभिषेकाचे पौरोहित्य वैदिक सांप्रदायिक गागाभट्टाला दिल्याने तांत्रिक सांप्रदायिकांचे पुरस्कर्ते अर्ध्वयू निश्चलपुरी ह्यांचा पित्तप्रकोप झाला. त्यातच पहिल्या राज्याभिषेकाच्या समारंभप्रसंगी निश्चलपुरींनी धाडलेल्या तांत्रिक भिक्षुकांचा अपमान झाला व त्या समारंभानिमित्त जो दानधर्म वैदिक भिक्षुकांना करण्यात आला होता, त्यात ह्या तांत्रिक भटा भिक्षुकांची पंढरी न पिकल्याने तो निश्चल महाराजांचा रोष झाला. ह्याची भरच पडली. निश्चलपुरीच्या मते पहिल्या राज्याभिषेकाच्या पाठोपाठ स्वराज्यावर जी संकटपरंपरा कोसळली तिला कारणीभूत असणारी गोष्ट म्हणजे भूतपिशाचादी आणि देवतादी अदृश्य सृष्टीतील प्राण्यांची तांत्रिक विधीनुसार थातुरमातुराद्वारे 'सुधाशांति' करण्यात झालेली कुचराई किंवा गल्लत होय. ह्या अनर्थपरंपरेने गांगरून जाऊन व तिचा प्रतिकार किंवा निरसन व्हावे ह्या विचाराने शिवाजी राजांचा दुसरा राज्याभिषेक तांत्रिक विधीनुसार करवून घेण्यास संमती दिली. निश्चलपुरीने अशा प्रकारे आपला कार्यभाग (मतलब) साध्य झाल्याचा समाधान सुस्कार सोडून..."[२] राव यांच्या मताचा विचार करता तत्कालीन काळातील पुरोहित वर्गाचा संघर्ष स्पष्ट होतो. यामुळे शिवाजी महाराजांनी अधिकृत राजमान्यता प्राप्त होण्यासाठी दोन्ही विधी करून घेतले.

तत्कालीन दोन सांप्रदायाच्या संघर्षाचा विचार करता बखरकार वैदिकाचा पक्ष घेतांना दिसतात. याच दृष्टीकोनातून संभाजीराजे आणि त्यांचा सेवक कवीकलश यांच्याकडे त्याच दृष्टीने पाहत असल्याचे दिसते. बखरकारांनी निर्माण केलेला पक्षपाती विचार इतिहास लेखनाचा आधार झाला आणि सत्य इतिहासपर्यंत पोहचू शकले नाही. या दृष्टीने 'मल्हार रामराव चिटणीस' बखरीतील उतारा उदाहरणादाखल पाहणे उचित ठरले. तो असा, "कवि कलुषा कबजी म्हणोन कनोजी ब्राह्मण बहुत विद्वान, मंत्रशास्त्रविद्या आगम, त्यास बहुत गम्य असे होते. त्यांची स्त्रीही चतुर होती. त्यांनी महाराज वश करावे म्हणून वशीकरण मंत्र प्रयोग करून महाराजांची बहुत जवळीक व कृपा संपादून अगोदर समीप राज्याभिषेकापूर्वीच होतेच वशीकरण मार्गाविशी अनुष्ठाने, प्रयोग, संपत्ती करणे व राज्यवृद्धी होणे, यश येणे असे समजून प्रयोग अनुष्ठान करविले. पुढे दिवसेंदिवस बुद्धीस भ्रंश पडून त्या मार्गात अनुसरावे असे केले. रेडे मारून त्याचे ओले कातड्यावर अनुष्ठाने व मद्यमांस पशुवधाची बहुत करू लागले. ब्राह्मणापासून प्रयोग करविणे यात महाराजांचे अंत:करण बहुत व्याप्त जाहले. कोणीहे करणे युक्त नव्हे असे बहुत सांगुन कळविले असता त्यासच दरबार मान करून कैद करावे असे होऊ लागले."[३]

यावरून बखरकारांचा सांप्रदायिक रोख समजण्यास मदत होते. त्याचा रोख शाक्तपंथाबाबत विवेकी अथवा समतोल नाही. संभाजीराजे कविकलशाच्या संगतीने बिघडले आणि अघोरी, किळसवाणी मंत्रतंत्र यासारख्या गोष्टीच्या कृत्यात गुंतले. मद्यपान करू लागले. यासारख्या नोंदीवरून बखरकारांची शाक्तांबाबतची मानसिकता समजते. संभाजीराजे वैदिक वा शाक्त यांच्या कर्मकांडाला मनापासून मान्यता वा मानत नव्हते. दोन्ही संप्रदायाबाबत राजा या नात्याने पुण्यभाव होता. दोहोंतील पुरोहितांनी सांगितलेल्या विधी करत असत. याचा इतकाच अर्थ घेणे संयुक्तिक ठरले. बखरकारांच्या नोंदीबाबत 'कमल गोखले' म्हणतात, " चिटणीस बखरीत केलेले शाक्त पंथ, संभाजी आणि कविकलश यांचे वर्णन अतिशयोक्तीचे आणि एकांगी वाटते. शाक्त पंथातील हिडीस प्रकार

शृंगारपूरला चालू असते तर शिवाजी महाराजांनी, आपल्या गैरहजेरीत, आपण होऊन संभाजीला शृंगारपुरला ठेवले नसते. महाराजांच्या राज्याभिषेकापूर्वीच शिवयोगी शृंगारपूरला येऊन राहिलेला होता. आणि तेव्हापासून वैदिक ब्राह्मण आणि शाक्त ब्राह्मण यांचा महाराष्ट्रात तंटा सुरू होता."[४] बखर वाङ्मयात वैदिक व शाक्त या पंथाबाबत कमल गोखले यांनी नोंदविलेले मत योग्य आहे. बखरकारांची शाक्तपंथाबाबत पसरविण्यात येणारी मांडणी चुकीची असल्याची भूमिका योग्य आहे. शिवाजी महाराज अशा ठिकाणी आपल्या मुलाला ठेवण्यास तयार झाले नसते. हाही अभिप्राय वस्तुनिष्ठ स्वरूपाचा आहे.

### ४.३ संभाजीराजांचे दानपत्र

राज्यपद प्राप्तीनंतर आपण देवालयांच्या नावाने दानपत्र करेल असा संकल्प संभाजीराजांनी बोलावून दाखविला होता. प्रत्यक्ष राज्यपद प्राप्त झाल्यानंतर त्यांनी दानपत्र करून दिले. म.म. पोतदार यांच्या संग्रही हे संस्कृत दानपत्र आहे. शक १६०२ भाद्रपद शुद्ध १० सोमवार (म्हणजे इ.स. १६८० ऑगस्ट २४, जंत्रीत वार मंगळवार नोंदविला आहे.) "मतं मे शिवपुत्रस्य श्रीशंभुराज छत्रपते यदप्रोवरी लिखितम् || छ || श्री || असे नोंदविले आहे ते सर्वार्था योग्य, न्याय परंपरेला मान्य असेच आहे. या दानपत्रावर संभाजी 'श्री शंभोः शिवजातस्य' ही मुद्रा दानपत्र लेखनास संमति दिल्याचे लेखन केले आहे. स्वराज्यांचा कारभार परंपराबद्ध चालत आलेला होता असे सूचित होते. "[५] या दान पत्राचे मराठी भाषांतर कमल गोखले पुढीलप्रमाणे देतात ते असे,[६] "(१६ बुरजी पिंपळपांनी शिक्का 'श्री | शीीः शिव | जातस्यमुद्राद्यौ | रिव जायते || यदं | क सेविनो लेखा | वर्तते करय नो | परि' सात ओळींचा)

|| मनं मे श्री शिवराजपुत्रस्य श्री शंभुराज ||

|| छत्रपतेः यदत्रोपरिलेखितं || छं || श्री ||

जामदग्न्यगोत्री, कऱ्हाडे, बाकरे आडनावाचे, रामक्षेत्रातील (परशुराम क्षेत्र, कोकण) कुडाळ गावचे, नामदेव भट्टाचे पुत्र, अश्वलायन सूत्री, ऋग्वेदा-न्तर्गतशाकाल शाखाध्यायी, श्रेष्ठ मात्रिक महाशयस्वामी यांना शिखर शिंगणापूरच्या- यात्रेला गेला असताना, शूराग्रण्य देवब्राम्हण प्रतिपालक मालोजी राजे यांचा पणतू (प्रपोत्र), रात्रियुध्दप्रवीण, निजामशाहीतील श्रेष्ठ प्रधान मलिकंबर यांचा पराभव करणारा, स्वतःचा जीव धोक्यात घालून देवालयांचे रक्षण करणारा, शंकराचे कृपास्थान (शहाजी), मोंगल इत्यादींचा काळपुरूष, हैंदवी धर्माचा जीर्णोध्दार करणारा अशा श्री. शहाजी राजांचा नातू, प्रबळ अफझलखानाला बिछू (बिचवा) च्या सहाय्याने मारून त्याच्या रक्ताने न्हालेला, पंचाहत्तर हजार घोडदळाने वेढलेला, पराक्रमी राजपुत्रांनी संरक्षिक अशा दिल्लींद्राचा मामा (शाहिस्तेखान) याचा पराभव करणारा, म्लेच्छांच्या क्षयाची दिक्षा घेतलेला, विजयपुराधीश्वरादिकांना खंडणी द्यावयास लावणारा, कर्नाटक राज्य जिंकणारा क्षेत्रिय कुलावतंस महापराक्रमी अशा श्री छत्रपती शिवरायांचा पुत्र, अनेक देवतांच्या प्रार्थनेने जन्माला आलेले, दिल्लीपतीने केलेल्या मल्लयुध्दाच्या आज्ञेचा भंग सोडला तर आपल्या अत्यंत गोड भाषणाने दिल्लीश्वराचे चित्र आकृष्ट केले, चक्रवर्तित्वाची सामुद्रीक चिन्हे धारण करणारे, सुरू झालेल्या प्रबल वैरात प्रविष्ट झालेल्या दुष्ट मंत्र्यांच्या 'जेष्ठ पुत्राला राज्यदान करू नये' या दुष्ट सल्ल्यामुळे जिचे ह्दय कलुषित झाले आहे, वस्तुतः निळ्या पिवळ्या पार्श्वभूमीत असलेल्या स्फटिकमध्याप्रमाणे जिचे ह्दय स्वच्छ, सौजन्ययुक्त आहे, अशा राणीविषयी पक्षपातामुळे शिवराजाचे मत आपल्या विरूद्ध असल्याचे समजुन सुद्धा केवळ तेवढ्याच कारणाने पितृभक्तीत अंतर पडू न देणारे, कर्तव्यपालनात दाशरथी रामाचा विक्रम गाजविणारे, पायाशी असलेली दीडकोटी संपत्ती, अनेक किल्ले आणि राजपद यांना तृणाप्रमाणे तुच्छ मानून त्याग करणारे, बरोबर थोडे घोडेस्वार घेतले होते. तथापि औरंगजेबाच्या घोडदळाच्या सेनापतीशी संगनमत करून त्याचेकडून सात हजार घोडेस्वार मिळवून त्यांच्या बहावर भूपाळ किल्ला ज्यांनी सर केला, दलेलासुन (दिलेरखान) याने

गुडघा लावल्यामुळे संतप्त झालेल्या कवी कलशाच्या प्रोत्साहनाने लाल झालेल्या डोळ्यांनी इष्ट देवतेची अनुज्ञा ज्यांनी मिळविली आहे अशा शंभूराजांनी शके १६०२ रौद्रनाम संवत्सर, भाद्रपद शुद्ध १० सोमवार या काळी झालेल्या राज्यप्राप्तीच्या वेळी आश्वासिलेले, राज्याभिवृद्धी वगैरे फलांच्या सिद्धीसाठी गुरूपादुका पूजनपूर्वक श्रीपादुकापूजनाच्या निमित्ताने केलेले, २४ गुंजा सोन्याचे एक या प्रमाणे १० हजार सुरती नाण्यांचे दान दरवर्षी स्वतः (शंभूराजे) व स्वामी (महाशयस्वामी) यांच्या पुत्रा पौत्रादिपरंपरेने अनुक्रमे चालवावे व उपभोगावे (यापूर्वीचे) स्वामींचे वर्षासन यातच अंतर्गत समजावे.

नारायणध्वरींद्रस्य रघुनाथमिधः सुतः | आत्मात्यो दानपत्रेस्मिन्लेखनालंकृति व्यधात् | लेखनालंकार

संमत आबाजी

सोनदेऊ सचीव

चंद्र ११ मास भाद्रपद

मास भाद्रपद उर्फ साबान

सन इहिदे समा बनि अलफ

बार सुद बार शुध बार

अनुमर्त च दानाध्यक्ष मोरेश्वर पंडितरायास्य शुभमस्तु छ

लक्ष्मी नृसिंहभक्त श्रीनीरेरायोयाब्धिसन्मणेः || प्रल्हादवर्धिनी मुद्रा प्रल्हादस्य

विजृंभते मर्यादेयं विजयते (वाटोळा शिक्का)

शिवाजी महाराज यांनी सुरू केलेली वा स्वतः नव्याने सुरू केलेली दानपत्र चालू ठेवली यामागे सामाजिक हेतू होता. समाज धर्माच्या निमित्ताने एकत्र येतो. त्याच्या धर्मकार्यास राज्यांच्या वतीने सहकार्य करणे हे राजांचे प्रजेबद्दल कर्तव्य आहे. राजाने ते पार

पाडणे महत्त्वाचे असते. केवळ एकाच धर्मासाठी नसून राज्यांत येणाऱ्या सर्व धर्मियांच्या कार्याची काळजी राजाला घ्यावी लागते. राजकर्त्याला रूढार्थाचा धर्म नसतो. म्हणून राजधर्माला रूढ धर्म जोडणे योग्य नाही. यामुळे राजाच्या व्यापक कार्याला विशिष्ट जात, धर्म वा पंथामध्ये बंदीस्त केल्यासारखे होते. असाच काहीसा प्रकार भारतीय संस्कृतीमध्ये व्यक्तीपुजेमुळे घडून येताना दिसतो.

### ४.४ साधूसंत आणि संभाजी महाराज

संभाजी राजांनी देवळांना, देवसेवकांना, पुरोहितांना साधू-संत इत्यादींच्या संरक्षणाची काळजी घेतली. त्याचबरोबर ते करत असलेल्या धर्मकृत्याबद्दल त्यांना उदर निर्वाहाची व्यवस्था केली. त्यासाठी त्यांच्या कुटुंबाला वर्षासन, जमीनदान, काही वेळा दरमहा रक्कमही देण्याची व्यवस्था केली. यातून त्यांचे धर्मविषयक धोरण कर्तव्य आणि प्रजेच्या हिताची काळजी दिसून येते. त्यांना विविध साधुसंताचा सहवासही लाभला. त्याबाबतचे तपशिल पुढील प्रमाणे.

शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर वारसा कलहाने संभाजीराजांचे मन व्यथित झालेले होते. आपल्या माणसांच्या समोर विरोधक म्हणून उभे राहताना त्यांचे मन व्याकुळ झाले. पण राजधर्माचा संघर्ष वारसा हक्काच्या दृष्टीने स्वराज्य रक्षणाच्या दृष्टीने अपरिहार्य होता. त्या रणांगणातून दूर जाणे, स्वनाशाचे, स्वराज्य द्रोहीपणाचे ठरले असते. यासाठी संभाजीराजांनी कुटील मंत्र आणि सावत्र आई यांच्याशी वारसा हक्काचा संघर्ष स्वीकारला. त्या दुःखद मनस्थितीत त्यांना संतमहंताचा आशीर्वाद हवा होता, "पन्हाळयावरून रायगडाला जाताना ते मौजे कोरटी येथे रूद्रावती मल्हार गोसावी यांना भेटले." गोसाव्यांच्या निर्मळ स्वभावामुळे संभाजीराजे प्रभावित झाले. त्यातून त्यांच्या श्रद्धेपेक्षा राज्यातील संतांच्या प्रती असणारा आदरभाव आणि मनाची विशाल नम्रता दिसून येते.

संभाजीराजे मुस्लीम फकीर बाबांनाही खुप मानत असत. त्यांची श्रद्धा धार्मिक स्वरूपाचा नसून समाजासाठी करत असलेल्या समाज प्रबोधनाच्या कार्याबाबत ही श्रद्धा

असते. संत समाजाकडून कोणत्याही गोष्टीची अपेक्षा करत नसतात, याची पूर्ण कल्पना संभाजीराजांना होती. "दि. १९.१०.१६८० रोजी या बाबा याकूद अवलिया फकिर यांची शिवाजी महाराजांनी स्थापना केली होती? त्या समाधीचे संभाजी महाराज यांनी केळशी येथे दर्शन घेतले व २५-१०-१६८० रोजी ते रायगडला परत आले."[७] यातून शिवाजी महाराज, संभाजीराजे यांच्या मनातील धर्म सहिष्णूता आणि निस्वार्थी साधूबाबत असणारी आशा स्पष्ट होते. भारताच्या सांस्कृतिक इतिहासामध्ये मुस्लीम फकिर संताचे खूप मोठे योगदान आहे. त्याचा धर्मसमतेचा आणि मानवतेचा विचार त्यांच्या अभंग रचनेमध्ये ह्दयस्पर्शी भावनेने भरलेला आहे. या विचारमूल्यावर संभाजीराजांची श्रद्धा होती. सनातन धर्मावर त्यांची श्रद्धा नव्हती, हेही स्पष्ट होते.

शिवाजी महाराजांनी विविध देवस्थाने, मठ, संतपुरूष यांना वार्षिक मोईन चालू केल्या. संभाजीराजांनी राज्यकारभाराची सुत्रे हाती घेतल्यानंतर स्वतः ती व्यवस्था जशीच्या-तशी चालू ठेवली. यातून त्यांचे धर्माविषयी असणारी सहिष्णूता आणि साधूसंतांच्या प्रती असणारी पूज्यभावना प्रतिबिंबीत होते. दानधर्म म्हणून या कृत्याला अनन्य साधारण महत्त्व आहे. अशा कृत्याला विशिष्ट धर्ममूल्य जोडणे हिताचे नाही. यामागे त्यांचा व्यापक विचार होता हे स्पष्ट होणे महत्त्वाचे आहे. आजच्या राष्ट्रहिताच्या, राष्ट्रीय एकात्मतेच्या दृष्टीने महत्त्वाचे आहे. संभाजी राजांच्या धर्मविचाराचा, कृतीचा विपर्यास करण्यात आलेला आहे. त्यामुळे अधिक विस्तारपूर्वक चर्चा करणे महत्त्वाचे आहे.

### ४.४.१ संत तुकाराम महाराजांच्या मुलास वर्षासन

संत तुकारामांच्या मृत्युनंतर त्यांची पत्नी देहू सोडून माहेरी जाते. तेव्हा देहूतील रामेश्वर भट्ट व मंबाजीभट्ट धर्मशास्त्रानुसार संत तुकारामांची जमीन हडप करतात. जेव्हा त्यांची पत्नी देहू सोडून गेली तेव्हा ती गरोदर होती. त्यांना माहेरीच 'महादेव' नावाचा मुलगा होतो. संभाजीराजे संत तुकारामांच्या कार्याशी परिचित असतात. त्याचे समाज उद्धाराचे कार्य मोलाचे असल्याचे मनोमन जाणत होते. भीतीच्या छायेखाली गेलेल्या तुकाराम

महाराजाच्या पत्नीला, मुलांना पुन्हा देहुत आणले जाते आणि वर्षासन लावून दिले जाते. याबाबतची नोंद पुढीलप्रमाणे, "दि.१९-८-१६८० रोजी संभाजी राजांनी पुण्याच्या विनायक उमाजी या देशाधिकाऱ्याला लिहून संत तुकाराम महाराजांचा मुलगा महादोबा यास वर्षासन दिले."[८] हे वर्षासन देण्यामागील संभाजीराजाचा उदात्त आणि व्यापक विचार असल्याचे स्पष्ट होते. संत तुकारामाचे भागवत धर्मातील योगदान संभाजीराजे जाणत होते. याचाच परिणाम म्हणून त्यांनी त्यांच्या पत्नीची, मुलाची काळजी घेतली.

### ४.४.२ संभाजीराजांना मौनीबाबाच्या धर्मकार्याबाबत आदर

संभाजीराजांचा साधू-संताच्या बाबतीतील दृष्टीकोन उदात्त आणि सर्वधर्म सहिष्णूवादी होता, याचा प्रत्यय वारंवार त्यांच्या राजकीय विचारातून वा कृतीतून स्पष्ट होतो. त्यांनी हिंदू धर्मातील संतांची जात-धर्म पाहून वर्षासन, मदत दिली नाही; तर त्यांचे धर्मविषयक सर्वसमावेशक विवेकीविचार पाहिले. तसेच त्यांनी मुस्लीम फकिरांचासुद्धा धर्म पाहिला नाही. ते करत असलेले सामाजिक-धार्मिक कार्य समाजाला जोडणारे, धर्माचे विकसनशिल पूर्ण जीवन या बाबी संभाजीराजांना समाज संघटन, सामाजिक ऐक्य, सलोखा या दृष्टीने महत्त्वाच्या वाटल्या. "पाटगावच्या मौनी गोसावी हे ईश्वर पुरूष होते. त्यांना वाजंत्री व पालखी होती. याला गोसाव्यासाठी त्याचा शिष्य तुरूतगिरी यास १२५ होन देण्यास सांगितले. त्यातले वाजंत्रीसाठी २५ आणि भोयासाठी १०० होन होते. ते काम सुरू करतील तेव्हापासून ते त्यांना वार्षिक मिळावयाचे होते."[९]

मौनीबाबा यांच्या बाबत फारशा गोष्टी ज्ञात नाहीत. ते हिंदू-मुस्लीम ऐक्यांच्या दृष्टीने खूप प्रयत्न करत. त्याचे खुपसे शिष्य हिंदूप्रमाणे मुस्लीम ही होते.

### ४.४.३ जिवाश्रीतांना साह्य

संभाजीराजाचे स्वराज्यावर अत्यंत बारीक लक्ष होते. स्वराज्यातील सर्व अडचणी त्यांना ज्ञात होत्या. त्या अडचणी सामान्य असल्या तरी त्यात लक्ष घातले जात असे. याचा प्रत्यय संभाजीराजांच्या राज्यकारभारावरून येतो.

"कराडचे वे. नरसीभट शेटभट, मुंज्यमणी, मसूर तालुक्यातील कांदळगावचे वे. अनंतर भट, महादेव भट यांना प्रतिवर्षी जोंधळे व तांदुळ देण्यात आले"[१०] सामान्यातील सामान्य अडचणीही सोडविण्यावर राजांचे लक्ष असे. यातून त्यांची राज्यदक्षता दिसून येते. या दृष्टीने आणखी एक उदाहरण महत्त्वाचे आहे. ते पुढील प्रमाणे, "महाबळेश्वरचे वेदमूर्ती रामभट याचे वडिल गोपाळभट यांनी शिवाजी महाराजांना मंत्रोपदेश देऊन त्याप्रित्यर्थ अनुष्ठान केले होते. त्यांना पूर्वीप्रमाणे वर्षासन देऊन संभाजी महाराजांनी रोख रक्कम आणि जिन्नसही दिले."[११] संभाजी राजांच्या मनातील प्रजेबाबतचा करूणाभाव दिसून येतो. पोटासाठी कोणी अडचणीत असेल तर स्वराज्याच्या खर्चातून त्यांचा खर्च भागविला जात असे.

### ४.४.४. पुण्यातील गोसाव्यास जमीन दान

पुण्यातील गोसाव्याला जमीन दान दिल्याची नोंद तत्कालीन कागदपत्रातून उपलब्ध होते. ती नोंद पुढीलप्रमाणे, " पुणे परगण्यातील तर्फ निरथडी येथे कन्हेरी मठात वासुदेव गोसावीचे वास्तव्य होते. त्यांना जिराईत जमीन ९ कास रूके, पुष्पवाटिकेस मांढदेवातील ४ बिघे आणि जावळीपैकी ९ बिघे जमीन देण्याचा वाईच्या देशाधिकाऱ्याला हुकूम दिला."[१२] देऊळाच्या देखभालीसाठी जमीनीसारखी वतने देण्याचा प्रघात तत्कालीन काळात होता. संभाजीराजांनी तो पुढे तसाच चालू ठेवला. या माध्यमातून त्यांनी पुण्याच्या गोसाव्यास जमीन दिलेली आपणास दिसते.

गोसाव्याच्या उदर निर्वाहाची खूपशी काळजी संभाजी राजांनी आपल्या राज्यव्यवस्थेत घेतलेली आहे. यावरून त्याचे धार्मिक कार्य व राज्यकारभारातील बारकावे लक्षात येतात.

### ४.४.५ कराडच्या गोसाव्यांना वर्षासन

संभाजीराजांनी कराडच्या गोसाव्यांना वर्षासन दिल्याची दोन उदाहरणे सापडतात. यावरून पूर्वीप्रमाणे धार्मिक क्षेत्रातील राजाची जबाबदारी या बाबतची जाणीव स्पष्ट होते.

या दृष्टीने ही उदाहरणे महत्त्वाची आहेत. "कऱ्हाडला राहणारे शिवभट निळकंठ भट अग्निहोत्री, पावसचे वेदमुर्ती हरिभट पटवर्धन, रामचंद्र केशवभट पंडित, निंब येथील सदानंद मठाचे अनंतगिरी गोसावी यांना वर्षासनाच्या सनदा दिल्या"[१३] या सनदा संभाजीराजांच्या राज्यकर्तव्याची साक्ष आहे. या दृष्टीने आणखी एक महत्त्वाचे उदाहरण महत्त्वाचे आहे ते पुढीलप्रमाणे, "कऱ्हाडला राहणारे रूद्रभट नीलकंठ भट अग्निहोत्री आणि खानापूरचे श्रीनिवास आप्पा जोशी कटकरा या दोघांची जमीन व काही रक्कम अनामत करण्यात आली होती. ते दोघे निराश्रीत झालेले पाहून त्यांना दरवर्षी जोंधळे, तांदुळ देण्यासाठी मोरेश्वर पंडितरावाने १६८१ च्या मार्च आणि मे महिन्यात पत्रे लिहून त्यांची व्यवस्था केली."[१४] निराश्रीतांना साह्य करण्याचा स्वराज्यातील रिवाज शिवाजी महाराजाप्रमाणे संभाजी राजांनीही अस्थापूर्वक चालू ठेवला. यावरून त्यांचे धर्मकार्य समजण्यास मदत हाते.

### ४.४.६ गणपतीपुळे येथील वतन

संभाजीराजांनी गणपतीपुळे देवस्थानाची पुजाअर्चा आणि नैवेद्य करणाऱ्या पुजाऱ्यास जमीन दानपत्र केले. याबाबतची नोंद कागदपत्रात उपलब्ध होते ती पुढीलप्रमाणे, "शिवाजी महाराजांनी महादेव भट विष्णुभट शेटचे हे पुराणवेत्ते आहेत असे जाणून त्यांना श्री. गणपती पुळयास देवासमोर नेहमी पुराण सांगण्यासाठी कृती आणि घर बांधावयास व शाकभाजी करावयासाठी वतनी जमीन दिली होती. पुढे संभाजीराजांनी त्यांचा मुलगाही योग्य वैदिक ब्राह्मण आहे असे पाहून त्याला मोरेश्वर पंडितरावांकडून दि. २४.१०.१६८४ रोजी कोठी मापे दहा मण धान्य दिले."[१५] संभाजीराजे यांचे धर्मदायाचे कार्य राजा म्हणूनही श्रेष्ठ दर्जाचे आहे. आपल्या राज्यात धर्मकार्य करणाऱ्या लोकांना योग्य आश्रय दिला. धर्माच्या माध्यमातून सनातन धर्म वाढविण्यासाठी नाही, तर धर्म समता, सहिष्णूता वाढविण्यासाठी धर्म कार्य करणारांना आश्रय दिला.

### ४.४.७ मोरगाव-मोरेश्वर गोसावी सनद

शिवाजी महाराजांनी आपल्या राज्यकारभारात चालू केलेली सनद संभाजीराजे पुढे चालवत असत. त्याबाबतची योग्य ती सर्व माहिती घेतली जात असे. त्याचप्रमाणे मोरगाव येथील सनद चालू ठेवल्याची नोंद प्राप्त होते. सनद चालू ठेवण्यासाठी पुण्याच्या सरसुभेदार नागोजी बल्लाळ याने सुपे व इंदापूर येथील हवालदार आणि कारकून यांना दि. ७.२.१६८१ रोजी लिहिले. कुटुंबासोबत मोरेश्वर गोसावी राहत असत. त्यांना लष्करातील सुभेदार, जुमलेदार व कारकून यांचा उपद्रव होऊ नये अशी संभाजीराजांची इच्छा होती. ते दि. ०६.११.१६८० रोजी आज्ञा करतात, "राजश्री मोरेश्वर गोसावी कऱ्हेपठार येथे कुटुंबासी राहताती. तरी तुम्ही येता जाता त्यांच्या माणसास, शेतापोतास, गुराढोरांस काडीची तसवीस देत न जाणे. निरोपद्रव सुखरूप राहेती ती करणे. जेथे त्याका अनकूल पडेल तेथे जाऊन राहिले तरी सुखे राहो देणे. त्यांचे वाटेस नव जाणे. ताकीद असे जाणिजे(नि) लेखमालकार"[१६]

प्रस्तुत सनद संभाजीराजांच्या मनाची भावावस्था अधिक स्पष्ट करणारी आहे. आपल्या प्रजेच्या सामान्यातील सामान्य माणसाच्या रक्षणाची, संसाराची, सुखाची व्यक्त झालेली इच्छा. त्यांच्या मनातील प्रजेबद्दलचे प्रेम आंदोलन अधिक भावव्यापक करणारे आहे. प्राण्या-माणसांना त्रास होणार नाही याची काळजी घ्या. हा माझा आदेश आहे अशी कठोरताही त्यांतून दिसते. संभाजीराजांचे जनता प्रेम हेही एक कारण होते. संभाजीराजांच्या हृदयस्पंदनाचा उत्तम आविष्कार म्हणूनही या पत्राला ऐतिहासिकदृष्ट्या अधिक महत्त्व आहे.

### ४.५ शहाजीराजे-शिवाजीमहाराज यांच्यापासूनच इनाम

संभाजीराजांनी चालविलेल्या इनामामध्ये काही इनामे फार जुनी होती. त्यापैकी श्री. देव चिंचवडकर यांना निजामशहा, मलीकंबर, आदिलशहा, शहाजी आणि शिवाजी महाराजाच्या वेळेपासून बागा व इनाम चालत आले होते. "श्री देव स्वामी पिढी दरपिढी नाहून, अन्नछत्र, गरीबगुरीब व फकीर जो कोणी येतो त्यास अन्न, उदक देत असत. यासाठी

गाव इनाम करून दिला होता. संभाजी राजांना हे चालविणे अगत्य वाटल्यावरून त्यांनी दि. २२.०१.१६८३ रोजी पुणे येथील देशाधिकाऱ्यास पूर्वीप्रमाणे इनाम चालविण्याविषयी लिहिले."[१७]

या पत्रावरून संभाजीराजांच्या राज्यकारभाराची सर्वार्थ माहिती मिळते. आपल्या आजोबापासून चालत आलेल्या सनदा कायम ठेवल्या. कोणताही मनमानीपणा केला नाही. शिस्तबद्ध आणि पूर्वअनुभवावरून राज्यकारभार चालवित असल्याचा प्रत्यय येतो. यातूनच त्याची शिस्तप्रियता, धार्मिक सहिष्णुता आणि प्रजेच्या हिताला प्राधान्य इत्यादी गोष्टी स्पष्ट होतात. त्याचप्रमाणे संभाजीराजे मोरगाव, चिंचवड, सज्जनगड, चाफळ इत्यादी देवस्थानाची व्यवस्था नीट चालावी म्हणून पूर्वीची वृत्ती व इनामे चालू ठेवताना दिसतात. याबाबत आपला-परका असा भेदभाव केला नाही हेही आवर्जून लक्षात घ्यावे लागेल.

### ४.६ रामदास स्वामी आणि चापळ

शिवाजी महाराजांनी चापळ येथील रामनवमी उत्सव चालविण्यासाठी इतर देवस्थानाप्रमाणे साह्य, मदत केलेली आहे. हाच प्रघात संभाजीराजांनी पुढे चालविला. त्याप्रमाणे कराड, सातारा, सज्जनगड, चापळ इत्यादी ठिकाणांच्या अधिकाऱ्यांना आदेश पाठविले आणि उत्सवाच्या व्यवस्थेसंबंधी लिहिले. याबाबत चापळसंबंधी येणारी माहिती पुढील प्रमाणे आहे. "संभाजी महाराजांनी ज्या प्रमाणे इतर देवस्थानांची व्यवस्था आणि सत्पुरूषांची वर्षासने पूर्ववत चालू ठेवली होती त्याचप्रमाणे त्यांनी चापळ येथील श्री. रामदास स्वामींच्या श्री रघुनाथ देवाच्या पूजा-नैवेद्यासाठी आणि देवाच्या सेवकांना जी मोईन शिवाजी राजांनी १६७५ सालातील वर्षप्रतिपदेस करून दिली होती ती संभाजी महाराजांनी दि. १८.१०.१६८० रोजी तशीच चालविण्याची आज्ञा देशाधिकारी व देशलेखक, कासी रंगनाथ, प्रांत जावळी यास दिली."[१८]

संभाजी राजांनी चालविलेले चापळचे वर्षासन इतर धार्मिक क्षेत्रांना दिलेल्या वर्षासनाप्रमाणेच आहे असे दिसते. संभाजीराजे सर्व साधूसंतांना सारखेच समजत होते.

## ४.७ पंढरपुरच्या वारीला व चापळ यात्रेला संरक्षण

शिवाजी महाराजांनी महाराष्ट्रातील दोन मोठ्या सांस्कृतिक उत्सवांना मोईन व संरक्षण दिले होते. महाराष्ट्र-कर्नाटक या प्रदेशातून वारकरी मोठ्या प्रमाणावर पंढरपूरला वारीसाठी पायी चालत येत असतात. ही परंपरा यादवाच्या राजवटीपासून संत नामदेवांनी अखंडपणे चालू ठेवण्यासाठी प्रयत्न केले. या वारीबद्दल आणि वारकऱ्यांबद्दल शिवाजी महाराजांच्या मनात आदरभाव होता. याच भावनेतून वारीला, कीर्तनाच्या ठिकाणी मराठा सरदारासारखा वेशभूषा केलेला 'चोपदार' असतो. यावरून अधिक स्पष्ट होण्यास मदत होईल. या दृष्टीने इतिहासाच्या सांस्कृतिक मूल्यांचा अभ्यास  झालेला नाही. अधिक विस्ताराने या बाबींचा अभ्यास होण्याची गरज आहे. यातून वारकरी संप्रदाय आणि शिवाजी महाराज-संभाजीराजे यांचे संबंध स्पष्ट होण्यास मदत होईल. आपल्या सांस्कृतिक गोष्टीची योग्य मांडणीही करता येईल.

प्रमाणे चापळ येथील रामनवमी यात्रेसाठीची व्यवस्था करून दिली. यांच्याही नोंदी उपलब्ध होतात. "चापळ येथे दरवर्षी यात्रा भरे आणि सर्वदहि महोत्सव होत असे. तेथे कटकीचे शिपाई आणि वरकड लोक श्रींची मर्यादा चालवित नव्हते. यात्रेकरूंना त्रास होत असे. दिवाण लोक कटकटी करीत. त्यामुळे यात्रेत आणि इतर वेळी उपद्रव होऊ नये म्हणून शिवाजी महाराजांनी नाणेघोल तर्फेचे आणि प्रांताचे कारकून यांनी बरोबर जाऊन यात्रा सुखरूप पार पाडावी, मुसलमान बहर कोणाचा उपद्रव लागू देऊ नये. रामदास गोसावी यांच्या स्थळाचा परामर्श घेत कोणाचा उपद्रव लागू देऊ नये. रामदास गोसावी यांच्या स्थळाचा परामर्श घेत जावा असे दत्ताजी त्रिमल वाकनीस याला पत्र लिहून कळविले होते. तशीच व्यवस्था करून यात्रा सुखरूप पार पाडावी म्हणून शंभू छत्रपतींनी दि. १९.१०.१६८० यास कळविले होते."[१९]

शिवाजी महाराज यांनी धर्मस्थळांना संरक्षण, सुव्यवस्था आणि दिवाबत्तीच्या दृष्टीने काळजी घेतली. चापळच्या देवस्थानाबाबतही सामान्य माणसांना पूर्वीपासून खूप श्रद्धाभाव दिसतो. त्यांच्या व्यवस्थेची काळजी शिवाजी महाराज आणि संभाजीराजे यांनी घेतलेली

आहे. या दोहोंचा धर्म सहिष्णुताभाव सर्व मानवतेच्या श्रद्धाभावनेतून जन्मास आलेला आहे. धर्म कोणताही असो, श्रद्धास्थान कोणतेही असो, समाजाच्या दृष्टीने राजाने काळजी घेतली पाहिजे या गोष्टीचे महत्त्व दोघांनी अखंड जपले. देवश्रद्धेच्या पलिकडील मानवश्रद्धा महत्त्वाची मानली.

## ४.८ नवलगुंदच्या दिवाणाने मोकदमाना

इ.स. १६८४ ऑगस्टमध्ये सुलतान तारा याने लष्करासमवेत तोरगल, नवलगुंद या ठिकाणावर मोहिम राबविली. नवलगुंद हे धारवाड जिल्ह्यातील वायव्य तालुका आहे. या ठिकाणी सुलतानाने मुक्काम करून गाव, शहरे, वाडे, पेठा बेचिराख केल्या. यामुळे रोगराई निर्माण झाली. माणसे मेली. रयतेने गावे सोडली. या हल्ल्यात देवताच्या मूर्ती छिन्न-विछिन्न करण्यात आल्या होत्या. त्या मूर्तीची स्थापना पुन्हा करण्यासाठी संभाजीराजांनी प्रयत्न केला. या संदर्भातील कागदोपत्री नोंद पुढीलप्रमाणे, "महाराज राजश्री महाराष्ट्रराजा आहे. देवस्थाने छिन्नभिन्न असो नये. या कारणे देवालये बांधावी उरजा चालवावी. ह्यात आपण व स्वामी मिळोन जे करणे ते करीत आहो. तूर्त नवलगुंदासारखे गावात देवस्थान देवळेच नाही तसे झाले... देवळे इमारती बांधाव्या. तूर्त मूर्तिस्थापना करून पूजा चालवावी. नित्य पुराण श्रवण चालावे... सर्वांच्या मते विचार पडला की, हिंदूकीची गोष्ट खरीचं. उदंड खर्चवेज महाराजांचे दरबारात होऊन जातो. अगर पड जंगलही पडते. त्यापरीस श्रींचे उरजे अर्पित रानगृहातून जरी वेच जाहाला नाही. तरी त्यांचे त्याचे पुण्य महाराज छत्रपती साहेबांस श्रेय येईल."[२०]

सदरचे पत्र २२.०८.१६८५ चे आहे. यावरून स्वाऱ्या होणाऱ्या प्रदेशाची, माणसांची गाव, देवळे यांची स्थिती स्पष्ट होते. अशा गावांच्या उभारणीसाठी राजाला विशेष प्रयत्न करावा लागत असे. त्यासाठी स्वराज्यातील खूप पैसा खर्ची पडत असे. या बाबीचा प्रत्यय यावरून येतो. स्वराज्यातील एखादे गाव बेचिराख झाल्यानंतर त्याच्या उभारणीसाठी राजाने प्रयत्न करणे स्वराज्याच्या इभ्रतीच्या दृष्टीने महत्त्वाचे असते.

## ४.९ धर्मांतरे रोखण्याचा प्रयत्न

धर्मांतर सामाजिकदृष्ट्या अत्यंत गुंतागुंतीची प्रक्रिया आहे. ज्या धर्मातून आपण दुसऱ्या धर्मात जातो म्हणजे धर्मांतर क्रिया पूर्ण होते असे नाही. धर्म बदलतो तेव्हा रिती-रिवाज, संस्कार-संस्कृती, विधी- प्रार्थना, व्यवहार भाषा इत्यादी बाबीत पूर्णतः कोणाचेही परिवर्तन घडत नाही आणि आपल्या सर्वस्वी समस्या धर्मांतराने सुटत नाहीत. याला इ.स. १९५६ चे बौद्ध धर्मांतर अपवाद म्हणावे लागेल. याबाबतची विस्तारीत करण्याची ही जागा नसल्यामुळे फक्त नोंदविणे महत्त्वाचे वाटले. धर्मांतरीत समाजाच्या खूप समस्या निर्माण होतात. धर्मांतराची काही कारणे पाहिल्यास या गोष्टी स्पष्ट होतात. सक्तीचे धर्मांतर, अमिषातून धर्मांतर, मूळ धर्माला कंटाळून धर्मांतर, विवेकी विचारातून धर्मांतर अशी धर्मांतरे खूप झालेली आहेत. बहामनी धर्मांतर स्व-राज्यांच्या रक्षण लालसेने झालेले आहे.

धर्मांतर झालेल्या लोकांना पुन्हा धर्मात यावे असे वाटत असल्यास त्यांना मूळ धर्मात (हिंदू) येण्याची व्यवस्था शास्रात नव्हती. शिवाजी महाराजांनी धर्मशास्रांचे नियम डावलून धर्मांतरीत लोकांना धर्मात परत येण्याची व्यवस्था निर्माण केली आणि एकार्थाने धर्माचे शुद्धीकरण केले, असे म्हणावे लागेल. उदाहरणार्थ बजाजी निंबाळकर, नेताजी पालकर यांना शुद्ध करून स्वधर्मात येण्याची व्यवस्था केली आणि आपल्या मुलीचे लग्न बजाजी निंबाळकर यांच्या मुलाबरोबर लावले. यातून शिवाजी महाराजांचे धर्म विचार समजतात. हा निर्णय धर्माच्या शुद्धीकरणाच्यादृष्टीने खूप महत्त्वाचा आहे. संभाजीराजे यांनीही शिवाजी महाराजांप्रमाणे कार्य केले.

इ.स. १९८४ मध्ये मराठा इंग्रज यांच्यातील तहामध्ये माझ्या राज्यातील लोकांना गुलाम म्हणून वा ख्रिश्चन धर्म स्वीकारावा म्हणून विकत घेता येणार नाही अशी अट होती. यातून संभाजीराजे धर्माबाबत खूप जागृत होते. यातून असा अर्थ अभिप्रेत होतो. संभाजीराजे कोणत्याही धर्माने दुसऱ्या धर्मात हस्तक्षेप करू नये. सर्व धर्मांना समान मानत असत. काही लोक त्यांच्या धर्मविचाराला 'हिंदू धर्म रक्षण' असे जोडतात. हा त्यांच्या कार्याचा, विचारांचा विपर्यास आहे.

### ४.१० येऊलची नि-वारस जमीन देवस्थानाला

येऊलला एक निपुत्रिक बाई निवासी होती. तिची मिराशी जमीन २० वर्षे पडिक म्हणजे मशागतीशिवाय होती. ती त्या बाईने चिंचवडच्या श्री. देव संस्थानास दिली होती. "त्याप्रमाणे संभाजी राजांनी दि. १.११.८६ रोजी येऊलच्या देशाधिकाऱ्याला बाईच्या दानपत्राप्रमाणे तिची मिरासी जमीन चिंचवड संस्थानला दिल्याचे कळविले."[२१] निर्वंश जमीनीच्या बाबत शिवाजी महाराज ती जमीन सरकार जमा करत असत. पण संभाजीराजांनी बाईच्या इच्छेनुसार देवस्थानास दानपत्र करून दिले. यावरून लोकमताची काळजी स्पष्ट होते.

### ४.११ संभाजीराजांनी धर्म नाकारलाही, स्वीकारलाही !

संभाजीराजांच्या राज्यकारभारातील कागदपत्रांच्या आधारे त्यांच्या धार्मिक कार्याची व्यापक चर्चा केली. त्यादृष्टीने त्यांना धर्मवीर, धर्मरक्षक आणि हिंदूधर्माभिमानी संभाजीराजे अशी विशेषणे विविध अभ्यासकांनी लावलेली आहेत. या गोष्टीचा विचार करता, तत्कालीन काळातील राजे-सरदार धार्मिक गोष्टींच्यामध्ये लक्ष घालताना दिसतात हे त्यांचे कर्तव्यच असल्याचे लक्षात येते. रूढार्थाने जो राजा ज्या धर्मात जन्मला तो धर्म राजाला जोडला जातो. त्यांनी केलेल्या धर्मदानाचा संबंध त्यांच्या धर्माशी जोडला जातो हे योग्य नाही. कारण भारतातील समाजव्यवस्था, राजव्यवस्था, धर्मसत्तेच्या आधाराने उभी राहिलेली दिसते. तत्कालीन कोणतीही राज्यव्यवस्था धर्मदाय कार्यापासून स्वतःला स्वायत्त ठेऊ शकत नाही. अशा राज्यव्यवस्थेला अधिक काळ राज्यकारभार करता येत नाही. आज अखेरही राज्यव्यवस्थेला धर्मक्षेत्रामध्ये आर्थिक मदत करावी लागते. आजच्या लोकशाही समाज व्यवस्थेमध्ये सुद्धा आपण या परंपरेला पूर्णतः छेद देऊ शकलो नाही. यावरून अधिक स्पष्ट होण्यास मदत होते.

संभाजीराजांनी परंपरा, रूढी, जातीव्यवस्था, वेदप्रामाण्य, उच्च-निचता, स्त्री-पुरूष विषमता आणि कर्मकांडावर आधारित असणारा धर्म नाकारला. रूढार्थाने स्वीकारलेला धर्म संभाजीराजांना केव्हाही मान्य होण्यासारखा नव्हता. या दृष्टीने त्यांना धर्मव्यवस्थेशी जोडणे ऐतिहासिकदृष्ट्या सत्य नाही. त्यांनी अनुष्ठाने, यज्ञ आणि जपतप याला महत्त्व दिल्याचे दिसत नाही. त्यांचा धर्म याहीपेक्षा भिन्न मूल्यांवर आधारित होता. त्यांनी नाकारलेला धर्म आणि स्वीकारलेला धर्म या दोहोंमध्ये 'धर्म' ही बाब समान नसून भिन्न आहे. म्हणून अभ्यासकांनी धर्म या शब्दांनी शंका घेण्याचे कारण नाही. कारण धर्म स्वीकारला तो मानवतेचा, सहिष्णुतेचा, समतेचा, स्त्री-पुरूष समानतेचा आणि स्वराज्यरक्षणाचा. या मूल्यांवर त्यांचा धर्म आधारित होता. म्हणून संभाजीराजांनी नाकारलेला धर्म आणि स्वीकारलेला धर्म भिन्न-भिन्न मूल्यांवर आधारित आहे. या मूल्यांची गल्लत होता कामा नये. देवळांना, मठांना, वर्षासन, देव-देवताचे दर्शन आणि साधू स्वामींचे दर्शन व सहवास केला म्हणजे धर्मविचार मूल्ये स्वीकारले असे होत नाही. राजाला सर्वांना जवळ घ्यावे लागते. सर्वांच्या जवळ जावे लागते. त्यांचा धर्म हा फक्त 'राजधर्म' असतो म्हणून संभाजीराजे धर्मरक्षक वा धर्मवीर होते असे न म्हणता स्वराज्य, प्रजारक्षक, मानवतावादी होते असे म्हणणे योग्य आहे. माणसांच्या रक्षणात वा प्रगतीत धर्माची प्रगती असते. धर्माच्या प्रगतीत माणसांची प्रगती नसते. केवळ-वा-केवळ पुरोहितशाहीची आणि उच्चवर्णियांची असते. याही गोष्टीचा विचार होणे गरजेचे आहे.

रामदास स्वामींच्या मठांना आणि देवळांना वर्षासन दिली. त्यांच्या शिष्य गणांचा वाद मिटवला याबाबीचा विचार करता संभाजीराजे यांना रामदास स्वामी यांच्या कार्याशी जोडता येणार नाही. कारण औरंगजेब बादशाहाने पालीच्या मुरळी प्रथेला कायद्याने बंद करण्याचे आदेश दिले. काही मंदिरांना दानधर्म केला. यावरून संभाजीराजांना लावण्यात येणारे निष्कर्ष औरंगजेबाला लावता येतील का ? याचा अर्थ राजांनी धर्माचा आधार घेऊन शोषण करणारांना कठोर शासन केले. हे सत्य आहे. पण या शासन करण्यामागे 'धर्म' नसून

मानवता आहे हे महत्त्वाचे. संभाजीराजांनी कत्तलखाण्यात गाई घेऊन जाणाऱ्यास शिक्षा केली. हे ऐतिहासिक सत्य आहे यांचा संबंध 'गोब्राह्मण प्रतिपालक' असे म्हणणाऱ्यांचा मोह अत्यंत विवेकाने इतिहास लेखन करणाऱ्या लेखकांना आवरता आला नाही हे खेदाने म्हणावे लागते. त्यांनी गाईच्या रक्षणाशी ब्राह्मण वर्णाच्या रक्षणांचा संबंध जोडला. संभाजीराजांनी वर्ण, जात, धर्म पाहून रक्षण केले नाही. फक्त आणि फक्त माणूस पाहून रक्षण केले. म्हणून त्यांच्या 'गाई' रक्षणांच्या कृतीला प्राणीमात्राचे रक्षण असे म्हणणे उचित ठरेल.

शहाजीराजे, शिवाजी महाराज आणि संभाजीराजे यांच्या पदरी असंख्य मुस्लीम सरदार, मावळे आणि विश्वासू खातेदार होते. याचा सरळ-सरळ अर्थ या भोसले कुळाने धर्माचे राजकारण केले नाही. मानवाच्या रक्षणांचे राज्यनिर्मितीचा प्रयत्न केला. इतिहासकार त्यांच्या जीवन ध्येयाला धर्माशी जोडतात. पण धर्मापेक्षा माणूस महत्त्वाचा आहे हे विसरतात. अपवादात्मक लेखकांनी त्यांची धर्मविषयक योग्य भूमिका अत्यंत समतोलपणे मांडलेली आहे.

### ४.१२ औरंगजेबाचा संभाजीविरूद्ध संघर्ष 'जिहाद'

प्रसिद्ध इतिहास संशोधक सदाशिव शिवदे संभाजीराजांच्या चरित्र ग्रंथात धर्मविषयक विचार नोंदवितांना म्हणतात. संभाजीराजाविरूद्ध वा स्वराज्याविरूद्ध औरंगजेबाने 'जिहाद' पुकारला हे विधान ऐतिहासिक वस्तुस्थितीला धरून नाही. 'अकबर बादशहा' हा औरंगजेबाचा मुलगा संभाजीराजांच्या आश्रयाला होता. त्यांचा धर्म जिहाद नुसार कोणता ठरवावा लागेल. औरंगजेबांच्या सैन्यात मराठा सैन्य, सरदार होते. इतकेच काय संभाजीचे मेहुणे शिर्के हे होते. यांनी जिहादला पाठिंबा दिला असे म्हणावे लागेल. यावरून एकच स्पष्ट होते श्री शिवदे संभाजीराजांच्या विचाराचा विपर्यास करत आहेत. औरंगजेब बादशाह साम्राज्यवादाने अंध झाला होता. यातूनच त्यांच्या हातून क्रुर राजकारण घडले. याचा धर्माशी संबंध लावून इतिहासाचा विपर्यास करणे योग्य नव्हे.

## ४.१३ 'बुधभूषण' वाङ्मयीन श्रेष्ठ रचनानिर्मिती

संभाजीराजे पराक्रमी, श्रेष्ठ नेतृत्वगुण, लोककल्याणकारी राजा इत्यादी पैलू त्यांच्या व्यक्तिमत्त्वांत होते. त्याचबरोबर वाङ्मयीन श्रेष्ठ दर्जाच्या निर्मिती त्यांनी केल्या आहेत. या निर्मिती वाङ्मयीनदृष्ट्या परिपूर्ण, श्रेष्ठ आणि बोधपर आहेत. त्यांची भाषिक, आशय आणि काव्यमय गुणवत्ता कमालीची आहे.

संभाजीराजांनी 'बुधभूषण' हा संस्कृत ग्रंथ केव्हा रचला असावा हे ठामपणे नोंदविता येत नाही. कारण त्यांचा रचनाकाळ स्पष्टपणे नोंदविलेला नाही. पण अभ्यासकांच्या तर्कानुसार त्यांचा रचनाकाळ शिवाजीमहाराज कर्नाटकांच्या मोहिमेवर असतांना म्हणजे इ.स. १६७८ च्या सुमारास लिहिला असावा. हा काळ स्वराज्यांच्या व संभाजी राजांच्या दृष्टीने फार धामधुमीचा काळ आहे. अशा काळात चिंतनपर श्रेष्ठ रचना निर्माण होणे कठीण आहे. ग्रंथ प्रारंभ यापूर्वी केव्हातरी झाला असावा आणि ग्रंथसमाप्ती या सुमारास झाली असावी. असा निष्कर्ष काढण्यास वाव आहे. या ग्रंथनिर्मितीसाठी संभाजीराजांनी संस्कृत पंडिताचे साह्य घेतले असण्याची शक्यता अधिक आहे. संभाजीराजे यांचे स्वानुभव व संस्कृत वरील प्रभाव खूपच उल्लेखनीय होता तत्कालीन ग्रंथलिखाणासाठी अन्य पंडिताचे साह्य घेतले जात असे. त्याकाळी हा रिवाज होता.

### ४.१३.१ बुधभूषण ग्रंथाची रचना

'बुधभूषण' या ग्रंथाची रचना तीन भागात विभागली असून, त्या-त्या भागात वेगवेगळे विषय मांडलेले आहेत. पहिल्या भागात १९४ सुभाषित संख्या आहे. प्रारंभीच्या सुमारे १७ श्लोकांत ग्रंथनिर्मात्याने आपल्या पूर्वजांचा संक्षिप्त इतिहास नोंदविला आहे. या ग्रंथातील शिवाजी महाराज यांच्या विषयी माहिती सांगणारे श्लोक वाङ्मयीनदृष्ट्या आशयाच्या अंगाने सूत्रशैली निवेदनावर असून अत्यंत महत्त्वाचे आहेत. या श्लोकामध्ये शिवाजी महाराजांचे व्यक्तिमत्त्व अंगभूत गुणकौशल्य आणि निर्मळ मनाचा राजा असे गुण

विशेष आलेले आहेत. याचबरोबर स्वराज्यस्थापने मागील कारणमीमांसा ध्येयवाद या बाबतीत वर्णन मार्मिक व ह्दयगत आहे. जे मानवी मनांच्या स्पंदनांना कंपीत करते.

बुधभूषणच्या पुढील ११ श्लोकात भवानी माता या देवतेचे भावपूर्ण वर्णन असून त्यानंतरच्या १५ श्लोकात निरनिराळ्या देवतांचे स्तवन केलेले आहे. ते ही रचनादृष्ट्या उत्तम-उत्तम निर्मितीक्षम झालेले आहे. यानंतरचा १८ श्लोकांचा भाग प्राचीन देव-देवता संस्कृत ग्रंथादी आशीर्वादपर आहेत. ही वचनेसुध्दा कमालीची श्रद्धाभावनेने निर्माण झालेली आहेत. शेवटच्या काही श्लोकांची (१३० श्लोक) रचना अन्योक्ती रचना प्रकारात आहे. या भागाचे शेवटचे तीन श्लोक अंतर्लिपिकची (कोडी) स्वरूपात आहेत. ही कोडी मार्मिक बोधपर आणि मनोरंजन इत्यादी वाङ्मयीन गुणांनीयुक्त आहेत. प्रारंभीचा भाग वाङ्मयीनदृष्ट्या सर्वगुणसंपन्न आणि श्रेष्ठ दर्जाचा आहे.

'बुधभूषण' या संस्कृत ग्रंथाचा दुसरा भाग ६३२ श्लोकाचा असून या भागात विष्णूपुराण, मत्स्य पुराण आणि कामंदकीय नीतिसार या ग्रंथातील वचनाचा समावेश आहे. यादृष्टीने हा भाग काहीसा संकलित स्वरूपाचा आलेला आहे. राजांचे गुण, त्यांची कर्तव्ये, राजाचे मदतनीस, मुख्य प्रधान, राजपुत्र, त्याचे शिक्षण व त्यांची व्यापक कर्तव्ये, राजाचे सल्लागार, राज्याचे इतर विविध घटक, कोश, दुर्ग आणि त्यांची डागडुजी, सजावटी, सैन्यबल, हेर, राजाचे नोकर, राजसभा व तिचे सभासद दूत, राजांची कर्तव्ये, राजाची व्यसने, परप्रांतावर लढाया, स्वाऱ्या, अशी राज्यकारभाराविषयी विपुल माहिती या भागात येते. तिसऱ्या भागात म्हणजे शेवटच्या भागात संकीर्ण मांडणी आहे. म्हणून या भागास 'मिश्रकनीति प्रकरण' असे नाव दिलेले आहे. या भागात वृत्ती, पुनरावृत्ती झालेली आहे. ती कंटाळवाणी नसून लेखनाच्या सातत्याला धरून आहे. यामुळे योग्य वाटते. बुधभूषण या ग्रंथाच्या श्रेष्ठत्वाबाबत 'श्री शंभुराज विरचित :बुधभूषण' या ग्रंथात 'रामकृष्ण कदम' पुढील प्रमाणे मत नोंदवितात ते असे, "कोणताही ग्रंथ हे शहाण्याचे /विद्वानाचे भूषण नक्कीच असतो. त्यानुरोधाने 'बुधभूषण' हा ही ग्रंथ त्या नामाभिधानास पात्र आहे असे संभाजी

महाराज म्हणतात, हे आपण जेव्हा ध्वनित करू तेव्हा तो मार्ग निसरडाच ठरणार. कारण 'बुधभूषण' हा केवळ ग्रंथ आहे म्हणून तो सर्व शहाण्या विद्वानांना 'भूषण' कसा ठरविता येणार ? ही या नावाची अप्रस्तुत अतिव्याप्ती ठरते."[२२] विद्वानांसाठी म्हणून काही मूल्य असतात. त्या मूल्यांचा स्वीकार करणारे विद्वान असे संभाजी राजांना म्हणावयाचे आहे. जे-जे समाजाच्या प्रति कर्तव्यभावना दाखवितात त्यांच्या-त्यांच्या ठायी उच्चविचार, ज्ञान मूल्य असतात. असा विचारभाव राजांनी विद्वानांच्या प्रति मानला आहे.

'बुधभूषण' या ग्रंथात राजाच्याबाबत आलेले श्लोक कमालीची विद्वत्ता आणि राजधर्म यामूल्यांवर प्रकाश टाकणारी आहेत. त्या श्लोकांचा आशय अर्थगर्भ अर्थमूलक आणि प्रेरणादायी आहे. काव्याची भाषा भावपूर्ण, वीररसपूर्ण रसांनी युक्त आहे. यामुळे हे एक कमालीचे अर्थपूर्ण झाले आहे. यादृष्टीने 'बुधभूषण' या ग्रंथातील पुढील श्लोक पाहणे महत्त्वाचे आहे तो असा :[२३]

गूढमंत्रप्रचारश्च देशकालविभागवित् |
आदाता सम्यगर्थानां विनियोक्ता च पार्थिकः ||
(पार्थिवः गूढमन्त्र-प्रचारःच देश-काल-विभागवित्
सम्यक् अर्थानाम् आदाता विनियोक्ता य |) - अर्थसुलभ

**भाषांतर :**

आदर्श राजा (पार्थिव / पृथ्वीपती) आपल्या सर्व हालचारी व मसलती गुप्त ठेवणारा असतो. त्याला देश आणि काल यांची योग्य ती विभागणी करणे हे चांगल्या प्रकारे माहित असते. योग्य रीतीने धनसंचय करणारा आणि त्याचा योग्य प्रकारे उपयोग (खर्च, व्यय, विनियोग, प्रजेच्या हितसंवर्धनासाठी वापर) करणारा (सत्पात्र ज्ञाता असा सत्पात्रविस) असतो.

राजांच्या अंगी असावे लागणारे गुण संभाजीराजांनी अत्यंत मार्मिक शब्दात नोंदविले आहे. या मार्मिकतेमागे त्यांचे अनुभवविश्व व्यापक असल्याचा प्रत्यय येतो.

राजाची कर्तव्य आणि त्याला देश, कालाचे असावे लागणारे भान याबाबी महत्वाच्या आहेत. यातून या काव्याची गुणवत्ता आणि श्रेष्ठत्व स्पष्ट होते. याचबरोबर राजाला घातक ठरणाऱ्या गोष्टीची नोंदही या ग्रंथात करण्यात आलेली आहे. या गोष्टी राजाने टाळाव्या. याबाबतचा 'बुधभूषण' ग्रंथातील श्लोक पुढीलप्रमाणे आहे तो असा:[२४]

क्रोधलोभभय द्रोहस्तम्यचापलवर्जितः |

बृध्दोपदेशसंपन्नः शक्तो मधुरदर्शनः ||

निर्वृतः पितरीवास्ते यत्र लोकः स पार्थिवः ||

(क्रोध-लोभ-भय-द्रोह-स्तम्भ-चापल-वर्जितः

पार्थिवः  वृध्दोपदेशसंपन्नः शक्तः मधुदर्शनः (पार्थिवः)

यत्र लोकः पितरीव निवृतः आस्ते स पार्थिवः |

निवृत्तः समाधारी, आश्वस्त, निर्धास्त) - अर्थसुलभ

**भाषांतर :**

क्रोध, लोभ, भय, द्रोह, मठ्ठपणा (=स्तम्य=स्तब्धता, बधिरता, ताठा, मूर्खता, बुध्दिभ्रंश) चंचलता= (चापल=अविचार, धाडस, अस्थिरता, वळवळ, हट्ट) यांच्यापासून आदर्श राजा दूर असतो.

राजाने राजधर्माचे पालन करताना वरील दोषापासून दूर रहावे. या दोषापासून दूर राहतो तोच राजा प्रजेवर आणि राज्यव्यवस्थेवर विजय प्राप्त करतो. शत्रूला नाहीसा करतो. असा सुबोध विचार संभाजीराजांनी मांडलेला आहे.

**४.१३.२  मैत्रिभाव जपण्याचा संदेश : बुधभूषण**

संभाजीराजांनी बुधभूषण या ग्रंथात पंचविकारापासून दूर राहण्यास सांगितले आहे. या श्लोकांचा लक्षणेने प्राप्त होणारा अर्थही खूप महत्त्वाचा आहे. तो अर्थ मैत्रिभाव, आपुलकीभाव आणि लोककल्याण भाव व्यक्त करणारा आहे. मैत्रीभावाने सर्वांशी राहावे आणि क्षत्रियाचे गैरवाजवी अधिकार त्यांनी नाकारले. यातूनही त्यांच्या मनातील उच्चभाव

स्पष्ट होतात. असे भाव वारकरी संप्रदायातील संतश्रेष्ठ तुकाराम महाराज यांच्या अभंगामध्ये विपुल येतात. 'न घडो कुण्या जीवाचा मत्सर' ही अभंगाची ओळ पाहता त्यांच्या मैत्रीभावाचे दर्शन होते. तुकारामांप्रमाणे गौतम बुध्दांनीही क्षत्रियांच्या गैरवाजवी अधिकारांना नाकारले आणि प्रेम, ममता, क्रोध यासह शत्रूपासून भयमुक्त राहावे आणि प्रजेप्रती आपल्या सहकार्याप्रती प्रेम भाव असावा असा संदेश दिला. या दृष्टीने पुढील पालीतील श्लोक महत्त्वाचा आहे तो असा:[२५]

पहूतविस्तृपकरणो, राजा होति पतापवा ||

इध्दिमा यसवा होति, जम्बुमण्डस्स इस्सरो ||

को सुत्वा नापसीदेय, आणि कण्हाभिजातियो ||

अन्याकतवग्ग|

**भाषांतर :** एखाद्या हलक्या जातीमधील मनुष्य असला तरी तो (मैत्रीभावना केल्यामुळे) भरपूर संपत्ती व साधनसामग्री प्राप्त करतो. तो प्रतापी राजा होतो. समृद्ध व यशस्वी होतो. जंबुद्वीपाचा स्वामी होतो. हे ऐकून कोण खुश होणार नाही.

संभाजीराजे यांनी सांगितलेला राजधर्म आणि गौतम बुध्द सांगत असलेला राजधर्म खुपशा साम्यावर आधारलेला आहे. हीन जातीमध्ये जन्माला आलेला एखादा मनुष्यही आपल्या गुणवत्तेच्या जोरावर राजा होऊ शकतो. वैभव प्राप्त करू शकतो सत्ता भोगू शकतो. या दृष्टीने दोघांचे विचार समान तत्त्वांवर आधारित आहेत. राजा जन्मावर श्रेष्ठत्व पावत नाही तर गुणांवर श्रेष्ठत्वास जातो. हाच विचार या ठिकाणी आलेला आहे. मनुस्मृतीतील उदाहरणादाखल श्लोक पाहिल्यास संभाजीराजे आणि गौतम बुध्द यांचा मानवी गुण संपन्नतेचा विचार उमदा आणि महत्त्वपूर्ण वाटतो. 'शूद्र अगदी विद्वान असला तरीही राजाने आपला सल्लागार म्हणून त्याची नेमणूक करता कामा नये' या श्लोकातील संकूचित विचार आणि संभाजीराजांच्या विचारातील व्यापकता स्पष्ट होते.

गौतम बुध्द आणि संभाजी राजे मानवी भाव-भावनातील सत्यवृत्तीला उच्च मूल्यांचे आव्हान करतात आणि या वृत्तीत विकाराची व्यापक मूल्ये असल्याचे नोंदवितात. त्यांचा राजधर्म स्वातंत्र्य, विद्वत्ता यांची वृद्धी आणि स्थायीभावातील विकार नाहीसे करण्याचे होते असे नोंदवितात. परंपरेने चालत आलेला व्यापक लोककल्याणाचा प्रवाह आणि विशिष्ट लोकांचे हितसंबंध जोपासणारा प्रवाह यांच्यातील विचारमूल्य आणि परस्परातील फरक स्पष्ट होताना दिसतो.

संभाजीराजांनी निर्मिलेला बुधभूषण हा ग्रंथ त्यांच्यातील तत्त्ववेत्यांची आणि उच्च मानवतेची साक्ष देतो. राजांच्या गुणवत्तेचे विचार स्वा-नुभवातून साकार झाले आहेत. त्यांची व्यापकता मानवी मनाला उन्नत करणारी आहे.

### ४.१४ स्वराज्य रक्षक संभाजी राजे

शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर (इ.स.१६८०) औरंगजेब बादशाह, सिद्दी आणि इंग्रज यांचा स्वराज्य नष्ट करण्याच्या दृष्टीने सातत्याने प्रयत्न चालू होतो याच दरम्यान स्वकीयांनीही स्वराज्याच्या वाटणीसाठी कारस्थाने करण्यास प्रारंभ केला होता. शिवाजी महाराजांच्या निधनानंतर स्वराज्याची अचानक जबाबदारी संभाजी राजांच्यावर आली. याचा परिणाम स्वराज्य व संभाजीराजे यांच्यावर झाला. या सर्वांवर मात करत स्वराज्याचे रक्षण आणि यशस्वीपणे संकटांना तोंड देणे ही महत्त्वाची जबाबदारी यशस्वी राजा म्हणून संभाजी राजांना पार पाडावी लागणार होती. ही जबाबदारी पार पाडत असतांना त्यांच्या अंगभूत गुणाचे घडलेले दर्शन थक्क करणारे आहे. याबाबींचा आढावा प्रस्तुत ठिकाणी घ्यावयाचा आहे.

### ४.१५ अकल्पित शिवाजी महाराजांचा मृत्यू

संभाजीराजे दिलेरखानाच्या छावणीतून पन्हाळ्यावर येतात. शिवाजी महाराजही विजापूरची स्वारी संपवून पन्हाळ्यावर आलेले असतात. उभयतांची पन्हाळ्यावर भेट होते.

या भेटीदरम्यान पुढील राजकारणाची निश्चिती होते. पन्हाळयाच्या प्रदेशाची व्यवस्था लावण्यासाठी संभाजीराजांना शिवाजी महाराज पन्हाळयावर ठेवतात आणि आपण अनेक दिवसाच्या मोहिमेनंतर रायगडावर जातात. सर्व आघाड्यांवर सैन्यासह सेनापती-मंत्री गुंतलेले होते. महाराज अनेक दिवसांपासून आजारी होते. हा आजार काही दिवसात खूपच विकोपास गेला असे दिसते. महाराज रायगडावर काही दिवस विश्रांती घेतात. पण आजारपण वाढत जाते. आणि त्यांचा अंत होतो. स्वराज्य रक्षणांच्या दृष्टीने शिवाजी महाराजांच्या निधनाची बातमी काही काळ व्यवस्था लावेपर्यंत गुप्त राहणे महत्त्वाचे होते. ती गुप्तता पाळण्यात आली.

शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर स्वराज्याला वारस निवडणे महत्त्वाचे होते. सोयराबाई यांच्या महत्त्वाकांक्षेने आण्णाजी दत्तो आणि मोरोपंत यांनी राजारामांचा 'मंचकरोहन' करून निराळी चालना दिली. ही कृती स्वराज्याच्या रक्षणाच्या दृष्टीने योग्य नाही तर ती स्वराज्याला हानी पोहचविणारी कृती होती. या कृतीमुळे स्वराज्यात गोंधळ माजला. राज्यामध्ये फुटींची बीजे पेरली गेली. वारसा हक्काने स्वराज्याचे वारस संभाजीराजे असताना त्यांना या हक्कापासून दूर ठेवणे हे कोणत्याच अर्थाने योग्य नव्हते. आपला हक्क आणि स्वराज्यरक्षणासाठी संभाजीराजांना आपल्याच माणसांच्या विरोधात जावे लागणार होते. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर निर्माण झालेली ही स्थिती स्वराज्य नाशाच्या दृष्टीने होती. या स्थितीतून स्वराज्य रक्षण करण्याची मुख्य जबाबदारी संभाजी राजांची होती. ती त्यांनी योग्य रूपाने पार पाडली. यावरून त्यांची स्वराज्यनिष्ठा स्पष्ट होते.

### ४.१६ संभाजीराजांना मारण्याचा कट

शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर सेनाधिकाऱ्याला अण्णाजी दत्तो आणि त्यांच्या सहकार्यांनी पकडण्याचे आदेश दिले. हा त्यांचा कट यशस्वी झाला नाही आणि "संभाजीराजे स्वराज्याचे अधिकृत राजे झाले त्यांनी (दि. १४ ते १६) ता. ३०.१२.१६८०

रोजी स्वतःची सुवर्णतुला करून सुवर्णतुलादान केले. त्यानंतर प्रतापगडावर जाऊन त्यांनी कुलस्वामिनीचे पूजन इत्यादी कार्यक्रम केल्यावर राज्याभिषेक विधी झाला."[२६] काही दिवसांनी अण्णाजी दत्तो आणि सहकाऱ्यांनी संभाजी राजांना मारण्याचा कट रचला. या कटात अकबरालाही घेण्याचा प्रयत्न झाला आणि अकबरामुळेच हा कट उघड झाला. याबाबतचे वर्णन पुढीलप्रमाणे, "इतक्यात अण्णाजी दत्तो यांच्या पक्षपाती लांकांनी त्या महंमदासी (अकबर) राजाराम याचे हिताविषयी संभाजीस घाताची मसलत केली. हे वर्तमान संभाजीस महंमदाने कळविले. त्याचे भेटीस संभाजी गेला. मग त्याने अण्णाजी दत्तो व शिर्के कुळातील जे मुख्य पत्र सापडले ते, परभू बाळाजी आवजी पुत्रासहित हत्तीचे पायी दिले."[२७]

प्रस्तुत नोंदीवरून मराठ्यांच्या स्वराज्यांवर आप्ताकडून आलेले संकट समजण्यास मदत होते. या संकटाला संभाजीराजांनी त्याच स्वरूपाचे शोभेल असे उत्तर दिले. स्वकीयांकडूनही व शत्रूकडून स्वराज्याचे रक्षण करण्याच्या दृष्टीने कडक पावले उचलली.

### ४.१७ महंमद अकबर : स्वराज्यावरील संकट

औरंगजेब बादशाह यांचा मुलगा महंमद अकबर बादशहा आपल्या पित्यावर नाराज होवून मराठ्यांच्या स्वराज्यात आश्रयाला येतो. संभाजीराजे काही काळ दूर राहतात. पण त्याचा विश्वास पटल्यानंतर मुघल सत्तेला क्षय देण्यासाठी त्याला सहकार्य करतात. याचबरोबर संभाजीराजांच्या मुघली प्रदेशातील स्वाऱ्यामुळे औरंगजेब भयंकर रागावला होता. त्याने संभाजीराजांना ठार करण्याची प्रतिज्ञा केली होती. केवळ प्रतिज्ञा न करता तो स्वतः स्वारीत उतरला आणि स्वराज्यावर चालून आला. हे स्वराज्यावरचे सर्वात मोठे संकट होते. यासाठी मराठ्यांनी तयारी केली. वाई, सातारा, कोल्हापूर आणि पन्हाळा या सर्व ठिकाणावर मुघलांनी हल्ले चढविले. काही ठिकाणी मुघलांना तर काही ठिकाणी मराठ्यांना विजय-पराभव स्वीकारावा लागला.

संभाजीराजांनी औरंगजेब बादशाह यांच्या स्वराज्यावरील स्वारींना सुमारे सात-आठ वर्ष अत्यंत चिकाटीने तोंड दिले. त्यात ते यशस्वीही झाले. स्वराज्य रक्षणासाठी सातत्याने आघाडीवर राहिले. यातून त्यांचा पराक्रम आणि स्वराज्यावरील निष्ठा स्पष्ट होते. औरंगजेबाच्या स्वराज्यावरील संकटाबाबत नोंदविताना 'सेतू माधवराव पगडी' आपल्या 'हिंदवी स्वराज्य आणि मोगल' या ग्रंथात म्हणतात, " औरंगजेब म्हणजे कोणी सामान्य शत्रू नव्हता. काबूलपासून बंगालपर्यंत व काश्मिरपासून दक्षिणेत भीमानदीपर्यंत त्याचे अफाट साम्राज्य पसरले होते. त्यांच्या साम्राज्याला फक्त जमीन महसूलच ३३ कोटी २५ लाख होता. मराठ्याचे सगळे राज्यच मुळी त्याच्या एका सुभ्याएवढे सुद्धा नव्हते. त्याच्या लष्कराची संख्या ॲबकॅरे या प्रवाशाने 'तीन लाख घोडेस्वार व चार लाख पायदळ' अशी दिली आहे. युद्ध बादशाहाच्या छावणीत साठ हजार घोडेस्वार, एक लाख पायदळ, पन्नास हजार उंट व तीन हजार हत्ती असल्याची तो एके ठिकाणी नोंद करतो."[२८]

सेतु माधव पगडी यांच्या वरील नोंदीवरून औरंगजेबाचे साम्राज्य सामर्थ्य आणि त्याने स्वराज्याचा बिमोड करण्यासाठी चालून यावे हे स्वराज्यावरील फार मोठे संकट होते. या संकटावरही संभाजी राजांनी यशस्वी मात केली आणि औरंगजेबास जेरीस आणले. तो संतापला होता. यावरून संभाजीराजाचे डावपेच, गनिमी कावा आणि स्वराज्यावरील पकड स्पष्ट होते. एवढ्या मोठ्या शत्रुला जेरीस आणणारे संभाजीराजे यशस्वी 'राजा' होता. हेच यातून स्पष्ट होते.

### ४.१८ सिद्धीची स्वराज्यावरील आक्रमणे

शिवाजी महाराजांच्या काळापासून सिद्धी व मराठे यांच्यात संघर्ष चालू होता. त्यांचा यशस्वी बंदोबस्त शिवाजी महाराजांनी केला. त्यांच्यानंतर स्वराज्याची राज्यकारभाराची सूत्रे संभाजीराजांच्या हातात आली. संभाजी राजांनाही सिद्धीला यशस्वीपणे तोंड दिले. यासाठी त्यांनी अरबाशी आणि काही प्रसंगी पोर्तुगीज यांच्या मैत्रीचे संबंध ठेवले. यामुळे सिद्धीला रोखण्यात संभाजीराजांना यश आले. सिद्दी हा धूर्त आणि घातकी शत्रू असल्याची जाणीव संभाजीराजांना होती. त्यांनी त्याला योग्य प्रकारे तोंड दिले आणि स्वराज्याचे रक्षण केले.

सिद्दीच्या बंदोबस्तासाठी ज्या मोहिमा आखल्या त्यासाठी मराठ्यांच्या सैन्याला खुप मोठी किंमत चुकवावी लागली. पण या नुकसानीही संभाजी राजांनी सिद्धीला यशस्वी तोंड दिले. सिद्दी हे मुघलाप्रमाणे स्वराज्यावरील सागरी शत्रू होते. व्यापारावर, स्वराज्य स्वास्थ्यावर त्यांच्या आक्रमणांचा परिणाम होत असे. संभाजी राजांनी यशस्वीपणे त्यांच्याशी सामना केला आणि स्वराज्याचे रक्षण केले.

## ४.१९ स्वराज्य आणि शिर्क्यांचा कुटील डाव

शिर्के हे घराणे प्राचीन काळापासून महाराष्ट्रातील प्रसिद्ध घराणे होते. 'कोन्होजी रामोजी शिर्के' हा चिपळून-दापोली परिसरातील सुभेदार व सरदेसाई होता. त्यांची वतनावर दबदबा व हुकूमत होती. शिवाजी महाराज यांनी २९ एप्रिल १६६१ रोजी सुभ्याचे शृंगारपूर स्वराज्यात आणले. तेव्हाच शिर्क्यांचेही वतन स्वराज्यांत जमा झाले. पिढ्यान्‌पिढ्यांच्या वतनदारीमुळे शिर्के त्या भागाचे सत्ताधीश झाले होते. आदिलशाही-निजामशाही यांना ते उत्पन्नाचा सारा जमा करत असत. या व्यतिरिक्त त्यांच्यावर या शाहीचा अंमल असा फारसा नव्हता. ते राज्याचे मालक असत. बादशाहला मोहिमेत सैन्य पाठविणे, मुजरा करणे, उंची भेटवस्तू पाठविणे इत्यादी गोष्टीमध्येच ते आपली धन्यता मानत असत.

शृंगारपूरच्या सूर्यराव सुर्वे यांनी आपली मुलगी पिलाजीराव शिर्के यांना देऊन सोयरीक केली. यातुन दाभोळची देशमुखी शिर्क्यांना देण्याचा प्रयत्न बादशाहकडून यशस्वी करून घेतला. शिवाजी महाराजांनी तळकोकण जिंकून घेतल्यानंतर हा प्रदेश स्वराज्यात अनामत केला. येसूबाई व संभाजीराजे यांच्या विवाहाने शिर्के-भोसले. सोयरीक झाली. या नातेसंबंधानंतर शिर्केनी शिवाजी महाराजांना वतनाबाबत विचारले असता, "आपल्या राज्यात वतन देण्याची पध्दत नसल्याचे सांगितले. 'स्वामीकार्य केल्यास व राजकुंवरबाईस मुलगा झाल्यास हे देशमुखी वतन आपण देऊ असे त्यांनी सांगितले.' पुढे शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर हे वतन संभाजी राजांनी शिर्क्यांना दिले नाही याचा परिणाम शिर्के मुघलांना मिळाले"[२९].

शिर्के यांना वतन न दिल्यामुळे ते संभाजीराजांवर नाराज होते. त्यातून गणोजीराव, कान्होजीराव ही मंडळी औरंगजेबास फितूर झाली. संभाजी राजांना सिंहासनावर बसविण्यात पिलाजीराव शिर्के यांचा सहभाग होता. या सर्व घडामोडीतून शिर्क्यांनी मुघलांना सहकार्य केले. त्यांचा परिणाम स्वराज्याच्या अडचणी वाढण्यात झाला. संभाजीराजांना शृंगारपूरमध्ये पकडण्याच्या कामात औरंगजेबास खुपशी मदत शिर्क्यांनी केली असावी असा कयास इतिहास संशोधकांना आहे. कारण त्या परिसराचा विचार करता जवळच्या माणसात ते शक्य नसल्याचे जाणवते. यावरून शिर्क्यांचे स्वराज्यावरील फितुरीचे कारस्थान संभाजीराजांचा प्राण घेण्यात स्वराज्यावरील संकटात रूपांतरीत झाले.

संगमेश्वर-दाभोळ वतनदार शिर्के हे महाराजांच्या निधनानंतर काही वर्षातच स्वराज्यांच्या विरोधात गेलेले दिसतात. पिलाजी शिर्के मात्र संभाजीराजांबरोबर राहिलेला दिसतो. यावरून शिर्क्यांचे स्वराज्यावरील संकट खूपच भयानक असल्याचे जाणवते.

### ४.२० स्वराज्य आणि हरजीराजे महाडिक

महाडिक घराण्याचा फारसा इतिहास ज्ञात नाही. शहाजीराजांच्या काळात महाडिक मुघलाकडे कारभारास होते. तेव्हा परसोजीचा मुलगा हरजी हा पराक्रमी होता. त्याने शहाजीराजांची मर्जी संपादन केली. त्यांचा आणि शिवाजी महाराजांचा स्नेह जुळला. महाराजांनी आपली मुलगी अनामिका उर्फ आंबिका हिचा विवाह १६६८ मध्ये त्यांच्याशी लावून दिला.

शिवाजी महाराजांच्या अखेरच्या कर्नाटक मोहिमेत त्यांनी खूप चांगली कामगिरी केली. महाराजांच्या मृत्यूनंतर संभाजीराजांना गादीवर बसविण्यासाठी त्यांचे खूप मोठे योगदान आहे. त्यावेळी मोरोपंतांच्या घरावरील चौक्या उठविण्यात त्यांनी पुढाकार घेतला. इ.स. १६८१ मध्ये रघुनाथ हनमतेंना कैद झाली आणि कर्नाटकाचा जिंजींचा कारभार महाडिक यांच्या हातात आला. तो. इ.स. १६९४ पर्यंत त्याकडे होता. मध्यंतरी ते मुघलांना सामिल झाल्याच्या बातम्या होत्या पण त्या सर्व अफवा ठरल्या.

हरजीराजे महाडिक हे स्वराज्याचे निष्ठावंत सरदार होते. त्यांनी कर्नाटकाचा स्वराज्याचा प्रदेश इमानदारीने राखला. स्वराज्याची प्राणपणाने सेवा केली. स्वराज्य उभारणीमध्ये त्यांचा मोलाचा वाटा आहे. संभाजीराजांच्या अडचणीत ते एकनिष्ठेने उभे राहिले. आणि स्वराज्यावरील संकटे दूर करण्यात मोलाचे योगदान दिले.

### ४.२१ वर्णव्यवस्थेतील श्रेष्ठ-कनिष्ठत्वाचा संघर्ष

शिवाजी महाराजांच्या काळापासून वैदिक ब्राह्मण आणि शाक्तपंथी ब्राह्मण यांचा राजाश्रयासाठी संघर्ष होता. हा संघर्ष खूप वेळा विकोपाला गेलेला आहे. यातून सातत्याने त्यांच्यात मतभेद आणि आपल्याच जवळच्या लोकांना प्रशासन घेणे त्यांचे हितसंबंध जपणे याकडे त्यांचा ओढा असे. यातून स्वराज्याची मध्यवर्ती प्रशासन व्यवस्था क्षीण झाली होती. अशातच परकीय सत्तेचा स्वराज्य नष्ट करण्याचा घाट. या सर्व गोष्टीचा परिणाम स्वराज्यातील समस्येच्या वाढित झालेला आहे. अशा स्थितीतून स्वराज्याला सावरण्याचे, रक्षण करण्याचे कार्य संभाजीराजांना करावे लागत होते.

संभाजीराजे सातत्याने स्वराज्य रक्षणाचे कार्य करण्यामध्ये व्यस्त दिसतात. स्वराज्यांच्या रक्षणासाठी जीवनाच्या अखेरपर्यंत स्वराज्याशी द्रोह त्यांनी केला नाही ही त्यांची निष्ठा शिवपुत्र म्हणूनही आणि पराक्रमी योद्धा म्हणूनही खूप मोलाची आहे. त्यांच्या स्वराज्य रक्षणातच त्यांच्या शौर्याचे, पराक्रमाचे आणि त्यागाचे मोठेपण आहे. अपरिमित संकटाना सामोरे जाऊन स्वराज्याचे रक्षण त्यांनी केले. हा इतिहास स्वराज्याच्या अभिमानाचा इतिहास आहे.

### ४.२२ इ.स. १६८९ : एकाकी झुंज

संभाजीराजे १६८० नंतर शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर स्वराज्याचे अधिकृत राजे झाले. त्यांच्या राज्यकारभाराचं मुळी संघर्षांनी, संकटांनी आणि आप्तस्वकीयांच्या संघर्षामुळे संघर्षांनी भरलेला आहे. त्यांचे मंत्री अधिकारी यांनी त्यांना सहकार्य केले. पण काही अशी लालच, भ्रष्ट आणि इनाम-बक्षिसांना बळी पडले. याचा परिणाम स्वराज्य रक्षणावर झाला. मुघलांचा वाढता स्वराज्य नष्ट करण्याचा जोर थोपविण्याची कठीण

कामगिरी संभाजीराजापुढे होती. त्याचबरोबर वतनासाठी बक्षीसासाठी स्वराज्यातील मलुख व किल्ले हस्तगत करणारे मुघल या बाबींमुळे संभाजीराजे हतबल झाले.

## ४.२३ मातबरखानाच्या स्वाऱ्या आणि मराठा सरदाराचे अमिषाला बळी पडणे

इ.स. १६८९ च्या दरम्यान मातबरखानाने मराठ्यांचा खुपसा मुलुख जिंकून घेतला होता. या सर्व घडामोडी पाहता तत्कालीन स्वराज्याची स्थिती अधिक स्पष्ट होण्यास मदत होते. याबाबत 'ज्वलज्ज्वलनतेजस संभाजी' या ग्रंथात 'सदाशिव शिवदे' यांनी नोंदविलेली 'नियतीच्या विळख्यातील संभाजी' या ग्रंथातील नोंद पुढीलप्रमाणे, "मातबरखानाने त्र्यंबकच्या किल्याला वेढा दिला होता. तेथील अधिकारी तेलंगराव व शामराज यांना वश करून त्यांना इनामाची व बक्षिसाची आश्वासने देऊन किल्ला ताब्यात घेतला. ८ जानेवारी १६८९ रोजी हे दोन्ही अधिकारी किल्ल्याच्या खाली उतरले व किल्ला मोगलांच्या ताब्यात आला. त्र्यंबकचा किल्ला घेतल्याबद्दल बादशहाने मातबरखानाची स्तुती केली व तयाचे मनसबीत वाढ केली. इ.स. १६८९ फेब्रुवारीनंतर मातबरखानाने बागलाण-नाशिक मधील बहुतेक किल्ले मिळविले आणि माहुलीचा किल्ला जिंकला व तयास कल्याण-भिवंडीकडे पाठविण्यात आले."[३०] मोगलांच्या अमिषाला बळी पडणाऱ्या लोकांनी स्वराज्य संकटात आणले होते. स्वराज्य आपल्याच माणसांच्याकडून अडचणीत येताना दिसते.

मुघलाचे स्वराज्यावरील संकट अधिकच दाट होत असताना आपल्याच माणसांनी वतनांना बळी पडून स्वराज्य नष्ट करणे, संभाजीराजांना एकाएकी पाडणे यातूनच संभाजीराजांचा अखेर भयानक झाला. रायगडावर स्वारी करण्याचे मुघलाचे डाव पाहता मुघल साम्राज्य संपूर्ण स्वराज्यालाच संपविण्याचा डाव आखत होते, असे दिसते. यासाठी त्यांनी सर्व मार्गाचा अवलंब केलेला आहे.

## ४.२४ रायगडची मेणाची प्रतिकृती

रायगड ही मराठ्यांची व स्वराज्याची राजधानी होती ती जिंकणे म्हणजे मराठी राज्य जिंकणे, ही व्यूहरचना मुघलांनी आखलेली होती. यासाठी औरंगजेबाने मोगल सरदार

अब्दुल्लाखान यास रायगडावर जाऊन किल्यास वेढा देण्यास सांगितले. सरदार अब्दुल्लाखान हा रायगडाच्या परिसरात पोहचल्यानंतर औरंगजेब बादशाहाने महादजी निंबाळकर (संभाजी राजांचे मेव्हणे) यांना रायगडची मेणाची प्रतिकृती तयार करण्याचे आदेश दिले. त्या सूचनेनुसार प्रतिकृती तयार झाली. महादजी निंबाळकरांनी संभाजीवर चालून जावे आणि त्यास पकडून आणावे असे ठरले पण काही कारणाने औरंगजेबाने रायगडावरील स्वारीचा बेत थांबविला.

संभाजीराजांना पकडण्याची कामगिरी त्यांच्या नात्यातील लोकांनी घेतली असल्याची नोंद 'सदाशिव शिवदे' आपल्या ग्रंथात करताना म्हणतात, "संभाजी राजांना कैद करण्याची कामगिरी खुद्द त्यांचे मेहुणे स्वीकारण्यास तयार होतात आणि त्यांना अभय देण्याबद्दल बादशहाकडून शब्द मागतात हे ही नसे थोडके ! कवी कलशाच्या मुलाचा रायगडची प्रतिकृती करण्यासाठी उपयोग करून घेण्याबद्दल बादशाहाचा आदेश ही गोष्ट कवी कलशाचेबद्दल संशय घेण्यासारखी वाटते."[३१] प्रस्तुत ठिकाणी शिवदे सदाशिव यांनी नोंदविलेले मत 'मराठा-मोगल संघर्ष' या ग्रंथावरून नोंदविले आहे. या नोंदीमध्ये महादजी निंबाळकर संभाजीराजांना पकडण्याचा मनस्वी प्रयत्न करताना दिसतात. कवी कलशांच्या मुलाचे नाव या प्रकरणाशी जोडणे हेतूतः चूक आहे. कारण कवीकलश शेवटपर्यंत संभाजीराजांशी एकनिष्ठ राहतो आणि एकनिष्ठपणे शेवटी मृत्यूलाही सामोरा जातो. यातून तो दगलबाज आणि भ्रष्ट असल्याचे स्पष्ट होत नाही.

### ४.२५ मुकर्रबखानाची संभाजीराजावर स्वारीची तयारी

औरंगजेब बादशाहाने संभाजीराजांना पकडण्यासाठी मुकर्रबखान याला पाठविले होते. सर्वप्रथम पन्हाळगड त्याला हस्तगत करायचा होता. त्यादृष्टीने त्याने पन्हाळगडाकडे जाण्यास सुरूवात केली. औरंगजेबाच्या हेरांनी बातमी आणली. संभाजीराजे एकटेच पन्हाळगड व संगमेश्वराच्या परिसरात असल्याचे समजले. बादशाहाने विलंब न लावता मुकर्रबखानाला संगमेश्वरच्या मोहिमेवर पाठविले. खान अत्यंत चिकाटीने, निर्धाराने या

मोहिमेवर गेला. मोजक्या सैन्यांनिशी असणाऱ्या संभाजीराजांना पकडण्यासाठी रचना केली. अखेरच्या क्षणी संभाजीराजे निकराने लढले पण खानाच्या सैन्य सामर्थ्यापुढे त्यांचा निभाव लागला नाही. संभाजीराजांना पकडण्यासाठी खान आला होता तेव्हा त्याची व मुघलांची मिळून पंचवीस हजारी व २१ हजार स्वारांची मनसब होती.

संगमेश्वरला डोंगरदऱ्यातून जाताना खानाने आपल्याबरोबर शहाजादा महंमद आज्जम व त्याचे कसलेले सेनानी, चाळीस हजार सैन्य होते. त्यापैकी २००० स्वार व १००० पायदळ एवढेच सैन्य घेतले. संगमेश्वरच्या हल्ल्यात संभाजीराजांबरोबर मालोजी घोरपडे आणि चारशे-पाचशे सैन्यांनिशी होते. अशा बिकट स्थितीत त्यांनी बादशाहाच्या सैन्याला चकवा देण्याचा प्रयत्न केला पण तो प्रयत्न यशस्वी झाला नाही आणि संभाजी राजे मुघलाच्या हाती सापडतात.

संभाजीराजांनी आयुष्याच्या अखेरपर्यंत स्वराज्यासाठी, रयतेसाठी सातत्याने संघर्ष, लढाया आणि धोका पत्करला. याचा परिणाम स्वराज्य रक्षण व लोकांच्या कल्याणासाठी झाला.

प्रस्तुतच्या प्रकरणामध्ये संभाजीराजांचे धर्म विचार, स्वराज्य रक्षण आणि एकाकी संघर्ष या बाबींचा तपशिलवार विचार केलेला आहे. यातून संभाजीराजांचे जे अभ्यासाअंती दर्शन झाले ते मनाला भावणारे, प्रेरणा देणारे आहे. या प्रकरणामध्ये विचार करत असतांना काही निष्कर्ष हाती आले, ते पुढील प्रमाणे :

१. संभाजीराजांनी धर्मकार्यांना, मठांना, देवळांना वारीला, यात्रांना, दानधर्म आणि सर्व तो परी सहकार्य केले. राजा म्हणून त्यांना या गोष्टी करणे महत्त्वाचे होते.
२. संभाजीराजे यांचा धर्म हा राजधर्म होता. पारंपरिक कोणत्याही धर्म विचारात त्यांना बसविणे, त्यांच्या विचाराशी व जीवनमूल्यांशी द्रोह केल्यासारखे होईल.
३. बखरकारांनी कल्पिलेले धर्मविचार आणि संभाजीराजांनी निर्मिलेला धर्म एकच नसून तो भिन्न-भिन्न मूल्यांवर आधारित असा धर्म आहे.

४. वैदिक धर्म आणि शाक्त या दोहोंच्याप्रती संभाजीराजांना सारखीच आपुलकी होती. त्यांनी दोहोंतील कोणत्याही एक विचारांचा स्वीकार केला नाही, म्हणून त्यांना धर्मसंप्रदायाशी जोडणे योग्य नाही.

५. धर्मपीठे, क्षेत्रे आणि साधूसंतांना दानपत्र दिली. त्यांच्या स्थळांना भेटी दिल्या. यावरून संभाजीराजांचा त्यांच्याशी वैयक्तिक संबंध जोडता येत नाही. राजा म्हणून हे करणे संभाजीराजांचे कर्तव्य होते. त्याच भावनेतून ते करताना दिसते. हिंदू साधू प्रमाणे मुस्लिम सुफी साधूंना त्यांनी साह्य केले.

६. संभाजीराजांनी आश्रय नसणाऱ्या निराश्रित लोकांना आश्रय दिला. या दृष्टीने कांदळगावचे पत्र पाहण्यासारखे आहे. या पत्रावरून त्यांचा मानवतावादी दृष्टीकोन स्पष्ट होतो.

७. शहाजीराजे-शिवाजी महाराज यांच्यापासून धर्मक्षेत्रांना इनाम देण्याची प्रथा चालू होती. ती प्रथा संभाजीराजांनी बंद केली नाही. तसेच नवीन चालूही केली नाही.

८. रामदासांच्या चापळ मंदिरास व मठांना वर्षासने दिल्याच्या नोंदी सापडतात. स्वतः शिवाजी महाराज-संभाजीराजे या मठात गेल्याची अधिकृत नोंद तत्कालीन कागदपत्रात सापडत नाही. या दोहोंचा संबंध स्वामींशी ओढून ताणून लावणे ऐतिहासिकदृष्ट्या बरोबर नाही आणि वर्षासने दिली महणजे त्यांना तत्वज्ञान मान्य होते, असा निष्कर्ष लावणे म्हणजे राजाची कर्तव्य दृष्टीआड करणे होय.

९. संभाजीराजांनी सक्तीची धर्मांतरे रोखण्यासाठी सातत्याने प्रयत्न केले आणि ज्यांनी धर्म स्वीकारलेला होता त्यांना पुन्हा धर्मात आणण्याचा प्रयत्न केला.

१०. बुधभूषण ही वाङ्मयीनदृष्ट्या आणि राजनीतीदृष्ट्या श्रेष्ठ दर्जाची कलाकृती आहे. या कृतीतून राजधर्म नितीमत्तेच्या मूल्यांवर उतरताना दिसतो. या ग्रंथातून मैत्रीभाव जपण्याचा संदेश तथागत गौतम बुद्धाप्रमाणे दिलेला आहे.

११. शिवाजी महाराजांच्या मृत्यूनंतर इ.स.१६८० ला स्वराज्यावर आप्तस्वकीय आणि परकीय शक्तीचे संकट आले होते. या अरिष्टाला संभाजीराजांनी धैर्याने तोंड दिले.

१२. संभाजीराजांनी सिद्दी, इंग्रज, पोर्तुगीज, अरब आणि मुघल यांच्यामध्ये आपल्या पराक्रमाचा कर्तृत्वाचा दरारा निर्माण केला होता. काहींनी सहकार्याचा, मैत्रीभाव जपला; तर सिद्दी, मुघल यांनी पूर्वीप्रमाणे वैर जपले. संभाजीराजे यांना पुरून उरले.

१३. संभाजीराजांनी सातत्याने स्वराज्याच्या रक्षणासाठी संघर्ष केला. दु:ख सहन केले, मृत्यूलाही सामोरे गेले. अत्यंत धैर्याने स्वराज्याचे रक्षण केले.

**संदर्भसूची :**


१. जोशी, रामशास्त्री : श्रीसार्थ दासबोध, श्री गजानन बुक डेपो, मुंबई१९२० पृ. १३५

२. पारीख, गोवर्धन (संपा): नवभारत (अंक-११) पाठशाळा मंडळ, वाई, दी प्राज्ञप्रेस वाई ऑगस्ट १९६५ पृ ९

३. साने, का.ना. : मल्हार रामराव चिटणीसकृत श्रीमंत छत्रपती संभाजी महाराज यांचे चरित्र (मराठी) भा.इ.सं.मं. पुणे १९४३ पृ.९

४. गोखले, कमल : शिवपुत्र संभाजी, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे २०१४ पृ. ४२३

५. गोखले, कमल : कित्ता पृ. ४२७

६. गोखले, कमल : कित्ता पृ. ३७२

७. जोशी, शं.ना. (संपा) : मराठे कालीन समाज दर्शन, पुणे सत्कार समिती पुणे १९६० पृ. २४८

८. राजवाडे, वि.का. (संपा) : भारत इतिहास संशोधन मंडळ अहवाल, आश्विन पौष, शक १८४४ आणि चैत्र १८४५व-३ पृ. ११२.

९. राजवाडे, वि.का. (संपा) : भा.इ.सं.मं. अहवाल, : कित्ता पृ.४६९

१०. सरदेसाई, श.वि. (संपा) : पेशवे दप्तर संग्रह किंवा पुणे एलिनेशन ऑफिस (म) शाहू रोजकिर्दी-शासे, रूमाल पेशवे दप्तर ग्रंथमाला क्र. ३९ पुणे १९३४ लेख -४२.

११. राजवाडे, वि.का. (संपा) : मराठ्यांच्या इतिहासाची साधने (खंड-२०) भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे १९१५ पृ. २८१.

१२. राजवाडे, वि.का. (संपा) : ऐतिहासिक संकीर्ण साहितय (खंड-६) भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे स्वाय.ग्र.मा. ८५

१३. राजवाडे, वि.का. (संपा) : भारत इतिहास संशोधन मंडळ (त्रैमासिक) आश्विन, पौष शक १८४४ आणि चैत्र शक १८४५ वर्ष ३, अंक २-३-४ पृ. ३२८.

१४. राजवाडे, वि.का. (संपा) : श्री. समर्थ सांप्रदायाची कागदपत्रे, रामदास आणि रामदासी ग्रंथमालेचे भाग २ भा.इं.सं.मं. पुणे १९३१ पृ. ५५९.

१५. राजवाडे, वि.का. (संपा) : संभाजीकालीन पत्रसार संग्रह, भा.इ.सं.मं. स्वीय ग्रंथमाला क्र. ७५, पुणे १९४९ पृ. २३०

१६. कुलकर्णी, अ.ना. (संपा) : शिवचरित्र साहित्य (मराठी) खंड-१, भा.इ.सं.मं. पुणे ग्रंथमाला पुरस्कृत १९३० पृ. ४९.

१७. राजवाडे, वि.का. (संपा) : भारत इतिहास संशोधन मंडळ त्रैमासिक उनि पृ. ४९.

१८. कुलकर्णी, अ.ना. (संपा) : शिवचरित्र साहित्य (म) खंड-३ लेखः ५५९

१९. पोतदार, म.म.द.वा. (संपा): दानपत्र- संभाजी संग्रह, भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे १९३८ पृ. १६२.

२०. राजवाडे, वि.का. (संपा) : श्रीसमर्थ सांप्रदायाची कागदपत्रे उनि. पृ. ३७२.

२१. राजवाडे, वि.का. (संपा) : श्रीसमर्थ सांप्रदायाची कागदपत्रे कित्ता पृ. ३७

२२. कदम, रामकृष्ण आनंदराव (संपा) : बुधभूषण-राजनीती, कोमल एंटरप्राइजेस प्रकाशन पुणे २०१२ पृ. ४५.

२३. कदम, रामकृष्ण आनंदराव (संपा) : बुधभूषण-राजनीती, कित्ता पृ. २४१.

२४. कदम, रामकृष्ण आनंदराव (संपा) : बुधभूषण-राजनीती, कित्ता पृ. २४२.

२५. साळूंखे आ.ह. : सर्वोततम भूमिपुत्र : गौतम बुद्ध, लोकायत प्रकाशन, सातारा २०१४ पृ. ३५७.

२६. कुलकर्णी, अ.ना. (संपा) : शिवचरित्र प्रदीप, उनि पृ. ५३.

२७. राजवाडे, वि.का. (संपा) : भारतवर्ष मासिक (मराठी) प्रतिनिधीची बखर, भा.इ.स.मंडळ पुणे १९३३ पृ. २७.

२८. पगडी, सेतू माधवराव : हिंदवी स्वराज्य आणि मोगल, साहित्य अकादमी प्रकाशन, नई दिल्ली १९६१ पृ. २००

२९. शिवदे, सदाशिव : ज्वलज्वलनतेजस संभाजी, डायमंड पब्लिकेशन्स, पुणे २००१ पृ. ३३१.

३०. शिवदे, सदाशिवः ज्वलज्वलनतेजस संभाजी, कित्ता : पृ. ३३२.

३१. शिवदे, सदाशिवः ज्वलज्वलनतेजस संभाजी, कित्ता : पृ. ३४२.

*****

# प्रकरण पाचवे

## उपसंहार

छत्रपती संभाजी महाराज यांचा राज्यकारभार : या प्रस्तुत विषयाचा, संशोधनात्मक अभ्यास करत असताना हाती आलेल्या निष्कर्षाची मांडणी, या प्रकरणात करावयाची आहे. संभाजीराजांना केवळ बत्तीस वर्षाचे आयुष्य लाभले, अतिअल्प आयुष्यामध्ये त्यांना आजी जिजाऊ, शिवाजी महाराज आणि सावत्र आईचे प्रेम लाभले. त्यांच्या आयुष्यातील सात-आठ वर्ष लहानपणाची सोडली, तर त्यांच्या आयुष्यात शांतता लाभली नाही. नेहमीच संकटे, गैरसमज, आपल्याच माणसाकडून विरोध आणि शेवटी शत्रूच्या हाती सापडणे. मृत्यूसमयी झालेले हाल, मृत्यूलाही भयकंपीत करणारे हे क्षण समजून घेताना मन भयभित होऊन जाते.

संभाजीराजांना आईच्या मृत्युनंतर पोरकेपण आले. अशा वेळी अत्यंत वात्सल्यदायी जिजाऊ यांचे आईसमान प्रेम मिळाले. शिवाजी महाराजासारख्या पित्याचे प्रेम मिळाले. लहानपणी त्यांच्यावर रामायण-महाभारत आणि भारतीय संस्कृतीतील मूल्यांचे संस्कार केले. त्यांना स्वराज्याचा राजपुत्र म्हणूनचं शिक्षण देण्यात आले. यामध्ये लिपिज्ञान, शस्त्रास्त्रे शिक्षण, कुस्ती इत्यादी देण्यात आलेले होते. संभाजीराजांनी शिक्षणावर अल्पावधीमध्ये प्रभुत्व प्राप्त केले होते. अगदी वयाच्या लहानपणी सुमारे नवव्या वर्षी त्यांना अत्यंत अवघड आणि दूरच्या आग्र्याच्या भेटीला शिवाजी महाराज घेऊन गेले होते. आग्र्याच्या कैदेत शिवाजी महाराज सापडल्यानंतर संभाजी राजांनी खूप महत्त्वाची भूमिका पार पाडली आणि त्यांच्या सुटकेचा प्रयत्न केला.

अल्पवयात मोघलांची मनसब संभाजीराजांना मिळाली होती. त्यानिमित्ताने त्यांना मुघलांच्या मनसबदारीवर जावे लागले. तेव्हापासून संभाजीराजे राज्यकारभारात वावरताना दिसतात. शिवाजी महाराजांसारख्या स्वराज्य निर्मात्यांचा पुत्र म्हणून संभाजीराजे यांच्या

पराक्रमाची, धैर्याची तुलना होताना दिसते. अशी तुलना अप्रस्तुत असते. प्रत्येक महान मानवाच्या जीवनचरित्रातील जडण-घडण, सामोरे जावे लागणारे प्रसंग भिन्न-भिन्न असतात. भिन्न-भिन्न परिस्थितीला त्यांनी दिलेली प्रतिक्रिया यासारख्याच वाटत असल्या तरी त्या प्रासंगिक दृष्ट्या भिन्न-भिन्न असतात. त्यांच्या-त्यांच्या ठिकाणी ते श्रेष्ठ आणि मोठे असतात. शिवाजी महाराजांसारख्या पराक्रमी पित्याच्या पार्श्वभूमीवर संभाजीराजांच्या कर्तृत्वाची होणारी तुलना, संभाजीराजांना योग्य न्याय देऊ शकत नाही. शिवाजी महाराज राज्यकारभार पाहत असताना स्वराज्याची स्थिती वेगळी होती. संभाजीराजांच्या काळात स्वराज्यांची स्थिती फारच बदललेली होती. म्हणून त्या-त्या व्यक्तिमत्वांची तुलना त्यांची-त्यांच्याशी केल्यास सत्याच्या अधिक जवळ जाता येईल.

शिवाजी महाराजांनी आपल्या मृत्यूसमयी स्वराज्याचा उत्तराधिकारी निवडलेला, नसल्यामुळे संभाजीराजांना राजापद सुध्दा संघर्ष करूनच मिळवावे लागले. त्यावेळी अष्टप्रधान आणि सेनापती हंबीरराव मोहिते यांच्यात दोन गट पडले. यातूनच शिवाजी महाराजाच्या मृत्युची बातमी दडवून ठेवण्याचा प्रयत्न अण्णाजी दत्तो, मोरोपंत पंडित यांनी केला. आणि संभाजीराजांना पकडण्याचे आदेश दिले. यातूनच लहान राजारामराजांना मंचकारोहन केले. त्यामुळे रागावलेल्या संभाजीराजांनी मंत्र्यांना व सावत्र आई सोयराबाई यांना ठार मारले असा दोषारोप होतो. संभाजीराजे उग्र, रागीट, व्यसनी, स्त्रीलंपट इत्यादी आरोपही त्यांना चिकटवण्यात आले आणि त्यांचे अवघे व्यक्तिमत्त्व छिन्न-विछिन्न करण्यात आलेले आहे.

संभाजीराजांच्या अंगी विलक्षण शौर्य आणि पराक्रम होता, हे सर्वांनाच मान्य आहे. पण दूरदृष्टीचा अभाव, व्यसनाधिनता या गुणांमुळे त्यांच्या अंगभूत गुणांना वाव मिळाला नाही. त्यांच्याजवळ विवेकी आणि विचार यांचा अभाव होता, असा गैरसमज सर्वत्र पसरविण्यात आला. त्यांच्याकडे अलौकिक गुणसंपन्नता आणि विवेकी विचार होते, यांची साक्ष त्यांच्या कार्यकर्तृत्वावरून येते.

संभाजीराजांनी आवेशाच्या भरात अविवेकीपणाने कोणास मृत्यूदंड दिल्याची घटना इतिहासात ज्ञात नाही. पन्हाळ्यावर पकडण्यासाठी अण्णाजी दत्तो, मोरोपंत पंडित आणि सोयराबाई यांनी आदेश दिले. म्हणून त्यांना क्रूरपणे, अविचाराने ठार केले, असे म्हणता येणार नाही. कारण या कटाबाबत त्यांनी समज देऊन त्यांचा मंत्र्यांचा दर्जा कायम ठेवला. पुढे विषप्रयोगांचा कट उघड झाल्यानंतर अण्णाजी दत्तोला ठार मारले. मोरोपंतांचा कैदेत असताना मृत्यु झाला आणि सोयराबाईच्या मृत्युबाबत इतिहासात नोंद नाही. यावरून राजद्रोहांच्या आरोपात पकडलेल्या मंत्र्यांना दिलेली शिक्षा योग्य आणि न्यायपूर्णच होती.

संभाजीराजांनी शिर्केचा पूर्ण पाडाव केला. याबाबत शिर्केचे 'शिरकाण' केले असे म्हणण्याचा प्रघात आहे. तो ही खोटाच आहे. 'शिरकाण' म्हणजे शिर्क्यांची हत्या-कत्तल असा नसून, जसा फिरंग्यांचा प्रदेश तो 'फिरंगाण' होय तसेच शिर्क्यांच्या प्रदेशाला 'शिरकाण' असे म्हणतात.

संभाजीराजांना स्त्री-विषयक आसक्तीचे आणि मद्यपानाचे त्यांच्यावर वारंवार आरोप करण्यात येतात. या दोन्ही व्यसनांच्या विळख्यात सापडलेला माणूस स्वतःसह राज्याचाही नाश करतो. अशा माणसाच्या हातात सैन्यकारभार देणे योग्य नाही, असा सर्वत्र समज बखरकार, नाटककार, काव्यनिर्माते इत्यादींनी निर्माण केला. याबाबत पोर्तुगीज, इंग्रज आणि डच इत्यादीच्या बातमीपत्रातून, तत्कालीन नोंदी सापडतात. यावरून अभ्यासकांनी आपली मते बनविलेली आहेत. पण या मताचा चिकित्सक अभ्यास केल्यास ही साधने अतिशयोक्ती, भाकडकथा आणि द्वेषातून लिहिल्याचे समोर येते. यामुळे संभाजीराजांचे व्यक्तिमत्व विपर्यस्त होऊन जाते. त्यांच्या हातून वाईट घडल्याची अस्सल नोंद तत्कालीन कागदपत्रातून उपलब्ध होत नाही. यावरून संभाजीराजांच्या व्यक्तिमत्त्वाला दोष लावण्यास जागा नाही. त्यांचे कार्य-कर्तृत्व पाहता त्यांनी असे विलासी जीवन जगले असेल, असे म्हणता येत नाही.

डिसेंबर १६८२ मध्ये इंग्रज अधिकारी स्मिथ, १६८४ साली इंग्रज वकील कॅ. गॅरी, थॉमस विल्किन्स, १६८७ सालच्या सप्टेबर महिन्यात जॉर्ज वेल्डन, रॉबर्ट ग्रॅहॅम हे वकील रायगडावर आलेले होते. तहाच्या वाटाघाटींसाठी त्यांचा अनेक दिवस मुक्काम रायगडावर होता. १६८० साली ड्यु वकील रेस्डिेंट लेफेबेर राजांना पन्हाळ्याला भेटला होता. १६८५ मध्ये पोर्तुगीज वकिल राजांना रायगडावर भेटला. त्यात फ्रॅ आंतोनियु द सांब जुझेफ आणि खूप प्रवाशी माणसे होती. या परकीय लोकांचा संभाजीराजांना सहवास कामानिमित्ताने लाभलेला आहे. यांनी कोठेही संभाजीराजांच्या व्यसनाबाबत नोंदविलेले नाही, वा आपल्या अधिकाऱ्यांना सांगितलेले दिसत नाही. परकीय सत्ताधीश शत्रूच्या दोषाचा खूप अभ्यास करून फायदा उठवत असतात. यामुळे  त्यांनी हे दोष फायदा उठविण्यासाठी नोंदविले असते. पण तशी नोंद नाही. यावरून संभाजीराजांच्या बाबत पसरविण्यात आलेले समज खोटे असल्याचे स्पष्ट होते.

स्वराज्य सामाजिक-राजकीय व्यापक प्रणाली असून, तिला दर्शनिक तत्वज्ञानाच्या मूल्यांची जोड असते. त्या मूल्यांवर ती व्यवस्था उभी राहिलेली असते. स्वराज्याची मूल्यव्यवस्था, क्षमता, लोककल्याण आणि समतेचा विचार ही मुल्ये राज्य व्यवस्थेच्या केंद्रस्थानी असताना दिसतात. धर्मसंस्था आणि शोषण यापासून मुक्त असणारी व्यवस्था स्वराज्याची दिसते. सर्वसामान्यांच्या हिताचा विचार स्वराज्याच्या निर्मितीमागे होता. याच दृष्टीने शहाजीराजांनी स्वराज्याचा संकल्प मांडला आणि शिवाजी महाराजांनी स्वराज्य उभारणी केली. त्या स्वराज्याचे रक्षण आणि विस्तार करण्याचे काम संभाजीराजांनी आयुष्यभर आपले जीवितकार्य मानले.

संभाजीराजे स्वराज्य वत्सल होते. तसेच ते कुटुंब वत्सलही होते. त्यांनी दोहोंचाही योग्य समन्वय व समतोल साधलेला आहे. आपल्या कुटुंबाकडे सावत्र आई व राजाराम यांच्या प्रती त्यांच्या मनात अतिव आदर होता. त्यांच्याप्रती असणारी कर्तव्ये त्यांनी योग्यरित्या पार पाडली.

संभाजीराजांनी राज्यकारभार इ.स. १६८० ला आपल्या हाती घेतला. थोड्याफार दिवसात स्थिरस्थावरता प्राप्त होते न होते, तोच औरंगजेबाचा मुलगा अकबर शहाजादा त्यांच्या आश्रयासाठी आला. त्याला आश्रय द्यावा न द्यावा या विचारातच बरेच दिवस गेले आणि शेवटी आश्रयास तो मराठी मुलखात येऊन दाखल झाला. संभाजी राजांनी राजकीयदृष्ट्या उमीर-उमराव अकबर शहाजादाला मदत करतील. यांच्या मदतीने औरंगजेब बादशहाला त्यांच्याच राज्यातील बंडाला तोंड द्यावे लागेल, असा विचार संभाजीराजांनी केला. पण औरंगजेबाच्या सरदाराने मनसबदारांनी त्यांच्या विरोधात अकबर शहजादा याला मदत केली नाही आणि संभाजीराजांचे धोरण फसले. औरंगजेबाने त्यांच्या विरोधात मोठी मोहिम काढली. मराठी मुलखाला चारी बाजूंनी हल्यांना तोंड द्यावे लागले. पन्हाळा, सातारा, वाई इत्यादी ठिकाणे मुघलांच्या ताब्यात गेली.

अकबर शहजादा याला आश्रय दिल्यामुळे, औरंगजेब बादशाह मराठी स्वराज्यांवर चालून गेला, हे सर्वार्थाने सत्य नाही. तो यापूर्वीपासून संभाजीराजांना पकडण्याच्या व स्वराज्य नष्ट करण्यासाठी तयारी करत होता. या घटनेमुळे मात्र तो नियोजनपूर्वक स्वराज्यावर चालून आला. संभाजीराजे अकबर शहजादाला आश्रय देतात यातून त्यांचे धाडस, राजकीय डावपेच दिसून येतात. औरंगजेबासारख्या मोठ्या शत्रूशी सामना करणे, त्याला चकविणे, त्याच्या साम्राज्याला हादरे देणे, हे त्यांचे कृत्य त्यांच्या धाडसी, पराक्रमी स्वभावाशी सुसंगत असेच आहे.

संभाजीराजांनी स्वराज्याचा कारभार जेमतेम आठ-नऊ वर्ष पाहिला. या कालावधीत आप्ताशी संघर्ष, मुघलाशी संघर्ष, पोर्तुगीज-डच-सिद्धी आणि इंग्रज यांच्याशी युद्धे झालेली आहेत. या काळात संभाजीराजांना अपमानीत व्हावे असे प्रसंग आले नाहीत. असंख्य वेळा शिवाजी महाराजांना तहा सारख्या गोष्टी कराव्या लागल्या; पण संभाजी राजांना अशा गोष्टी कराव्या लागल्या नाहीत. हरजीराजे महाडिक यांच्या करवी कर्नाटकात स्वराज्याचा विस्तारच त्यांनी केला. त्यांच्या कालखंडात स्वराज्यातील कायदा सुव्यवस्था अत्यंत सुस्थितीत होती.

संभाजीराजांनी राज्यकारभारातील परंपरागत नियम, तह, अटी आणि धोरणे शिवाजी महाराजांनी राबविली होती. तीच अंमलात आणली. इंग्रज-पोर्तुगीज या सत्ताधिशांना संभाजीराजाबाबत खुप विश्वास वाटत असे. संभाजीराजे शब्दाचे पक्के असल्याचा अनुभव या परकियांना वाटत होता. संभाजीराजे यांनी आपला दरारा नेहमीच त्यांच्यावर ठेवला. अरबांच्या मदतीने सिद्दीला सतत झुलवत ठेवले. त्यांचा स्वराज्याला उपद्रव होणार नाही याची काळजी घेतली. पोर्तुगीज यांच्याशी सागरी वाहतूकीचा तह केला आणि दारूगोळ्यांचे दोन कारखाने काढले. त्यासाठी लागणारा कच्चा माल इंग्रज-पोर्तुगीज यांच्याकडून घेतला. प्रगत शस्त्रास्त्रे खरेदी केली, यावरून त्यांचा धोरणात्मक राज्यकारभार दिसून येतो.

शिवाजी महाराज यांचे शेवटच्या काळात पोर्तुगीजांशी संबंध फारसे चांगले नव्हते. ते ताणलेलेच होते. संभाजी राजांनी स्वराज्यांची सूत्रे हाती घेतली आणि त्यांच्याशी असणारे संबंध पूर्णतः बदलून मैत्रीपूर्ण संबंध प्रस्थापित केले. त्यांनी मुघलांशी हात मिळवणी करू नये, यासाठी त्यांनी हे धोरण स्वीकारले. पोर्तुगीजांला मराठे सैन्य नेहमीच पळपुटे वाटे. पण संभाजीराजांच्या नेतृत्वाखाली जो संघर्ष झाला, यावरून त्यांची पक्की खात्री झाली की पूर्वेकडील बाजुस मराठ्यांच्या सारखा शत्रू नाही.

औरंगजेब सर्व शक्तीनीशी स्वराज्यावर यापूर्वी केव्हा चालून आला नव्हता; तो स्वतः संभाजी राजे यांच्या विरोधात स्वारीवर येण्यास निघाला होता. यावरून या स्वारीचे सामर्थ्य लक्षात येण्यास मदत होते. कसलेला सेनानी, अनुभवी, पराक्रमी असा बादशहा मराठ्यांच्यावर चालून जातो. तेव्हा मराठ्यांची मुघल सत्तेला असणारी भीती स्पष्ट होते आणि यावरून स्वराज्यावर येऊ घातलेले संकट हे किती मोठे होते याची साक्ष पटते. संभाजी राजांनी अत्यंत सावधपणे आणि धैर्याने या संकटांना आपल्या सेनापतीच्या मदतीने सामोरे गेले. आणि काही काळ यशस्वीही झाले.

शिवाजीमहाराजांच्या काळी जेवढे सैन्य सामर्थ्य होते त्यामध्ये थोडीफार वाढ संभाजीराजांनी केली आणि सैन्य सामर्थ्य वाढविले असे दिसते. सैन्याची व्यवस्था, न्यायव्यवस्था, अष्टप्रधान मंडळ या बाबीमध्ये कोणताही बदल केला नाही. सर्व राज्यकारभार त्या-त्या मंत्र्यांच्या सल्ल्याने चालत असे. अंतिमतः राजा म्हणून सर्वेसर्वा संभाजीराजे होते असे असतांनाही संभाजींनी कारभारात ढवळाढवळ केली नाही. मंत्र्यांच्या, सेनापतीच्या आणि सामान्य जनतेच्या सूचनांचा आदरपूर्वक विचार केला आणि राज्यव्यवस्था अधिक कार्यक्षम बनविण्याचा प्रयत्न केला. संभाजीराजे शिवाजी महाराजांप्रमाणे युद्ध आघाडीवर जात असत. मंत्र्यांनाही सेनापतीच्या पदावर नियुक्त केलेले होते.

संभाजीराजांची राजकीय यशस्वीता म्हणजे कल्याण, भिवंडी, रायगड, पुरंदर, इत्यादीवर औरंगजेबाने सतत स्वाऱ्या केल्या, पण सलग तीन वर्षे त्याला पराभवाला सामोरे जावे लागले. यामुळे त्यांनी आपला स्वारीचा बेत विजापूर-गोवळकोंडा या दिशेनी वळविला आणि संभाजीराजाचा पूर्ण बिमोड केल्याशिवाय डोक्यावर टोपी घालणार नाही, अशी प्रतिज्ञा केली. आपल्या सरदारावर दक्षिणेकडील कामगिरी सोपवून, तो उत्तरेत निघून गेला.

संभाजीराजांच्या कारकीर्दीत भात, सुपारी, नारळ यावरील कर, जकात आणि चौथाई हीच उत्पन्नाची साधने होती. शत्रूच्या प्रदेशात लुट करण्यामागेही उत्पन्न मिळविण्याचाच हेतू असे. संभाजीराजांनी शत्रू पक्षातील प्रदेश, बाजारपेठा, सावकार यांना लुटले. या संपत्तीचा उपयोग स्वराज्य उभारणीसाठी, रक्षणासाठी केला. संभाजीराजांनी औरंगाबाद, बुऱ्हाणपूर ही शहरे लुटली आणि अमाप संपत्ती मिळवली. या लुटीमुळे शिवाजी महाराजांच्या सुरतेच्या लुटीचे स्मरण होते. या लुटी परिपूर्ण होत्या.

शेतीचे उत्पन्न वाढविणे, पडिक जमीनी लागवडीखाली आणणे, या दृष्टीने बंधारे बांधले. ओढ्याच्या दिशा बदलल्या. आधुनिक शेती व्यवसायाची पायाभरणी त्यांनी केली, असे म्हटल्यास वावगे वाटू नये. बैल, धान्य याबाबत सवलती दिल्या. यामुळे शेतकऱ्यांना प्रोत्साहन मिळाले. दुष्काळ, आक्रमणे, अवर्षणे इत्यादीमुळे स्वराज्यात धान्याची टंचाई निर्माण होई. अशा वेळी संभाजीराजांनी सुरत, अहमदाबाद यांच्याकडून धान्याची आयात केली. इ.स. १६८४-८६ दरम्यान सुरत-अहमदाबाद व अन्य बंदरातून अन्न-धान्य, दारूगोळा, शिसे इत्यादी गोष्टींचा पुरवठा होत असल्याच्या नोंदी पाहण्यात आल्या. इ.स. १६८६ च्या दरम्यान मराठ्यांच्या हालचाली मंदावलेल्या होत्या. यामागे दुष्काळ, अन्न-धान्याची टंचाई आणि उपासमारीची वेळ इत्यादी कारणांनी हा काळ तणावाचा वाटतो. यामुळे संभाजीराजांनी या दरम्यान काहीच केले नाही असा निष्कर्ष काढणे योग्य होणार नाही. नैसर्गिकरित्या निर्माण झालेल्या संकटांनाही तोंड देणे महत्त्वाचे असते.

संभाजीराजांनी शत्रूच्या हल्ल्याने भयभीत होऊन प्रदेश सोडलेल्या लोकांना पुन्हा स्वराज्यात आणले. ज्यांचा शेतसारा अथवा अन्य कर जमा करण्याचा तगादा लावला. यावरून त्यांचे राज्यव्यवस्थेतील लक्ष दिसून येते. संभाजीराजांनी अडल्या-नडल्यांना आधार दिला. त्यांना नव्याने उभे केले आणि स्वराज्याचे सामर्थ्य वाढविले.

संभाजीराजे मृत्यूला सामोरे गेले, तो त्यांचा बाणेदारपणा योद्धा राजपुत्राला, राजाला आणि त्यांच्या जिवीतकार्याला शोभणारा आणि संपन्न बनविणारा आहे. स्वराज्यरक्षक संभाजीराजा असे विशेषण प्राप्त व्हावे, इतके महान कार्य त्यांनी आपल्या आयुष्यभरामध्ये केले. स्वराज्य रक्षण करताना, लोकांची काळजी करताना, स्वतःच्या प्राणाचीही काळजी केली नाही. त्यांच्या कार्यकर्तृत्वात व त्यागात आजच्या महाराष्ट्रापुरते स्वप्न फुलत होते. धनंजय कीर म्हणतात तसे, 'राजाचे डोळे फुटले आणि महाराष्ट्रातील जनतेचे डोळे उघडले' यातून त्यांची कल्याणकारी राज्यव्यवस्था, प्रशासन व्यवस्था दिसून येते.

*****

# संदर्भग्रंथ सूची


१. आपटे द. वि. (संपा), मुधोळ संस्थानच्या घोरपडे घराण्याचा इतिहास, कॉन्टिनेंटल प्रकाशन पुणे १९३४.

२. आपटे द. वि. महाराष्ट्राचा पत्ररूप इतिहास, पुणे प्रकाशन पुणे १९४१

३. आपटे द. वि., राज्यव्यवहार कोष शिवचरित्र प्रदिप भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे १९२३.

४. ऐतिहासीक घराण्यांच्या वंशावळी, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे सन १९५७.

५. करंदीकर ज. सं. व हिवरगावकर (संपा), कौटिल्य अर्थशास्त्र (मराठी-संस्कृत), कर्जत प्रकाशन, पुणे प्रथमावृत्ती १९२७.

६. कीर धनंजय, कृतज्ञ मी, कृतार्थ मी. पॉप्युलर प्रकाशन मुंबई-१९८७-१९०९.

७. पर्यटन व सांस्कृतिक कार्यविभाग, दर्शवित महाराष्ट्र राज्य प्रकाशन मुंबई - २०१४

८. कुलकर्णी भिमराव, श्री. शिवछत्रपतींचे सप्तप्रकरणात्मक चरित्र, चिटणीसकृत सुविचार प्रकाशन मंडळ पुणे-१९६७

९. कुलकर्णी अ. रा., शिवकालीन महाराष्ट, राजहंस प्रकाश पुणे-२०११

१०. कुरूंदकर नरहर, श्री. छत्रपती शिवाजी महाराज जीवनरहस्य जनबोध प्रकाशन पुणे-२०१०.

११. कुंटे म.मो. राजा शिवाजी, साहित्य सेवा प्रकाशन औरंगाबाद-१९९२

१२. कुंटे भ.ग., महाराष्ट्र राज्य गॅझिटर (म. कालखंड) राजकीय, सामाजिक इतिहास

१३. खरे ग.ह. / कुलकर्णी अ.रा., मराठ्यांचा इतिहास खंड १, २ कॉन्टिनेंटल प्रकाशन पुणे-१९९२

१४. खरात विलास (संपा), शिवराजाभिषेक गागाभट्टकृत, मुल निवासी प्रकाशन पुणे -२००५.

१५. गुप्ते बाळकृष्ण (संपा), चांद्रसेनीय कायस्थ प्रभुंच्या इतिहासाची साधने, वर्ष १ अंक १ ते १२, प्रकाशन गुप्ते प्रथमावृत्ती १८८१.

१६. चांदोरकर गोविंद काशिनाथ (संपा), प्रभात मासिक (मराठी) धुळे. भारत इतिहास संशोधक मंडळ : त्रैमासिक (मराठी) वर्ष २ अंक १ ते ४ शके १८४३ : वर्ष -३ अंक ३ ते ४ शके १८४४.

१७. जदुनाथ सरकार (अनु.) कालेलकर श. गो. : औरंगजेब, डायमंड पब्लिकेशन पुणे -२००१.

१८. जोशी श.ना., मराठेकालीन समाज दर्शन अनाथ विद्यार्थी गृह प्रकाशन पुणे-२००७

१९. जाखडे अरूण (संपा), धर्मवीर छत्रपती संभाजी महाराज, पद्‌मगंधा प्रकाशन कोल्हापूर.

२०. झांबरे जी.एन., आंतरराष्ट्रीय व्यापार आणि वित्त पिंपळापुरे अँड कंपनी प्रकाशन, नागपूर-१९९४

२१. ढेरे रा.चि., अज्ञापत्र (रामचंद्रपंत अमात्य) पद्‌मगंधा प्रकाशन पुणे-१९६०

२२. ठाकरे प्रबोधनकार, समग्र वाङ्मय खंड १, २ महाराष्ट्र राज्य साहित्य सांस्कृतिक मंडळ, मुंबई -१९९०

२३. ताटके अरविंद शिवपुत्र संभाजी, डायमंड प्रकाशन, पुणे सन १९९०

२४. देशपांडे रमाकांत (संपा),धर्मवीर संभाजी महाराजांच्या स्फूर्ति कथा, मनोरमा प्रकाशन पुणे.

२५. देशपांडे विजय, भारतीय समाज संरचना विद्या बुक प्रकाशन, औरंगाबाद-१९९

२६. देसाई स.श., मराठ्यांच्या इतिहासाचे साधने (परेराब्रागांसकृत), पुराणवस्तु संशोधन विभाग गोवा-१९६८

२७. देसाई स.श., शिवशाही पोर्तुगीज कागदपत्रे शिवाजी विद्यापीठ कोल्हापूर-१९७७

२८. पुरंदरे कृ.वा. (संपा), शिवापूरकर-देशपांडे वहीतील शकावली, पुणे प्रकाशन पुणे १९२५.

२९. पेशवे दप्तर : संग्रह किंवा पुणे एलिशेन ऑफिस, (मराठी)

२८ पाटील विश्वास(संपा),संभाजी,मेहता पब्लिकेशन कोल्हापूर-२०१५

२९ पाटील सदाशिव शामराव, तुकाराम- कबीर दर्या प्रकाशन, पुणे-२०१५.

३० फडके य.दि.(संपा), समग्र महात्मा फुले महाराष्ट्र राज्य साहित्य सांस्कृतिक मंडळ, मुंबई -१९९२

३०. बेंद्रे वा. सी. (संपा) महाराष्ट्रतिहासाची साधने भाग १, २ व ३ण्सन १९६६

३१. बेंद्रे वा.सी. (संपा), गोवळकोंड्याची कुतुबशाही भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे १९३४.

३२. बापट प्र.ग. (संपा), छत्रपती श्री. संभाजी महाराज, साकेत प्रकाशन पुणे.

३३. बोबडे राजकुँवर(संपा),शिवपुत्र, मॅजिस्टिक प्रकाशन पुणे.

३१ भावे वा.कृ., शिवकालीन महाराष्ट्र, वरदा प्रकाशन पुणे -१९९८

३२ भोसले सु.बा. (संपा),सिंहाचा छावा शिवपुत्र संभाजी, अमोल प्रकाशन पुणे.

३४. मावजी पुरूषोत्तम व पारसनिस द.ब. (संपा),सनदापत्रातील माहिती, पुणे प्रकाशन पुणे १९१३.

३५. मोडक जनार्धन (संपा), मराठी साम्राज्याची छोटी बखर, काव्येतिहाससंग्रह, भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणे १८८९.

३६. मोडक बाळाजी (संपा), विजापूरच्या आदिलशाहीचा इतिहास, अजब प्रकाशन कोल्हापूर १८८६.

३७. माटे श्री.म., मध्ययुगीन महाराष्ट्र, महाराष्ट्र राज्य साहित्य सांस्कृतिक मंडळ मुंबई-१९९१

३८. राजवाडे वि.का., मराठ्यांच्या इतिहासाची साधने खंड १ ते २२, श्री. आत्माराम छापखाना धुळे-१९१४

३९. राव बहाद्दुर गणेश (संपा), शाहू महाराजांची रोजनिशी, डेक्कन सोसायटी पुणे १९२०.

४०. रानडे म.गो., मराठी सत्तेचा उत्कर्ष महाराष्ट्र राज्य साहित्य सांस्कृतिक मंडळ मुंबई-१९६४

४१. लेले काशिनाथ उर्फ भाऊशास्त्री (संपा), ऐतरेय ब्राह्मण- राज्याभिषेक, वाई प्रकाशन वाई. प्रथमावृत्ती : १९३०

४२. शिवदे सदाशिव (संपा),युद्धभूमीवर श्री. शंभु छत्रपती, लोकव्रत प्रकाशन पुणे.

४३. शिंदे सरकार अशोक (संपा),छत्रपती संभाजी महाराज सह्याद्रीची सिंहगर्जना सह्याद्री प्रकाशन संस्था.

४४. सरदेसाई गो. स. (संपा), मराठी रियासत उग्रप्रकृतीसंभाजी, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे सन १९३५.

४५. सरदेसाई गो. स. /काळे कृ. पा. (संपा), ऐतिहासिक पत्रव्यवहार, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे सन १९३३.

४६. सरदेसाई गो. स. शिवापूर दप्तरातील शकावली (सहा कलमी शकावली) डायमंड प्रकाशन पुणे.

४७. सरदेसाई गो.स. (संपा), मावळकर सरदेसाई घराण्याचा इतिहास, अजब प्रकाशन कोल्हापूर १९३०.

४८. सरदार ग.बा., महाराष्ट्र जीवन प्रतिभा प्रकाशन पुणे-१९६०

४९. सबनीस के. गो. (संपा), पंत अमात्य बावडा दप्तर, राजवाडे संशोधन मंडळ धुळे, सन १९६६.

५०. सावंत शंकर, हुतात्मा संभाजी, डायमंड प्रकाशन, पुणे सन १९९०

५१. सावंत शिवाजी ,छावा कॉन्टिनेंटल प्रकाशन पुणे.११ वी आवृत्ती-२०११

५२. संभाजी कालीन पत्रसार संग्रह (मराठी), भारत इतिहास संशोधन मंडळ पुणे १९२७.

५३. सासवडकर प्र.ल., मराठी सत्तेचा विकास आणि ऱ्हास सासवडकर महाराष्ट्र विद्या ग्रंथ निर्मिती मंडळ नागपूर-१९८२

५४. साळुंखे आ. ह. , शिवराय बालपण, शिक्षण आणि संस्कार, लोकायत प्रकाशन सातारा -२०१५

५५. साळुंखे आ. ह. दुसरा राज्याभिषेक : एक चिकीत्सा, लोकायत प्रकाशन सातारा -२०१७.

५६. साळुंखे आ. ह., विद्रोही तुकाराम, लोकायत प्रकाशन सातारा -१९९७.

५७. साने काशिनाथ (संपा), रघुनाथपंडित : राज्यव्यवहार कोष, पुणे प्रकाशन पुणे १९२५.

५८. साने कां. ना. (संपा), मल्हारराव रामराव चिटनीस रचीत शिवचरित्र, भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे सन १९२६.

५९. साने कां. ना. (संपा), शिवछत्रपतींचे चरित्र कृष्णाजी सभासद विरचीत भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे सन १९२७

६०. साने कां. ना. (संपा), चित्रगुप्त विरचीत शिवाजी महाराजांची बखर भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे सन १९२७.

६१. साने कां. ना. (संपा), काव्यइतिहास संग्रह. ऐतिहासिक कागदपत्रे भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे सन १९२८.

६२. हेरवाडकर र.वि. (संपा),श्रीमंत छ. संभाजी आणि श्री. राजाराम महाराज यांची चरित्रे, व्हीनस प्रकाशन पुणे.

**हिन्दी संदर्भग्रंथ :**

१. चोपडे पी.एन, भारत का सामाजिक, सांस्कृतिक और आर्थिक इतिहास मॅकमिलन इंडिया लिमिटेड, जयपूर-१९७४

२. प्रसाद अवध, गाँवों में सामाजिक, आर्थिक एवं राजनैतिक परिवर्तन रावत पब्लिकेशन नई दिल्ली-१९७२

३. हबीब इरफान, मध्ययुगीन भारत का आर्थिक इतिहास, राजकमल, प्रकाशन नई दिल्ली-२०१४

४. महाजन वि.डी., प्राचीन भारत का इतिहास, एस. चंद्र कंपनी लिमिटेड, रामनगर नवी दिल्ली -२००१.

५. हबीब इरफान, मध्ययुगीन भारत खंड १ ते ३, राजकमल प्रकाशन, नई दिल्ली -२०१२

६. श्रीवास्तव कृ.च., प्राचीन भारत का इतिहास तथा संस्कृती, युनायटेड बुक डेपो, इलाहाबाद-२००१

**English book Reference:**

1. English Records on Shivaji (1680 to 1682 A.D.), Shivaji Tercentenary memorial series volume IV, Shiva Chritra Karyalaya Pune 1931.

2. Journal De Boureau Deslandes Archives National Paris, B.I.S.M. Quarterly volume III 1923.

**पी.एच्डी. प्रबंध :**

१. पेशवेकालीन न्यायव्यवस्था : एक चिकित्सक अभ्यास (अप्रकाशित), लांब व्यंकट बजरंग, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद-२००२.

२. मराठेकालीन घोडदळ आणि पागा (अप्रकाशित), फाटक रामहारी चांगदेव डॉ. बाबासाहेब आंबेडकर, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद-१९९९.

३. मध्ययुगीन मराठ्यांचे जलव्यवस्थापन (अप्रकाशित), साबळे प्रशांत अर्जुनराव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद-२०१२.

४. महाराणी येसूबाई (मराठ्यांच्या इतिहासातील स्थान) (अप्रकाशित), मीराशी मीना मधुसूदन डॉ. बाबासाहेब आंबेडकर, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद-१९९३.

५. शहाजी महाराज : एक चिकित्सक अभ्यास (अप्रकाशित), लांडेपाटील त्रिंबक रामराव डॉ. बाबासाहेब आंबेडकर, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद-२००२.

६. शिवकालीन मराठा सेनापतींचे गनिमीकावा युद्धनितीद्वारे स्वराज्य उभारणीतील योगदान (अप्रकाशित), कदम सतिष सुखदेव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद-२०११.

७. शिवकालीन व्यापार (अप्रकाशित), मापारी विजय साहेबराव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर, मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद-२०१६.

८. संत तुकाराम आणि संत कबीर यांच्या काव्यातील लौकिक जाणीवांचा तौलनिक अभ्यास (अप्रकाशित), पाटील सदाशिव शामराव,शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर-२०१२.

**मासिके :**

३. अखिल मराठा इतिहास परिषद, १७ वे अधिवेशन बारामती-२००८विविध ज्ञान विस्तार - मासिक (मराठी) वर्ष ५२ अंक ११ नोव्हेंबर १९२७.

४. इतिहास संशोधन परिषद, इतिहास दर्पण, टाईम्स कॉलनी औरंगाबाद जाने. २००७.

५. जोगळेकर स.आ. - सह्याद्री १ ऑगस्ट १९४२, ३६४ शुक्रवार पेठ पुणे.

६. पोतदार द.वा.- भारत इतिहास संशोधन मंडळ त्रैमासिक वर्ष १९१९

७. विविध ज्ञान विस्तार - मासिक (मराठी) वर्ष ५५ अंक २ फेब्रुवारी १९३४

८. समाज प्रबोधन पत्रिका - वर्ष ४५, अंक १८०, मार्च-२००६

*****